# गीतेंतील राजकीय तत्त्वज्ञान

अनुक्रमणिका



गीतेंतील

# राजकीय तत्त्वज्ञान

## (१)

## कुरु-क्षेत्रावरील घोषणा

### भगवान् श्रीकृष्णांनीं घोषित केलेले भारतीय युद्धाचे हेतु

जेव्हां युद्धें सुरू होतात, तेव्हां पुढारी लोक मोठमोठ्या धर्मतत्त्वांच्या घोषणा करतात. या घोषणातून असें प्रकट केलें जातें कीं, या घोषणातील तत्त्वाप्रमाणें जनतेचा राज्यकारभार यापुढें चालविला जाईल. कुरुक्षेत्रांत भारतीय युद्ध या नांवाचें एक अतिप्रसिद्ध युद्ध झालें. त्या युद्धांत कौरव आणि पाण्डव यांच्याकरितां भारतवर्षांतील प्रायः सर्व राजे आपापल्या सैन्यासह लढण्यासाठीं एकत्र झाले होते. प्रारंभीं भगवान् श्रीकृष्णांनीं या भारतीय समराचे युद्ध-हेतू प्रकट केले. त्या घोषणेचें नांव '*भगवद्गीता*' हें होय. तसें पाहिलें तर ही घोषणा होऊन ५००० वर्षे होऊन गेलीं, तरी पण अजूनहि तिचें महत्त्व किंचिन्मात्र कमी झालेलें नाहीं.

### युद्धाच्या वेळची घोषणा

ही भगवद्गीतारूप घोषणा युद्ध-क्षेत्रावर ज्या वेळीं केली गेली, ती वेळ

शान्ततेची नव्हती. पराकाष्ठेची अशान्ति निर्माण झाली, दोन्ही बाजूंचीं सैन्यें युद्धाकरितां तयार झालीं आणि जेव्हां युद्ध करणें अपरिहार्य होऊन बसलें, तेव्हांच हिचा जन्म झाला. अर्थात् ती घोषित करण्यांत युद्धानंतर ज्या पद्धतीनें राज्यशासन केलें जाणार होतें, ती पद्धति संपूर्ण विश्वांत जाहीर व्हावी, हा हेतु होताच.

सध्यांच्या युद्धघोषणा करणारे राजनीतिज्ञ आपले कुटिल हेतु सिद्ध करण्याकरितांच या घोषणांचें अवडंबर माजवीत असतात. जनतेला भ्रमांत दाबून तिला आपल्या मार्गे येण्यास लावावें, हाही एक हेतु या घोषणांच्या मागें असतोच. परंतु भगवद्गीतारूपी घोषणा ज्या महा-पुरुषाकडून केली गेली, त्याचें वर्णन त्याच्याच शब्दांत ऐकणें अधिक बोधप्रद होईल–

न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन।
नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ (भ. गी.)

"*मला त्रैलोक्यांत साम्राज्यवृद्धीची मुळींच इच्छा नाहीं किंवा आणखी एखादी* गोष्ट मला प्राप्त व्हायची राहिली आहे, असेंही नाहीं. जनतेचें कल्याण हाच माझ्या जीवनाचा ध्येयबिंदु झालेला आहे आणि याचकरितां मी जन्मभर परिश्रम करीत आहें."

अशा सन्माननीय महापुरुषाच्या मुखांतून निघाल्यामुळेंच गीतेला आजचें मानाचें स्थान प्राप्त झालें आहे. ज्याला आपला स्वतःचा असा कोणताही दुष्ट स्वार्थ साधावयाचा नाहीं, *त्याच्या घोषणेंत छल किंवा कपट* असणेंच शक्य नाहीं, याच एकमात्र कारणामुळें ही युद्धहेतूंची घोषणा इतकी निष्कलंक झाली आणि आजही तिच्या स्वरूपांत यत्किंचितही कमीपणा आलेला नाहीं. आजकालच्या युद्ध-घोषणांची शाईही वाळण्यापूर्वीच त्या नाकबूल केल्या जातात आणि यदाकदाचित् त्या मान्यही केल्या गेल्या, तरी त्यांच्या प्रयोगांत भरपूर कपटाचा उपयोग केला जातो.

भगवन्तांनीं ही जी घोषणा केली तिच्या द्वारें त्यांना एखादा राज्यव्यवस्थेची नवीन पद्धतीनें रचना करायची नव्हती, तर सत्य सनातन शाश्वत मानव

धर्मांत समाजाच्या शैथिल्यामुळें जी अव्यवस्था निर्माण झाली होती, ती दूर करणें आणि तिच्या जागीं प्राचीन धर्माच्या सुव्यवस्थेचें प्रतिष्ठापन करून तद्विषयक पुनर्जागृति करणें, हाच तिचा उद्देश होता. तात्पर्य, असें कीं ही घोषणा करणाऱ्या महा-पुरुषाला अहंकाराचा स्पर्शही झाला नव्हता.

ही घोषणा करते वेळीं स्वतः भगवान् यासंबंधीं म्हणतात-

इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।
विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥१॥
एवं परम्पराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।
स कालेनेह महता योगो नष्टः परन्तप ॥ २ ॥
स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ॥३॥
(भ. गी. ४।१-३)

" हा अव्यय सत्य सनातन ( साम्य ) योग्य मी पूर्वी विवस्वानास सांगितला होता. विवस्वानानें मनूला सांगितला आणि मनूनें इक्ष्वाकूला सांगितला. याप्रमाणें हा ( साम्य ) योग परम्परेनें अनेक राजर्षींना माहीत होता. [ मनुष्य हा स्वभावतःच मर्यादांचें पालन करण्यांत शिथिल असल्यामुळें पथभ्रष्ट होत असतो, हें तूं जाणतोसच. यामुळें ] दीर्घ कालानंतर या साम्ययोगाची शासन-प्रणाली नष्ट झाली. ती पुरातन शैलीच मी आज तुला पुनः एकदां सांगत आहें."

याप्रमाणें सत्य सनातन, शाश्वत आणि अव्यय साम्ययोगाच्या शासनमर्यादेची ही घोषणा आप्तकाम ( प्राप्त गोष्टीतच तृप्त असणाऱ्या ) आणि अकाम ( आणखी कांहीं मिळविण्याची इच्छा नसलेल्या ) अशा भगवान् श्रीकृष्णांकडून कुरुक्षेत्रावर भारतीय युद्धाच्या वेळीं केली गेली. ही घोषणा, करण्यांत तिच्या कर्त्याच्या मनांत एक नवीन व्यवस्था स्थापित करण्याचा अभिमान तर नव्हताच, पण प्राचीन धर्मव्यवस्थेला शिरोधार्य मानण्याचा निरभिमान मात्र त्याचे ठायीं वास्तव्य करीत असलेला स्पष्ट दिसतो. म्हणूनच ही घोषणा अत्यन्त महत्त्वाची आहे.

आतां कदाचित् कांहीं जिज्ञासूच्या मनांत अशी शंका निर्माण होईल कीं, 'युद्धभूमीवर ऐन युद्धप्रसंगीं एवढा मोठा ग्रंथ सांगण्यापुरता वेळ मिळाला कसा?'

*

कित्येकांचें तर असें म्हणणें आहे कीं, ' ही गीता प्रक्षिप्त असून महाभारताच्या रचनेनंतर बऱ्याच वर्षांनीं ती त्यांत घुसडून दिली गेली आहे. या आणि अशा अनेक शंका गीतेसंबंधीं आज प्रचलित आहेत; म्हणून येथें त्यांचेविषयीं थोडासा विचार केला पाहिजे.

## युद्धभूमीवर एवढा वेळ मिळेल काय ?

आज उपलब्ध असलेल्या गीतेंत १८ अध्याय आणि ७०० श्लोक आहेत. यांतून धृतराष्ट्र आणि संजय यांचे ६८ श्लोक कमी केल्यावर बाकी सर्व श्लोक श्रीकृष्ण आणि अर्जुन यांचे संवादरूप आहेत—

षट् शतानि सविंशानि श्लोकानां प्राह केशवः ।
अर्जुनः सप्तपञ्चाशत् सप्तषष्टिं तु सञ्जयः ॥४॥
धृतराष्ट्रः श्लोकमेकं गीताया मानमुच्यते ।
(म. भा भीष्म. ४३)

| | |
|---|---|
| भगवान् श्रीकृष्णांचे श्लोक | ६२० |
| अर्जुनाचे " | ५७ |
| संजयाचे " | ६७ |
| धृतराष्ट्राचा " | १ |
| एकूण श्लोक-संख्या | ७४५ |

अशी गणना महाभारतांत केलेली आहे, आजच्या गणनेप्रमाणें गीतेंत केवळ ७०० श्लोकच सांपडतात. कदाचित् हा फरक श्लोक-गणना-पद्धतीमुळेंही होत असावा. आजच्या ७०० श्लोकांपैकीं धृतराष्ट्र आणि संजय यांचा संवाद प्रत्यक्ष कुरुक्षेत्रावर न झाल्यामुळें त्या उभयतांचे श्लोक सोडून दिल्यास ६७७ श्लोक शिल्लक राहतात. हे श्लोक मात्र अर्जुन आणि श्रीकृष्ण यांच्या संवादाचे आहेत. विचारपूर्वक या ६७७ श्लोकांचा पाठ करूं गेल्यास दीड तास लागतो. संवादाला थोडा कमी वेळ लागेल, पण दीड तास मानणें आमच्या दृष्टीनें ठीक आहे.

आतां आपल्या समोर असा प्रश्न आहे कीं, " महाभारतीय युद्ध सुरु होण्याच्या

वेळीं दोन वीरांना आपापसांत बोलण्याकरितां इतका वेळ मिळाला काय?" या प्रश्नाचा विचार करण्याकरितां भारतीय युद्धाचें स्वरूप समजावून घेतलें पाहिजे.

## द्वन्द्व युद्ध आणि संकुल युद्ध

युद्धाचे प्रकार दोन-एक द्वन्द्वयुद्ध आणि दुसरें संकुल युद्ध. महाभारतीय युद्ध हें द्वंद्वयुद्ध होतें आणि राम-रावण-युद्ध हें संकुल युद्ध होतें द्वन्द्वयुद्ध हें द्वन्द्वयुद्धाच्या नियमांस अनुसरून होत असतें. संकुलयुद्धांत तसली नियमांची कांहीं भानगड नसते. वाचकांच्या माहितीसाठीं द्वन्द्वयुद्धाचे कांहीं नियम खालीं दिले आहेत—

> न कूटैरायुधैर्हन्याद्युध्यमानो रणे रिपून् ।
> न कर्णिभिर्नापि दिग्धैर्नाग्निज्वलिततेजनैः ॥१०॥
> न च हन्यात्स्थलारूढं न क्लीबं न कृताञ्जलिम् ।
> न मुक्तकेशं नासीनं न तवास्मीति वादिनम् ॥११॥
> न सुप्तं न विसन्नाहं न नग्नं न निरायुधम् ।
> नायुध्यमानं पश्यन्तं न परेण समागतम् ॥ १२॥
> नायुधव्यसनप्राप्तं नार्तं नातिपरिक्षतम् ।
> न भीतं न परावृत्तं सतां धर्ममनुस्मरन् ॥ १३ ॥
>
> ( मनुस्मृति अ० ७ )

" कूट शस्त्राचा उपयोग करूं नये. वाकडींतिकडीं शस्त्रें आणि विषदिग्ध शस्त्रें यांचाही उपयोग करूं नये. रथारूढानें पादचाऱ्यावर आघात करतां कामा नये. क्लीब, भयभीत, केस मोकळे सुटलेला, भूमीवर स्वस्थ बसलेला, 'मी तुझा आहें' असें म्हणणारा, झोंपलेला, कवच न घातलेला, वस्त्रहीन नग्न, आयुधरहित, न लढणारा, केवळ युद्ध पाहण्याकरितां उभा असलेला, दुसऱ्या-बरोबर लढणारा, ज्याच्या हातातील शस्त्र खालीं पडलें आहे असा, नातलगाच्या मृत्यूनें दुःखी झालेला, शारीरिक व्याधींनीं पीडित-जखमी, युद्धापासून निवृत्त झालेला, अशा लोकांवर शस्त्र चालवितां कामा नये."

या नियमांप्रमाणेंच ज्यांचें भारतीय युद्धांत पालन केलें गेलें, असे कितीतरी

आणखी नियम सांगतां येतील. रथारूढ रथारूढाशींच लढत असे. घोडेस्वार घोडेस्वाराशीं, गजारूढ गजारूढाशीं आणि पदाति पदातीशींच लढत असे. प्रातःकालीं संध्या, हवन, पूजा इत्यादि नित्य कर्मे आटोपल्यावर मगच युद्ध सुरू होत असे. संध्याकाळीं संध्येच्या वेळीं संध्या करण्याकरितां लढाई बन्द होत असे. रात्रीं लढाई होत नसे. समोरचा वीर युद्धास सिद्ध होईपर्यंत युद्ध थांबत असे.

ज्याच्याशी युद्ध करायचें तो जर कोणाशीं बोलण्यांत अथवा दुसऱ्या एखाद्या कामांत गुंतला असेल तर तो मोकळा होईपर्यंत युद्ध करण्याची मनाई होती. दोघेही वीर एकमेकांना विचारून एकमेकांची तयारी झाल्यावर मगच युद्धास प्रारम्भ करीत असत. रात्रीं उभय पक्षांचे वीर एकमेकांच्या शिबिरांत जाऊन परस्परांच्या कुशलाची चौकशी करीत. दोन वीर जेव्हां युद्ध करीत, तेव्हां अन्य वीर किंवा प्रेक्षक त्यांचें युद्ध पहात उभे रहात असत.

भारतीय युद्धाच्या शेवटच्या दिवशीं भीम आणि दुर्योधन यांचें गदायुद्ध झालें, तें पाहण्याकरितां श्रीकृष्ण, बलराम आणि इतरही लोक चारी बाजूंना निःशंक मनानें बसले होते. शेवटीं जेव्हां भीमानें दुर्योधनाच्या माण्डीवर गदाघात केला आणि त्या आघातानें माण्डी मोडून दुर्योधन खालीं पडला, तेव्हां प्रेक्षकांमधून बलराम क्रुद्ध होऊन उभे राहिले. त्यांनीं भीमाची निन्दा करीत त्याला म्हटलें, " माण्डीवर गदाप्रहार करून तूं गदायुद्धाच्या नियमांचा भंग केला आहेस !" असें म्हणून भीमाचा वध करण्याकरितां बलराम त्याच्यावर धांवून गेले. जर श्रीकृष्ण मध्यें धांवून जाऊन त्यांची समजूत न करते, तर कदाचित् बलरामाचे हातून भीमाचा वधही झाला असता ! तात्पर्य, द्वन्द्वयुद्धांतले नियम मोडणें हा एवढा मोठा अपराध मानला जात असे.

अशा परिस्थितींत भगवान् श्रीकृष्ण आणि अर्जुन यांना आपसांत बोलण्याकरितां सात दोन तासांचा वेळ मिळणें अगदीं सहजच शक्य होतें.

शिवाय पाण्डवांनीं युद्धापासून निवृत्त व्हावें, या हेतूनें कौरवांनीं एका मोठ्या थोरल्या कपट-जालाची योजना केली होती. भगवद्गीतेच्या पहिल्याच

श्लोकांत धृतराष्ट्रानें संजयाला जो प्रश्न विचारला आहे, त्यांत तो म्हणतो, "माझे पुत्र आणि पाण्डूचे पुत्र कुरुक्षेत्रावर युद्धाच्या हेतूनें एकत्र जमल्यावर मग पुढें काय झालें?" (भ. गी. १।१) या प्रश्नांतील रहस्य असें आहे कीं, "मी संजयाकडून पाण्डवांना युद्धापासून निवृत्त करण्याचा जो डाव रचला होता, तो कोठपर्यंत यशस्वी झाला? अर्जुनादि पाण्डव कपट-प्रयोगांत सांपडले कीं नाहीं?" कौरव पक्षीय लोक पाण्डवांच्या युद्धनिवृत्तीचीच वाट पहात होते. अशा स्थितींत अर्जुन जर युद्धनिवृत्तीच्या गोष्टीच बोलत असेल तर त्याला तितका वेळ मिळणें सहज शक्य आहे.

## युधिष्ठिराचें भीष्मांशीं विनयपूर्ण वर्तन

भारतीय युद्धाच्या वेळची खरी परिस्थिति लक्षांत येण्याकरितां गीतोपदेश होण्याच्या वेळच्या आणखी एका घटनेकडे लक्ष देणें आवश्यक आहे. युद्धाचे प्रारम्भीं अर्जुन उत्साहरहित होऊन युद्धापासून निवृत्त झाला. गीतोपदेश ऐकल्या-नन्तर तो परत उत्साहपूर्ण होऊन आपलें गाण्डीव धनुष्य उचलून युद्धाकरितां रथांत उभा राहिला; तोंच—

> ततो युधिष्ठिरो दृष्ट्वा युद्धाय समवस्थिते
> ते सेने सागरप्रख्ये मुहुः प्रचलिते नृपे ॥ ११ ॥
> विमुच्य कवचं वीरो निक्षिप्य च वरायुधम् ।
> अवरुह्य रथात् क्षिप्रं पद्भ्यामेव कृताञ्जलिः ॥१२॥
> पितामहमभिप्रेक्ष्य धर्मराजो युधिष्ठिरः ।
> वाग्यतः प्रययौ येन प्राङ्मुखो रिपुवाहिनीम् ॥१३॥
>
> (म. भा. भीष्म. ४३)

"धर्मराजानें आपल्या शरीरावरचें कवच खालीं उतरून ठेवलें, शस्त्रें ठेऊन दिलीं, आपल्या रथांतून खालीं उतरला, आणि हात जोडून शत्रुसेनेच्या समीप जिकडे भीष्मपितामह होते, तिकडे तो अनवाणी मुकाट्यानें चालूं लागला."

कौरवपक्षाकडील लोक धर्मराजाला हात जोडून येतांना पाहून त्याची हंसून टवाळी करूं लागले! अर्जुन, श्रीकृष्ण, भीम, नकुल आणि सहदेव हे आपापल्या

रथांतून खालीं उतरून युधिष्ठिराजवळ आले आणि-" हें तुम्ही काय करीत आहांत ? " असें त्यास विचारूं लागले. तेव्हां धर्मराजाच्या उत्तरावरून सर्वांना कळलें कीं, भीष्म, द्रोण, कृप, शल्य इत्यादि गुरुजनांची युद्धासाठीं अनुज्ञा घेऊन त्यांचा आशीर्वाद मिळविण्याकरितां धर्मराज त्यांच्याकडे जात आहे.

युधिष्ठिर त्यांच्या जवळ पोंहोंचल्यावर त्यानें त्यांच्याजवळून युद्धाची अनुज्ञा घेतली, त्यांचे मृत्यु कोणत्या उपायानें होणार, एतद्विषयक पृच्छा केली आणि प्रत्येकाशीं आवश्यक तितकें बोलणें-चालणें झाल्यावर सगळ्यांचे आशीर्वाद घेऊन तो परत आपल्या सैन्यांत येऊन रथारूढ झाला. यावेळीं त्यांचा जो संवाद झाला, तो येथें देण्याची आवश्यकता नाहीं. पण भीष्मांशीं झालेला वार्तालाप संक्षेप-रूपानें खालीं दिला आहे—

आमन्त्रये त्वां दुर्धर्षं त्वया योत्स्यामहे सह ।
अनुजानीहि मां तात आशिषश्च प्रयोजय ॥३७॥

भीष्म उवाच—

यद्येवं नाभिगच्छेथा युधि मां पृथिवीपते ।
शपेयं त्वां महाराज पराभावाय भारत ॥ ३८ ॥
प्रीतोऽहं पुत्र युध्यस्व जयमाप्नुहि पाण्डव ।
अर्थस्य पुरुषो दासो दासस्त्वर्थो न कस्यचित् ॥
इति सत्यं महाराज बद्धोऽस्म्यर्थेन कौरवैः ॥४१॥
अतस्त्वां क्लीबवद्वाक्यं ब्रवीमि कुरुनन्दन ।

(म. भा. भीष्म. ४३.)

" यानन्तर धैर्य धारण करणाऱ्या धर्मराजानें समुद्रप्रमाणें पसरलेल्या त्या दोन्ही सेना युद्धाकरितां सिद्ध झालेल्या आणि वारंवार पुढें सरकत असलेल्या पाहून आपलें कवच अंगावरून काढून धनुष्यबद्द खालीं ठेऊन दिलें. मग तो आपल्या रथांतून खालीं उतरून भीष्मपितामहांकडे पद्दात पद्दात त्यांच्याकडे जाऊं लागला ! जवळ गेल्यावर तो म्हणाला, "हे अजिंक्य पितामह, मी आपणाबरोबर जें युद्ध करणार आहें, त्याकरितां आपण मला अनुमति द्या

आणि आशीर्वाद द्या. " भीष्म म्हणाले, "हे पृथ्वीपते धर्मराजा! जर तूं माझ्याकडे अशा विनयानें न येतास, तर मी 'तुझा पराजय व्हावा,' म्हणून तुला शाप दिला असता. हे पुत्रा! मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें. तूं आतां युद्ध कर आणि मी तुला असा आशीर्वाद देतों कीं, त्यांत तुला जय प्राप्त होईल. हे धर्मराजा! पुरुष हा अर्थाचा दास आहे; पण अर्थ कोणाचा दास नाहीं आम्ही लोक कौरवांना पैशानें बांधले गेलों आहोत. म्हणूनच मला एखाद्या क्लीबाप्रमाणें असें निःसत्त्व भाषण करावें लागत आहे."

भीष्मांनी धर्मास "तुझा विजय होईल" असें सांगून निरोप दिला. अशाच प्रकारें द्रोणाचार्य, कृपाचार्य, शल्य इत्यादि लोकांशीं धर्मराजानें संभाषण केलें आणि त्यांचे आशीर्वाद व युद्ध करण्याची अनुज्ञा घेऊन युधिष्ठिर आपल्या रथाकडे परत आला.

तिकडे श्रीकृष्ण कर्णाकडे गेले. त्यांनी त्यास धर्मराजाला सहाय्य करण्याविषयीं परोपरीनें विनविलें. पण कर्ण शेवटपर्यंत ती गोष्ट कबूल करीत नाहींसें पाहून शेवटीं ते परत येऊन अर्जुनाच्या रथावर विराजमान झाले

यानंतर धर्मराज उच्च स्वरानें ओरडून म्हणाला कीं, (म. भा. भी. ४३।९४-९६) "जो कोणी कौरवसेनेचा त्याग करून आम्हांकडे येऊं इच्छीत असेल, त्यानें इकडे निघून यावें." हें ऐकून कौरव-सेनेंतला युयुत्सु हा वीर त्यांच्याकडून निघून पाण्डवांकडे येऊन मिळाला. त्याचें हें आगमन दुंदुभी वाजवून जाहीर केलें गेलें. इतका हा सगळा विधि आवरल्यावर मगच धर्मराजानें आपलें कवच चढवून शस्त्रें धारण केलीं. यानन्तर युद्धास प्रारम्भ झाला.

वर सांगितल्याप्रमाणें भीष्म, द्रोण, कृप आणि शल्य यांच्याजवळ जाणें, त्यांना प्रणाम करणें, त्यांचे आशीर्वाद मागणें, आणि मग परत येणें, या सगळ्या गोष्टींना थोडाथोडका वेळ निश्चितपणेंच लागला नसेल कारण हे सगळे लोक जवळ जवळ उभे नव्हते. हा प्रकार होण्यापूर्वीच सैन्याचे व्यूह रचले गेले होते आणि प्रत्येक वीर व्यूहामध्यें आपापल्या नियुक्त स्थानीं उभा होता. कर्ण, तर सर्व सैन्याच्या मागें उभा होता. लाखों सैनिकांच्या मागें उभ्या असलेल्या

कर्णाला भेटण्याकरितां श्रीकृष्णांना कमींत कमी एक मैल तर अवश्य चालावें लागलें असेल आणि पुनः तें पायीं. प्रत्येकाबरोबर बोलणें, त्याचा आशीर्वाद घेणें आणि मग दुसऱ्याजवळ पोहोंचणें, याला कमींत कमीं पंधरा मिनिटें लागलींच असतील. अशा हिशोबानें एकूण दीड तासाचा वेळ या भेटी घेण्यांत खर्च झाला असेल. भगवद्गीतेचा उपदेश ऐकून अर्जुन युद्धास सिद्ध झाल्यावरही धर्मराजानें आशीर्वादाकरितां इतका वेळ घेतला, आपण पूर्वीच्या श्लोकांत पाहिलेंच आहे कीं, जर धर्मराज भीष्मादिकांच्या जवळ त्यांची अनुज्ञा घेण्याकरितां न जाता, तर त्यांच्यापैकीं, प्रत्येक जणानें धर्मराजाला शापच दिले असते! तात्पर्य असें कीं, द्वन्द्वयुद्धांतला हा एक शिष्टाचार होता. त्याचें परिपालन होणें अत्यावश्यक होतें आणि भीष्मादि वीर धर्मराजापासून याच शिष्टाचाराची अपेक्षा करीत होते.

द्वन्द्वयुद्धाच्या या नियमांकडे पाहतां हें सिद्ध होतें कीं, अर्जुन आणि श्रीकृष्ण या उभयतांच्या संवादाकरितां तास दीड तास, आणि धर्माला आशीर्वाद घेण्याकरितां आणि नमस्कार करून शिष्टाचार पाळण्याकरितां तास दोन तास वेळ मिळणें सहज शक्य होतें.

जे पृच्छक आजकालच्या युद्धांकडे बघून सगळीं युद्धें सारखींच असावींत, असें अनुमान काढतात आणि युद्धाच्या प्रारम्भीं गीतोपदेशाला लागणारा वेळ मिळणें शक्य नाहीं, असें म्हणतात, त्यांना द्वन्द्वयुद्धाचे हे नियम माहीत नसावेत आणि म्हणून त्याचें हें विधान अज्ञानजन्य आहे, असें म्हणावें लागतें.

नुकतींच युरोप आणि चीनमध्यें जीं युद्धें झालीं, तीं संकुल युद्धें होत. आजच्या जगांत द्वन्द्वयुद्धें करण्याकरितां जें सौहार्द लागतें, त्याचा सगळीकडेच अभाव आहे. रामरावणाचें युद्ध हें संकुल युद्ध होतें. भगवान् रामचन्द्राच्या सेनेनें लंका नगरी दोन वेळां जाळली होती. या दोन्ही वेळीं त्या नगरीमध्यें बालक, वृद्ध, स्त्रिया, संन्यासी अशीं निरुपद्रवी माणसें किती जळून गेलीं, याची गणनाच नाहीं. ज्यांना संकुल युद्धांचे विषयीं अधिक माहिती पाहिजे असेल, त्यांनीं राम-रावण-युद्ध वाचावें. कौरव-पाण्डवांच्या युद्धांत जोंपर्यन्त भीष्म, द्रोण आदि वृद्ध

माणसें जिवन्त होतीं, तोंपर्यंत द्वन्द्वयुद्धाचेच पूर्वोक्त नियम पाळले जात असत, त्यांच्या वेळीं कुरुक्षेत्रावर कांहीं थोडीं संकुल युद्धेंही झालीं. पण या वृद्ध सेनानायकांच्या दक्षतेनें तीं वेळींच थांबविलीं गेलीं. मात्र भीष्मद्रोणांच्या नंतर हा नियम टिकूं शकला नाहीं. तथापि भारतीय युद्ध हें मुख्यत्वें करून द्वन्द्वयुद्ध होतें आणि राम-रावण युद्ध हें मुख्यतया संकुल युद्ध होतें.

या एवढ्या विवेचनावरून हें सिद्ध होतें कीं, भारतीय युद्ध हें द्वन्द्वयुद्ध असल्यामुळें कृष्णार्जुनांना आपापसांत संवादाकरितां आवश्यक तेवढा समय मिळणें अगदीं शक्य होतें. कारण तें द्वन्द्वयुद्धाच्या नियमांप्रमाणेंच होतें.

## भारतीय युद्ध-काल

भारतीय युद्ध हें सुमारें पांच हजार वर्षांपूर्वी झालें. जर गीता समरभूमीवर गाइली गेली असेल, तर ती इतकी प्राचीन असली पाहिजे. परन्तु आज महाभारत-रचनेचा काल दोन अडीच हजार वर्षांपूर्वीचा समजला जातो. विद्वान् लोक असें समजतात कीं, भगवान् व्यासांचें "जय," वैशम्पायनाचें "भारत" आणि सौतीचें "महा-भारत" अशीं महाभारताचीं तीन संस्करणें झालीं. जय ८००० श्लोकांचें होतें, भारतांत २४००० श्लोक होते, आणि महाभारताची श्लोकसंख्या १००००० होती. तृतीय संस्करण हें विक्रमाचे पूर्वी अंदाजें २-३ शें वर्षे झालें. "जय" आणि "भारत" हे ग्रन्थ आज उपलब्ध नाहींत. तरी विद्वानांच्या मतें महाभारतांतील आन्तरिक प्रमाणांवरून त्या ग्रंथांचें अस्तित्व सिद्ध आहे. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, भगवद्गीता या तृतीय संस्करणाच्या वेळीं त्यांत समाविष्ट केली गेली. तेव्हां याविषयीं अधिक विचार करणें प्राप्त आहे.

भाषा हेंच प्रमाण मानावयाचें असेल, तर गीतेची भाषा पाणिनी-पूर्वकालीन असावीसें वाटतें. गीतेंत 'त्वां' च्या स्थानीं 'त्वा'चा उपयोग आढळतो. **"त्रैविद्या मां सोमपाः"** ( भ. गी. ९।२०) असे कांहीं छन्द प्राचीन पद्धतीचे वाटतात आणि पाणिनी ज्या प्रयोगाना अशुद्ध म्हणेल, असे तर कितीतरी प्रयोग गीतेंत आढळतात.

उदाहरणार्थ—

| गीतेंतील प्रयोग | पाणिनीय प्रयोग |
|---|---|
| निवसिष्यसि ( १२।८ ) | निवत्स्यसि |
| मा शुचः ( १४।५ ) | मा शोचः; मा शोचीः |
| प्रसविष्यध्वं ( ३।१० ) | प्रसविष्यध्वं |
| संयमतां ( १०।२९ ) | संयच्छतां |
| हे सखेति ( ११।४१ ) | हे सखे इति |
| प्रियायार्हसि ( १०।४४ ) | प्रियाया अर्हसि |
| शक्य अहं ( ११।४८,५४ ) | शक्योऽहं |
| सेनानीनां ( १०।२४ ) | सेनान्यां |
| योगस्य जिज्ञासुः ( ६।४४ ) | योगं जिज्ञासुः |
| धर्मस्य अश्रद्दधानाः ( ९।३ ) | धर्मे अश्रद्दधानाः |
| विभूतयः ( १०।१६;१९ ) | विभूतीः |
| अपनुद्यात् ( २।८ ) | अपनुदेत् |

पण एवढ्या अपप्रयोगांशींच संपत नाहीं, तर परस्मैपद आणि आत्मनेपदाविषयींही पुष्कळ गोंधळ आहे. कवीच्या काव्यांत एक दोन अपप्रयोग असतील तर ते क्षम्य गणले जातील. पण गीतेच्या लेखनपद्धतीवरून असें वाटतें कीं, हा लेखक पाणिनीय व्याकरणाशीं अपरिचित असून एखाद्या प्राचीन व्याकरणास अनुसरून आपल्या काव्याची रचना करीत आहे. यावरून हा ग्रन्थ पाणिनी–पूर्वकालीन आहे, असें वाटतें. भगवद्गीतेचा लेखक हा असामान्य विद्वान् आहे. तो वैदिक तत्त्वज्ञानांत तज्ज्ञ आहे, धर्माधर्माचा निर्णय करण्यांत अत्यन्त कुशल आहे, मानवधर्माच्या सनातन तत्त्वांचें त्याला उत्तम ज्ञान आहे. असा हा लेखक जर पाणिनीचें व्याकरण सर्वमान्य झाल्यावर गीताग्रन्थ लिहिता, तर त्याच्या ग्रन्थांत अपाणिनीय प्रयोग आले नसते. म्हणून भगवद्गीता पाणिनीपूर्वकालीन आहे, हें मानणें भागच आहे. पाणिनी–काल विक्रमकालापूर्वी सुमारें एक हजार वर्षे मानला गेला आहे. त्या अर्थी गीतेची रचना तत्पूर्वी

झाली असली पाहिजे. जरी कालनिश्चितीकरितां व्याकरणाचे प्रयोग हें प्रमाण फारसें प्रबल प्रमाण होऊं शकत नसलें, तरी दुसऱ्या प्रमाणांनीं त्यांचें मूल्य ठरवतां येणें शक्य आहे.

पिंगल या नांवाचा पिंगलसूत्रांचा कर्ता हा पाणिनीचा धाकटा भाऊ होता. जनमेजयाच्या सर्पसत्रांत हा एक सदस्य झाला होता. जर हें खरें असेल, तर पाणिनीचा काल आणखी पाठीमागें नेला पाहिजे. कारण जनमेजय आणि पाण्डव यांच्यामध्यें फार थोडें अन्तर आहे. सर्वानुक्रम सूत्राचे टीकाकार आचार्य षड्गुरु यांनीं आपल्या व्याख्येंत असेंच विधान केलें आहे. पाणिनीय ग्रन्थ म्हणून प्रसिद्ध असलेल्या वेदांग-शिक्षेच्या प्रावप्रकाश नामक टीकेंत प्रारंभींच या विधानास पुष्टि दिलेली आहे ( पद्य परिभाषा, ७, ९. ). जरी असें मानण्यांत अनेक आपत्ति आहेत, तरी दोन प्राचीन विद्वान् आपल्या टीकेंत असें लिहीत असल्यामुळें ही गोष्ट अवश्य विचारणीय आहे. जर हीं दोन प्रमाणें मानण्यायोग्य असतील, तर मग पाणिनी आणि जनमेजय हे समकालीन ठरतील. गीतेचा काल तर पाणिनी-पूर्व आहेच. पण हीं प्रमाणें संदेहयुक्त आहेत.

श्रीमद्भगवद्गीतेचा उपक्रम आणि उपसंहार हे तर निःसंशय भारतीय युद्धाशीं संबन्धित आहेत. अर्जुन प्रथम युद्धापासून विमुख झाला होता, गीताश्रवणानन्तर तो युद्ध करून त्यांत विजयी झाला. गीतेच्या प्रारम्भाचे आणि शेवटचे हे श्लोकच गीतेचें भारतीय युद्धाशीं समकालीनत्व सिद्ध करीत आहेत.

गीतेची रचना वैदिक वचनांच्या आधारावर अर्थात् वेदमन्त्रांवर झाली आहे, हेंच तिच्या प्राचीनतेचें प्रबल प्रमाण आहे. जेव्हां आम्ही पूर्वोक्त अपाणिनीय शब्दप्रयोगाच्या प्रमाणांबरोबर या प्रमाणाचा विचार करूं, तेव्हां हीं दोन्ही प्रमाणें मिळून गीतेची प्राचीनता निःसंशय सिद्ध करतील. सर्व वैदिक प्रमाणें देण्यास आवश्यक तो समय आमच्याजवळ नाहीं. पण नमुन्या-करितां एक दोन प्रमाणें खालीं दिलीं आहेत.

गीता अ० ४।१-२ मध्यें म्हटलें आहे, कीं, "मी म्हणजे श्रीकृष्णानें हा साम्ययोग विवस्वानास सांगितला. विवस्वानानें मनूला सांगितला. मनूनें

इक्ष्वाकूला सांगितला. परम्परेनें या साम्ययोगाचें ज्ञान राजश्रेष्ठांच्या ध्वद्वारा-मध्यें होतें. पण पुढें दीर्घ कालानंतर तो नष्ट झाला. तोच साम्ययोग आज मी (श्रीकृष्ण) तुला (अर्जुनाला) सांगत आहें."

*या लोकांत* (१) *मी*, (२) *विवस्वान्*, (३) *मनु*, (४) *इक्ष्वाकु* आणि (५) *अन्य राजर्षि*, इतक्यांचीं नांवें आहेत. विवस्वानाला उपदेश करणारा हा ." मी " कोण, एतत्संबंधीं उल्लेख येथें नाहीं. अर्जुनाला उपदेश करणारा " मी " म्हणजे स्वतः श्रीकृष्ण हें स्पष्ट आहे. पण विवस्वानापेक्षां मोठा हा " मी " कोण, हें मात्र गूढ आहे. जरी, '**आदित्यानां अहं विष्णुः**' (गी. १०।२१) 'मीच विष्णु आहें,' असें गीतेंत सांगितलें असलें, तरी याचें स्पष्टीकरण वैदिक वाङ्मयावरूनच होऊं शकतें. वेद आणि ब्राह्मण ग्रंथांत हें " मी " चें गूढ उकलतें.

"**अष्टौ पुत्रासो अदितेः**" (ऋ. १०।७२।८) या मंत्रांत ऋग्वेद अदितीच्या आठ मुलांचें वर्णन करीत आहे. अध्वर्यु ब्राह्मणांत या आठ मुलांचीं नांवें दिलीं आहेत–' (१) विष्णु, (२) मित्र, (३) वरुण, (४) धाता, (५) *अर्यमा*, (६) *अंश*, (७) *भग*, (८) *विवस्वान्*, *या आठ भावांत* सगळ्यांत थोरला भाऊ ' विष्णु ' असून सगळ्यांत धाकटा ' विवस्वान् ' आहे. थोरल्या भावानें धाकट्या भावाला साम्ययोगाचा उपदेश केला असेल आणि धाकट्या भावानें तो ग्रहणही केला असेल, हें संभवनीय आहे. *भगवान् श्रीकृष्ण* हे असे विष्णूचे अवतार आहेत. तात्पर्य, अशा प्रकारें या वैदिक वचनांवरून आणि परम्परेवरूनच विवस्वानास उपदेश करणाऱ्या विष्णुचा निश्चय होऊं शकतो.

*वरील मन्त्राचा ऋषि बृहस्पति हा आहे. या बृहस्पतीचें वर्णन गीतेनें* "**पुरोधसां च मुख्यं...बृहस्पतिं**" (भ गी. १०।२४) अशा प्रकारें आदरानें केलें आहे. कारण हा बृहस्पति ऋषि विष्णु आणि विवस्वान् यांच्या मातेचें वर्णन करीत आहे.

"**मनुर्वैवस्वतो राजा**" (श. ब्रा. १३।४।३।३) मनु हा विवस्वानाचा

पुत्र आहे. म्हणून पित्यानें पुत्रास साम्यधर्माचा उपदेश करणें सहज शक्य आहे. याप्रमाणेंच इक्ष्वाकु हा मनूचा पुत्र असल्यामुळें हें साम्यधर्म-विषयक ज्ञान मनूनें इक्ष्वाकूला दिलें. अशा प्रकारें वैदिक-परम्परेनें "मी (विष्णु), विवस्वान्, मनु आणि इक्ष्वाकु" हे योग, तें कळून येतें.

ऋग्वेदांत "**अहं मनुरभवं सूर्यश्च, अहं कक्षीवान् ऋषिरस्मि विप्रः।**" (ऋ. ४।२६।१) असा एक मन्त्र आहे. गीतेंत या वैदिक मन्त्राप्रमाणेंच विभूति-योग सांगितला आहे. वेदांमध्यें असे अनेक मन्त्र आहेत.

ऋग्वेदांत '**पुरुष एवेदं सर्वं**' (ऋ. १०।९०।२) असा मन्त्र आहे आणि गीतेंत '**वासुदेवः सर्वं।**' (म. गी. ७।१९) असें म्हटलें आहे. गीतेंतल्या विश्वरूपाचें वर्णन अशा प्रकारें वेदांत आढळतें. या दोन्ही वचनांतील शब्दसाम्यही पाहण्यासारखें आहे. वेदामध्यें ज्याप्रमाणें '**विश्वरूप**' या पदाचा उपयोग परमात्म्याकरितां केला गेला आहे, त्याचप्रमाणें गीतेंत अकराव्या अध्यायांत 'विश्वरूप-दर्शन' हा शब्द-प्रयोगही तसाच आहे. या विश्वरूप-दर्शनाचें मूळही वेदांमध्यें आहे.

विश्वरूपाचें वर्णन करणारे वेदमंत्र अनेक आहेत, पण या विषयाचें वर्णन पुढें येणार असल्यामुळें येथें त्याचा अधिक निर्देश करीत नाहीं. उपनिषदांचा अर्थात् वेदाशिरोभागाचा गीतेशीं अत्यन्त निकट संबंध आहे, हें सर्वमान्यच आहे. याप्रमाणें गीता आणि वेद यांच्या निकट संबंधामुळें गीतेंत वैदिक परम्परेचें साक्षात् दर्शन होऊं शकतें. गीतेंतील कित्येक श्लोकांच्या अर्थावर वेदवचनांनींच प्रकाश पडूं शकतो. तात्पर्य, गीतेचा लेखक केवळ वेदांशीं परिचित होता, इतकेंच नव्हे तर तो गीतेंत वैदिक परम्परा अखण्डित ठेऊं इच्छीत होता. गीतेच्या प्राचीनतेचें हें एक प्रबल प्रमाण आहे.

भारतीय-युद्धाचा काल विक्रम संवताचे पूर्वीं ३००० वर्षे आहे, याविषयीं आतां कांहीं संदेह उरला नाहीं. कारण ही गोष्ट ग्रहांच्या गतीवरूनही सिद्ध होत आहे. इजिप्त देशातल्या एका पिरॅमिडमध्यें एक लांकडी मूर्ति मिळाली आहे. गीतेंतील "**जीवभूतः सनातनः शरीरमवाप्नोति यच्चाप्युत्क्रामति।**"

(भ. गी. १५।८) या श्लोकाचा अनुवाद त्या मूर्तीवर शब्दशः कोरलेला आढळला आहे. त्या थडग्यांत या मूर्तीबरोबर ज्या इतर वस्तु सांपडल्या, त्याही सर्व भारतीय होत्या. 'जीव दुसरें शरीर धारण करतो,' हा पुनर्जन्मवाद त्या वेळीं इजिप्तमध्यें प्रचलित नव्हता. म्हणून तेथील लोक प्रेतांना वाळवून ठेवीत असत. अशा देशांत भारतीय वस्तूंच्या बरोबरच भारतीय विचार–गीतेचे विचार–सांपडावेत, हें खरोखरच आश्चर्य आहे आणि हा अनुवाद गीतेंतील श्लोकाचाच आहे. कारण अन्यत्र कोठेंही असलें वचन नाहीं. हें थडगें विक्रमपूर्व ३००० वर्षांचें आहे.

अशा प्रकारचींच दुसरी कित्येक प्रमाणें गीतेचें महाभारतकालीनत्व सिद्ध करीत आहेत. भारतीय–युद्धास आज पांच हजार वर्षे झालीं आणि गीताही तत्कालीनच आहे. पण या इतर कारणांपेक्षां आमच्या मतें गीतेचा उपक्रम, उपसंहार आणि तिच्या कालाविषयीं आजपर्यन्त चालत आलेला विश्वास, हीं कारणेंच अधिक प्रबल आणि मुख्य आहेत. ज्यानें जय आणि भारत यांना महाभारताच्या रूपानें वृद्धिंगत केलें, तो असें म्हणतो कीं, " गीतेचा विचार करताना ती भारतीय युद्धाचे वेळीं निर्माण झाली, असें समजून तिचा विचार करा. " कोणत्याही काव्याचा विचार करतेवेळीं तें काव्य रचणाऱ्या कवीच्या म्हणण्यासच मुख्यतः अनुसरलें पाहिजे. म्हणूनच महाभारताच्या लेखकाच्या म्हणण्याप्रमाणें गीता हें कुरुक्षेत्रांत अर्जुनाला कर्तव्यप्रवण बनविण्याकरितां गाइलें गेलेलें काव्य आहे, असें समजूनच आम्ही तिचें अध्ययन करूं इच्छितों. अर्थात् गीता ही कुरुक्षेत्रावर केली गेलेली युद्धहेतूंची घोषणाच आहे; आणि या दृष्टीनेंच आपण गीता–काव्याचा विचार करूंया–

## भारतीय युद्ध कां झालें ?

आतां भगवद्गीतेच्या द्वारें युद्धहेतूंची घोषणा ज्या युद्धांत केली गेली, तें भारतीय युद्ध कां झालें, हें पाहिलें पाहिजे. भारतीय युद्ध हें घरगुती म्हणजे भावाभावांतील युद्ध होतें. तें कांहीं एका राष्ट्राचें दुसऱ्या राष्ट्राशीं झालेलें युद्ध नव्हतें. एकाच कुटुंबांतील चुलत भावांत एवढें घनघोर युद्ध कां झालें, हें अवश्य

पाहिलें पाहिजे. जरी हें घरगुती युद्ध होतें, तरीदेखील त्यात ४० लक्ष वीर एकत्र झाले आणि मारले गेले या दृष्टीनें हें एक अत्यन्त प्रचण्ड युद्ध होतें. हें युद्ध कोणत्या राज्यशासनविषयक प्रश्नासंबंधी मतभेद होऊन झालें, याचा विचार केला पाहिजे.

विष्णु, विवस्वान्, मनु, इक्ष्वाकु, अशा परम्परेनें जो साम्ययोग राजर्षींमध्यें प्रचलित होता आणि कालेंकरून ज्याचें विस्मरण झालें होतें, तो साम्ययोग या युद्ध-प्रसंगीं श्रीकृष्णांनी अर्जुनास सांगितला. हे सगळे राजर्षि वनात जाऊन तपश्चर्या करीत राहिले नव्हते, तर हे सगळे प्रजाहिततत्पर राजे होते. अर्थात् हा साम्य-योग म्हणजे राज्यशासनयोगच होय, यांत शंका नाहीं. उलट अर्जुन तर भिक्षा मागून आणि वनवासी बनून तपश्चर्या करण्याच्या गोष्टी बोलत होता. या गीतोपदेशामुळें वनात जाण्याचें रहित करून तो राज्याविषयीं विचार करूं लागला. या प्रत्यक्ष परिणामाचा विचार करताही गीतेंत राज्यशासनविषयक निर्देश आहेत, हेंच सिद्ध होतें. गीता हें काव्य असल्यामुळें त्या काव्यात काव्यरूप होऊन दडून बसलेले ते निर्देश शोधून काढून तत्संबंधी विचार केला पाहिजे, आणि राज्यसंचालनाच्या दृष्टीनें त्याचें काय महत्त्व आहे, तें पाहिलें पाहिजे

## पूर्वेतिहास

हस्तिनापूरचा विचित्रवीर्य राजा निपुत्रिक मरण पावला, म्हणून त्याच्या अम्बिका आणि अम्बालिका या दोन राण्यांनी नियोगद्वारा व्यासांपासून अनुक्रमें धृतराष्ट्र आणि पाण्डु अशा दोन पुत्रांना जन्म दिला. धृतराष्ट्र थोरला असूनही आंधळा असल्यामुळें गादीवर बसण्याकरिता अयोग्य ठरला आणि पाण्डु धाकटा असूनही निर्दोष असल्यामुळें त्यालाच गादीवर बसविण्यात आलें. पाण्डु हा अत्यन्त शूर होता. त्यानें राज्यवैभवात चांगलीच वृद्धि केली. पण कांहीं कारणामुळें त्याला स्त्रीसंगापासून दूर रहावें लागल्यानें उत्साहहीन होऊन त्यानें राज्यत्याग केला आणि आपल्या दोन्ही पत्नींना घेऊन तो हिमालयांत जाऊन राहूं लागला. तेथें देवजातीच्या पाच वीरांशीं नियोग संबंध होऊन पाण्डूच्या स्त्रियांना

पांच पाण्डव झाले. यानन्तर पाण्डु मरण पावला. हे पाण्डव पाण्डूच्या राज्य-त्यागानन्तर जन्मले होते.

इकडे हस्तिनापूरच्या गादीवर पाण्डूच्या अभावीं दुसरा कोणीच योग्य राजा नसल्यानें आंधळ्या धृतराष्ट्रालाच गादीवर बसविण्यांत आलें. गादीवर आल्यावर त्याला शंभर औरस मुलें झालीं.

पुढें हिमालयांतून पांचही पाण्डव हस्तिनापूरला आले आणि धृतराष्ट्राच्या पुत्रांबरोबरच त्यांचें राहणें, शिकणें इत्यादि होऊं लागलें. भीष्म पितामहांच्या देखरेखीखालीं द्रोणाचार्य आणि कृपाचार्य यांच्या जवळ या सर्व मुलांचें शिक्षण सुरू झालें. धृतराष्ट्रानंतर राज्याचे वारस पाण्डव होतील, हा विचार दुर्योधनादि कौरव आणि धृतराष्ट्र यांना रात्रंदिवस त्रास देऊं लागला. एखाद्या युक्तीनें पाण्डवांचा नाश करावा, असा सल्ला धृतराष्ट्रास कुटिल-राजनीतिकुशल कणिकानें दिला. त्यानें सांगितलें कीं, "राज्य-व्यवहारांत नीति आणि अनीति हा विचार करण्याचें कारण नाहीं." धृतराष्ट्र आणि त्याचे पुत्र यांना हा विचार पसंत पडला आणि निरनिराळ्या युक्त्यांनीं पाण्डवांचा छळ सुरू झाला. त्यांना विष दिलें, पाण्यांत बुडविण्याचा प्रयत्न झाला, लाक्षागृहांत जाळण्याचा प्रयोग झाला, सर्पांकडून चावविलें गेलें, असे अनेक कपटप्रयोग कौरवांकडून केले गेले. परन्तु भीष्म पितामह, द्रोणाचार्य, भगवद्भक्त विदुर आणि भगवान् श्रीकृष्ण हे सगळे पाण्डवांचे साहाय्यकारी होते; यामुळें पाण्डव सुरक्षित राहिले. अनेक भानगडींनंतर अर्धे राज्य पाण्डवांना दिलें गेलें. ते उत्कृष्ट शासक होते, म्हणून त्यांनीं आपलें राज्यैश्वर्य पुष्कळ वाढविलें. हें कांहीं धृतराष्ट्रपुत्रांना साधत नव्हतें. धर्मराजानें राजसूय यज्ञ केला आणि सर्व राजांना जिंकून तो सम्राट् झाला. दुर्योधनाला हें त्याचें ऐश्वर्य पाहवेना. युद्धांत पाण्डवांना जिंकणें तर अशक्यच होतें. म्हणून दुर्योधनानें धर्माला द्यूत खेळायला बोलावून आणलें आणि त्यांत दुर्योधन विजयी झाला. या कपट-द्यूतामुळें पाण्डवांचें सर्व राज्यवैभव दुर्योधनास मिळालें आणि द्यूतांत ठरल्याप्रमाणें पाण्डव वनांत गेले. नियमाप्रमाणें त्यांनीं बारा वर्षे वनवास आणि एक वर्ष अज्ञातवास भोगला. मग परत येऊन त्यांनीं

आपल्या राज्याची मागणी केली. तेव्हां राज्यपदावर आरूढ असलेल्या दुर्योधनानें सांगितलें कीं, "सुईच्या अग्रावर राहील, इतकीही भूमि पाण्डवांना युद्धाशिवाय मिळणार नाहीं." दुर्योधनाचा हा हट्ट हेंच युद्धाचें मूळ कारण होय. त्यावेळीं दुर्योधनाचें जें म्हणणें होतें, त्याचा सारांश पुढें दिलेला आहे–

## ( दुर्योधनाचें म्हणणें

१. आम्ही धृतराष्ट्राचे औरस पुत्र असून धृतराष्ट्र गादीवर बसल्यानन्तर आमचा जन्म झाला आहे. यांमुळें गादीवर आमचा अधिकार आहे

२. पाण्डूनें राज्यत्याग केल्यानन्तर नियोगपद्धतीनें पाण्डवांचा जन्म झाला आहे, ते पाण्डूचे औरस पुत्र नाहींत.

३. आमचे वडील धृतराष्ट्र हे थोरले भाऊ असल्यानें गादीचे खरे अधिकारी तेच आहेत. आणि आम्ही त्यांचे औरस पुत्र असल्यानें गादी आमची आहे.

४. मध्येंच मंत्र्यांच्या संमतीनें पाण्डूला गादी मिळाली होती पण ती मंत्र्यांची अनधिकार चेष्टा होती. कांहीं वेळ पाण्डु गादीवर होता खरा. पण तेवढ्यानें कांहीं पाण्डूचा गादीवरील अधिकार सिद्ध होत नाहीं त्याला गादीवर बसण्याचा हक्क नव्हता. जिथें पाण्डूचाच गादीशीं कांहीं संबंध पोहोंचत नाहीं, तिथें त्याच्या मुलांचा संबंध कसा येणार? आणि त्यात या त्याच्या अनौरस, क्षेत्रज, नियोगजन्य संततीविषयीं तर बोलणेंच नको!

५. पाण्डवाची आचारपद्धतीदेखील विचित्र आहे. या पांचाची मिळून एकच पत्नी आहे या हस्तिनापुर प्रांतामध्यें अशी प्रथा नाहीं. आमचा कुलाचारही असा नाहीं. यामुळें हे गादीचे अधिकारी होऊं शकत नाहींत.

६. ज्याला आम्ही व्यभिचार म्हणतों, तो यांचा दैनंदिन सदाचार आहे. यामुळें हे आमच्या वंशातले नाहींत.

७. द्यूताच्या अटी याच्याकडून पुऱ्या झाल्या नाहींत. या देशात सौर कालगणनापद्धतीप्रमाणें वर्ष मोजलें जातें. त्या पद्धतीप्रमाणें यांचा बारा वर्षांचा वनवासही पूर्ण झाला नाहीं आणि एक वर्षाचा अज्ञातवासही पुरा झाला नाहीं. याप्रमाणें द्यूतांतील अटींप्रमाणें तेरा वर्षे पूर्ण होण्यापूर्वींच हे प्रकट झाल्यामुळें

*

यांना परत बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास भोगला पाहिजे. त्यानंतरच हे राज्याधिकाराची मागणी करूं शकतात. तत्पूर्वी त्यांना तसें करण्याचा अधिकारच नाहीं.

८. द्यूताच्या अटी यांच्याकडून पूर्णपणें पाळल्या गेल्या, तरच आम्ही यांच्या मागणीचा सहानुभूतिपूर्ण विचार करूं; एरवीं नाहीं.

९. तेरा वर्षे वनवास आणि अज्ञातवासांत घालविल्यामुळें यांना राज्यकारभार करण्याचा अनुभव नाहींसा झाला आहे. भारतवर्षाचें हित संरक्षण करण्याचा भार आमच्या डोक्यावर आहे. म्हणून या वनवासीयांच्या हातीं त्यांच्या राज्यकारभाराचीं सूत्रें सोंपविणें आम्हाला इष्टही नाहीं. म्हणून प्रथम यांनीं राज्यकारभार चालविण्यास योग्य बनून नंतर मग राज्य मागण्याकरितां यावें.

१०. जर यांच्यांतें राज्य-संचालनापुरती योग्यता असती तर मग हे राज्यभ्रष्ट तरी कां झाले असते? हे राज्यभ्रष्ट झाले, एवढीच गोष्ट यांची अयोग्यता सिद्ध करण्यास पुरेशी आहे. अशा या नालायकांच्या हातीं जनतेचा राज्यकारभार सोंपवून आम्ही तिचा विश्वास-घात करावा काय? हें कधींच शक्य नाहीं. यामुळें जोंपर्यंत हे राज्य चालविण्यास समर्थ होत नाहींत, तोंपर्यंत यांना राज्य देणें अयोग्य आहे.

हा एकन्दर दुर्योधनाच्या म्हणण्याचा सारांश आहे. यावर पाण्डवाचें जें उत्तर होतें, तें असें कीं—

## पाण्डवांचें उत्तर

१. धृतराष्ट्र हा जरी थोरला भाऊ होता, तरी आंधळा होता. कोणीही आंधळा हा कोठेंही राज्य चालविण्यास योग्य समजला जात नाहीं. म्हणून शास्त्राची अनुकूलता आणि आमचे वडील पाण्डुमहाराज यांची योग्यता व सामर्थ्य या गोष्टींचा विचार करतां त्यांना गादी मिळाली, हेंच योग्य झालें. अर्थात् ते आपल्या स्वतःच्या योग्यतेमुळेंच राजे झाले, कोणाच्या कृपेमुळें नव्हेत. आणि एकदां आमच्या वडिलांचा गादीवरील अधिकार सिद्ध झाला कीं, मग कांहीं विशेष कारण असल्याशिवाय तो नाहींसा होऊं शकत नाहीं. आम्ही त्या

पाण्डुमहाराजांचेच पुत्र असल्यामुळें स्वाभाविक रीतीनेंच राज्याचे अधिकारी आहोंत. शारीरिक वैगुण्यामुळें धृतराष्ट्र हा जन्मतःच अनधिकारी होता, म्हणून त्याचे पुत्रही अनधिकारीच आहेत.

२. आम्ही पाण्डव नियोगजन्य संतति आहोंत,' हें मान्य; पण स्मृतींनीं नियोगजन्य पुत्रांना पितृवित्ताचे अधिकारी मानलें आहे. तीच स्मृति या देशांत चालते. म्हणून तिच्याप्रमाणें आम्ही राज्याचे अधिकारी आहोंत. जर नियोग अप्रमाण असेल, तर मग धृतराष्ट्रही नियोगजन्य पुत्र असल्यामुळें राज्याधिकारी होऊं शकत नाहीं, मग त्याच्या पुत्रांची काय कथा? ज्या कारणानें प्रतिपक्षी धृतराष्ट्राचा राज्यावरील अधिकार मान्य करतात, तेंच कारण आमची योग्यता सिद्ध करण्यास पुरेसें आहे.

३. शारीरिक व्यंगामुळें धृतराष्ट्र हा राज्यावर बसण्यास अयोग्य ठरला. जोंपर्यंत शारीरिक व्यंग कायम आहे, तोंपर्यंत ती अयोग्यताही तशीच राहणार आहे. दुसऱ्या योग्य वीराच्या अभावीं जरी तो गादीवर आला असला, तरी त्याची अयोग्यता दूर झालेली नाहीं. म्हणून त्याच्या पुत्रांनाही गादीवरील अधिकार प्राप्त होत नाहीं. येथें "अयोग्य" चा अर्थ "गादीवर बसण्यास अयोग्य" असा समजावा.

४. कोणत्याहि धर्मशास्त्राप्रमाणें नियोगजन्य पुत्र हा अनधिकारी सिद्ध होऊं शकत नाहीं.

५. आमचा जन्म हिमालयाच्या पुण्य-प्रदेशांत झाला असल्यामुळें आमची आचार-पद्धति तेथील परिस्थितीला अनुकूल अशी आहे. अनेक भावांची एक धर्मपत्नी हा आचार तिकडे आजही रूढ असून, तीच तेथील सनातन धर्ममर्यादा आहे. जसे येथील लोक आर्य आहेत, तसेच हिमालयांतील लोकदेखील आर्यच आहेत. धर्माची गति अत्यन्त सूक्ष्म आहे.

६. देशभेदांप्रमाणें आचारांतही परिवर्तन होत जातें. जरी एका देशाचा आचार दुसऱ्या देशाच्या आचाराहून भिन्न असला, तरी त्यामुळें तो निंद्य ठरूं शकत नाहीं. त्याची योग्यायोग्यता ठरवितांना त्या देशांतील आप्त पुरुष त्या

आचारांविषयीं काय म्हणतात, तें पाहिलें पाहिजे.

७. द्यूताच्या वेळच्या अटींचें आम्ही संपूर्णपणें पालन केलें आहे. त्यावेळीं वर्षगणना सौरपद्धतीनें व्हावी, असें काहीं ठरलें नव्हतें. आम्ही चान्द्र वर्ष मानतों. म्हणून चान्द्र-वर्ष-गणनेप्रमाणें तेरा वर्षांची अट पूर्ण झाली आहे; आणि म्हणून आमचें राज्य आम्हाला परत मिळालें पाहिजे

८. अटी पाळण्यांत कोणताही दोष राहिलेला नाहीं.

९. वनवास आणि अज्ञातवास यांमुळें आमच्यांत कोणताही दोष निर्माण झाला नाहीं; उलट आम्ही शीतोष्णादि सहन करण्यांत नगरवासीयांपेक्षां अधिक योग्य झालों आहोंत. त्यामुळें आमची सहनशक्ति अधिक वाढली आहे. *वनवासांत असतांना गंधर्वांनीं धृतराष्ट्र-पुत्रांचा पराजय केला, त्यावेळीं आम्हींच त्यांना सोडविलें होतें;* आणि उत्तर-गोग्रहणाचे वेळीं आम्हीं धृतराष्ट्र-पुत्रांचा *पराभव करून त्यांच्यावर विजय मिळविला होता. हीं दोन प्रमाणें आमची* योग्यता सिद्ध करण्यास पुरेशीं आहेत. यामुळें राज्य सांभाळण्यास आम्हीच अधिक योग्य आहोंत, हें सिद्ध होत आहे.

१०. धृतराष्ट्र-पुत्रांनीं कपटानें आमचें राज्य हिसकावून घेतलें होतें, पराक्रमानें नव्हे. *त्यांनीं भरसभेंत आमच्या पत्नीवर वस्त्रहरणाचा अत्याचार केला;* आणि आम्हाला लाक्षागृहांत जाळण्याचा प्रयत्न केला या क्रूर पापांमुळें तेच आततायी आहेत, असें सिद्ध झालें आहे. म्हणून आततायी लोकांना राज्यभ्रष्ट करणेंच योग्य आहे. आमच्या धर्म-पालन-तत्परतेमुळें आमचा राज्याधिकार *सिद्ध झाला आहे आणि त्यांच्या आततायीपणामुळें ते अयोग्य* ठरले आहेत. म्हणून पाण्डवांचें राज्य त्यांना परत मिळालेंच पाहिजे. शिवाय पाण्डवांनीं राजसूययज्ञद्वारा सम्राट्पद मिळविलें होतें. धृतराष्ट्र-पुत्रांनीं कांहीं तें मिळविलें नाहीं.

× × ×

पाण्डवांचे म्हणणें थोडक्यांत हें असें होतें. परन्तु राज्य, सैन्य, द्रव्य, अधिकारी हें सगळें धृतराष्ट्रपुत्रांच्या स्वाधीन होतें. यामुळें केवळ आपलें म्हणणें

खरें ठरलें म्हणून तेवढ्यावरच पाण्डवांचें राज्य त्यांना परत मिळणें अशक्य होतें. राजेलोक सुमत्या कौरव्या सांगण्यानें कधींच ऐकत नसतात. अगदीं तीच गोष्ट या बाबतींतही खरी ठरली. भगवान् श्रीकृष्ण जेव्हां शिष्टाई करण्याकरितां धृतराष्ट्राच्या सभेंत गेले, तेव्हां दुर्योधनाच्या मुखांतून "युद्धाशिवाय सुईच्या अग्रावर मावेल इतकीही भूमि मिळणार नाहीं" असे शब्द बाहेर पडले. या एवढ्या मोठ्या अन्यायानन्तर युद्ध करणें अपरिहार्य झालें. दोन्ही पक्ष युद्धाची सिद्धता करूं लागले. पाण्डवांचें ७ अक्षौहिणी आणि कौरवांचें ११ अक्षौहिणी अशीं सैन्यें तयार झालीं. याच वेळीं धृतराष्ट्रानें पाण्डवांना भ्रमांत पाडण्याकरितां एक कपटजाल रचलें. तें असें—

## धृतराष्ट्राचें कपटजाल

युद्ध अनिवार्य आहे, असें पाहिल्यावर धृतराष्ट्रानें संजयाला पाण्डवांच्या छावणींत पाठवून त्याच्याकडून पाण्डवांना निवृत्तिपर उपदेश करविला आणि त्यांना युद्धापासून निवृत्त करण्याचा प्रयत्न केला. पाण्डव हे धार्मिक प्रवृत्तीचे असल्यामुळें त्यांच्यावर धार्मिक उपदेशाचा परिणाम चांगलाच होईल, हें धृतराष्ट्र जाणून होता. धृतराष्ट्राच्या प्रेरणेनें संजयानें पाण्डवांना पुढील उपदेश केला. ( पहा, म. भा. उद्योग प. अ. २० ते ३२ )

"पाण्डवहो! धृतराष्ट्र सर्वदा तुमचें हितच इच्छीत असतो. पण तो वृद्धपणामुळें असहाय्य झाला आहे. दुर्योधन त्याचें ऐकत नाहीं, यामुळें धृतराष्ट्र रात्रंदिवस दुःखी असतो. पाण्डव हो, तुम्ही त्याच्या स्थितीचा तर विचार करा! तो रात्रंदिवस तुमच्या कल्याणाचीच चिन्ता करीत असतो. पण तुम्हीं हें काय माण्डलें आहे? तुमच्यासारख्या सात्त्विक आणि धार्मिक पुरुषानीं युद्धास सिद्ध व्हावें, हें खरोखरीच एक मोठें आश्चर्य आहे! युद्ध हें तर कसायाचें काम आहे, तुमच्यासारख्या धार्मिकांचें उचितच नव्हे. तुम्हीं धर्म, सत्व, शान्ति यांच्या पालनाचें व्रत घेतलें असल्यामुळें दुर्योधनास क्षमाच करावी. पण काय तुम्ही आपल्या भावाची कत्तल करणार? आणि हें सगळें कशाकरितां ? ऐहिक क्षणभंगुर दुःखमय असार संसाराकरितां तुम्हीं सगळ्या आशांचा बंध करणार

काय ? अरेरे ! काय आजपर्यंतच्या तुमच्या धर्मपालनाचें हेंच फळ ? हें विश्व आणि यांतले भोग, हे दोन्ही नश्वर आहेत. भावांचा आणि गुरुजनांचा वध करून मिळविलेलें राज्य तुमच्याजवळ चिरस्थायी होऊन राहील काय ! आपल्या *संबंधीयांच्या रक्तानें माखलेले भोग भोगून तुम्हाला आनन्द होईल काय ?* क्षणभंगुर भोगाच्या इच्छेनें या सर्वांचा वध करण्याकरितां तुमच्यासारख्या धार्मिकांनीं सिद्ध व्हावें, हीच मोठी आश्चर्याची गोष्ट आहे ! आपल्या, भावांचा वध करून तुम्ही चिरंजीव व्हाल काय ? काय तुम्हाला मृत्यूची भीति वाटत नाहीं ? मग तुम्ही परलोक-साधन करण्याऐवजीं युद्धरूप कसायाचें काम करून नरकाची साधना कां करीत आहांत ? मनुष्य तर भीक मागूनही जिवन्त राहूं शकतो आणि धर्मसाधन करूं शकतो. अशाश्वत आणि मायामय असार संसाराच्या क्षणभंगुर भोगांत फसून तुम्ही या भयानक क्रूर संहारास प्रवृत्त झाला आहांत. हें तुम्हास इहलोकीं तर निन्दनीय आहेच, पण परलोकांतही हें बाधक होऊन बसेल. म्हणून या घोर कर्मापासून तुम्ही निवृत्त व्हा. क्षत्रियांचा धर्म मोठा वाईट आहे. नव्हे, तें पापच आहे. म्हणून त्याचा त्याग करून, वनांत जाऊन तप करा आणि पुण्य मिळवून परलोकांतील शाश्वत सुख प्राप्त करून घ्या. या घोर युद्धामुळें तुमच्या हातास इहलोकांतील निन्दा, आणि परलोकांतील बाधा, याहून कांहींही लागणार नाहीं. म्हणून तुम्ही युद्धापासून निवृत्त व्हा.''

अशा प्रकारें संजयानें पाण्डवांना युद्धापासून निवृत्त होण्याविषयीं जो उपदेश केला, त्याचा परिणाम अर्जुनाच्या मनावर स्थायी रूपानें झाला. यामुळें जेव्हां त्याला युद्धांत दोन्ही बाजूंना आपले भाऊ, गुरुजन आणि संबंधी दिसले आणि *या युद्धांत हे मारले जातील अशी जेव्हां त्याची खात्री झाली,* तेव्हां त्यानें शस्त्रास्त्रें फेंकून दिलीं, आणि "युद्ध करणार नाहीं," असें म्हणून तो युद्धापासून निवृत्त झाला. कपटी धृतराष्ट्र संजयाकडून पाण्डवांना उपदेश करवून जें घडवूं इच्छीत होता, नेमकें तेंच अर्जुनानें केलें. युद्धनिवृत्तीचीं कारणें सांगतांना अर्जुनानें भगवान् श्रीकृष्णाजवळ संजयानें सांगितलेल्या तत्त्वांचाच उल्लेख केला.

वीर अर्जुन युद्धापासून निवृत्त झाला, हें पाहून भगवान् श्रीकृष्ण आश्चर्य-

चकित झाले! अर्जुन असें करीलसें त्यांना वाटलें नव्हतें. पण जें नको होतें, तेंच नेमकें झालें!

धृतराष्ट्र या अर्जुनाच्या युद्ध-निवृत्तीचीच वाट पहात होता. म्हणून दोन्ही सैन्यें सिद्ध झाल्याचें ऐकून त्यानें मोठ्या उत्कण्ठेनें संजयास विचारलें–

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः।**
**मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥**

या श्लोकांत धृतराष्ट्र विचारतो की, 'माझे आणि पाण्डूचे पुत्र युद्धाच्या इच्छेनें कुरुक्षेत्रांत एकत्र जमल्यावर मग काय झालें?' या प्रश्नांत संजयाकडून करविलेल्या उपदेशाचा पाण्डवांवर योग्य परिणाम झाला की नाहीं, असें धृतराष्ट्राला विचारावयाचें आहे.

साम्राज्यवादी लोक अनेक युक्तिप्रयुक्तींनीं जित लोकांचीं मनें आपल्या आधीन करून घेऊं इच्छितात. त्या युक्तींत जितांवर धर्मवचनांचा प्रयोग करून त्यांना निवृत्तिमार्गाला लावणें याचाही अन्तर्भाव होतो. पाण्डवांना युद्धापासून निवृत्त करण्याकरिता धृतराष्ट्रानें याच युक्तीचा अवलम्ब केला होता, आणि तिचा अर्जुनावर चांगलाच परिणाम दिसून आला! अर्जुनानें युद्ध न करण्याचा निश्चय केल्यामुळें धृतराष्ट्राचे मनोरथ सफल झाले!!

युद्धाच्या प्रारम्भीं धृतराष्ट्र मोठा चिन्तित असलेला दिसून येतो. साम्राज्यवादी लोकांच्या मनाला चिंतेचें भूत नेहमींच भिववीत असतें. कारण पाशवी बलानें संपादित, संवर्धित आणि संरक्षित अशा साम्राज्यात जे दलित लोक राहतात, त्यांच्यामध्यें क्रान्तीची ज्वाला केव्हा उद्भवेल, याचा कांहीं निश्चय नसतो. धृतराष्ट्रांलाही हीच काळजी लागलेली होती.

अर्जुन युद्धापासून निवृत्त झाल्यामुळें पाण्डव पूर्णपणें उदासीन झाले व कौरवपक्षीयास अत्यानन्द झाला. अशा वेळीं पाण्डव-पक्षाचे पुढारी भगवान् श्रीकृष्ण यांनीं अर्जुनाला युद्धाचे हेतु समजाऊन सांगून त्याला युद्ध करण्यास प्रवृत्त केलें. ही घोषणा करण्यांत एकट्या अर्जुनाला समजवावें हाच हेतु नव्हता, तर अर्जुनाच्या मिषानें भगवन्तांना विश्वकल्याणार्थ आपल्या उद्देशाची घोषणा

करावयाची होती; म्हणूनच या घोषणेला विशेष महत्त्व आहे. आतां या घोषणेंतील कांही महत्त्वपूर्ण वचनें पाहूं.

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥

(भ. गी. ४।८)

## युद्धाचे हेतु

१. आम्ही सज्जनाचें संरक्षण करूं,

२. आम्ही दुष्टांचा नाश करूं,

३. आम्ही मानवी व्यवहाराची उत्तम व्यवस्था लाऊं,

४. प्रत्येक विग्रहाचे वेळीं आमचा हाच उद्देश असेल.

ही घोषणा जगात मानवाच्या कल्याणाच्या उद्देशानें केली गेली आहे. पीडित जनतेसाठीं हें आश्वासन आहे. पाण्डवांनीं राज्यभ्रष्टतेचा अनुभव घेतला होता; राज्यभ्रष्ट झाल्यामुळें त्याचे सद्गुण लोप पावले होते; त्यांना कशाचीही आशा उरली नव्हती, अशा वेळीं ही घोषणा केली गेली. धृतराष्ट्राच्या राज्यात सज्जन सुरक्षित नव्हते, दुष्ट लोक प्रबल झाले होते, मानवाच्या सुरक्षिततेविषयीं कोणत्याही प्रकारची शाश्वती नव्हती, राज्यकर्ते धड आपली वचनेंही पाळीत नसत, अशी सगळीकडे अव्यवस्था झाली होती. ही दूर करण्याचा हेतूनेंच ही घोषणा केली गेली. धृतराष्ट्राच्या राज्यात सर्वांकडे समदृष्टीनें पाहिलें जात नसे म्हणून भगवन्तांनीं घोषणा केली कीं—

## सम–भाव

विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि।
शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः ॥

(भ. गी. ५।१८)

५. विद्वान् ब्राह्मण, गाय, हत्ती, कुत्रा, चाण्डाल यांवर आमची समदृष्टि राहील.

विद्याविनयसंपन्न असा श्रेष्ठकुलोत्पन्न ब्राह्मण आणि नीच कुळात उत्पन्न झालेला कुत्र्याचें मांस खाणारा चाण्डाल, या दोघांच्या मध्यें क्षत्रिय, वैश्य, शूद्र या सर्वांचा अन्तर्भाव झालेला आहे; व पशूंत गाईपासून कुत्र्यापर्यंत सर्व पशूही आले. या घोषणेचा अर्थ असा कीं, आमच्या राज्यव्यवस्थेंत या सर्वांकडे सम दृष्टीनें पाहिलें जाईल. अधिक विद्येमुळें ब्राह्मणाचा पक्षपातही केला जाणार नाहीं आणि अज्ञानामुळें चाण्डालाचा तिरस्कारही होणार नाहीं. सर्वांचें पालन, सुरक्षितता, आणि उन्नति याकरितां त्यांना सारखीच संधी मिळेल. यानंतर—

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।
साधुरेव हि मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥
मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥

( भ. गी. ९।३०,३२ )

## दुराचाऱ्याची उन्नति

६. दुराचारी मनुष्यही आमच्या शासन-पद्धतीमध्यें आला व तो आमच्या व्यवस्थेप्रमाणें चालूं लागला, तर त्याला साधु गणलें जाईल.

## सर्वांची उन्नति

७. पापयोनींत निर्माण झालेले नीच जातीचे लोक, वैश्य, शूद्र आणि स्त्रियाही आमच्या व्यवस्थेप्रमाणें परम श्रेष्ठ योग्यता प्राप्त करून घेऊं शकतील. त्यांच्या उन्नतींत कोणत्याही प्रकारचा अडथळा आणला जाणार नाहीं.

याप्रमाणें वैश्य, शूद्र, अन्त्यज व स्त्रिया, या सर्वांची समभावानें उन्नति होण्याचा मार्ग या पद्धतीनें मोकळा झाला आहे. त्याचप्रमाणें—

## योगक्षेमाची जबाबदारी

अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥

( भ. गी. ९।२२ )

८. अनन्य होऊन जो मनुष्य आमच्या या योजनेंत नित्य निरन्तर सम्मीलित होऊन कार्य करीत राहील, त्याच्या योगक्षेमाचा भार आमच्यावर राहील.

याप्रमाणें आपल्या व्यवस्थेंत संमीलित होणाऱ्यांची सुव्यवस्था करण्याचें अभिवचन देऊन त्यांना निश्चिन्त केलें आहे. त्यांनीं निश्चित होऊन आपापलीं कर्में योग्य रीतीनें करीत असावें. त्यांच्या पालनपोषणाची व्यवस्था आणि त्यांच्या घरदाराची चिन्ता करण्याचा भार या घोषणेनें शासनसंस्थेनें उचलला आहे. याप्रमाणें येथें पोषणाचें वचन देऊन कार्यकर्त्यांची चिन्ता दूर केली आहे.

## स्वकर्मानें सिद्धि

स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥

(भ गी १८।४६)

९. आपल्या कर्मानें त्याची पूजा करणारास उत्तम सिद्धि प्राप्त होईल.

जो मनुष्य जें सत्कर्म योग्य रीतीनें करूं शकतो, तें त्यानें आमच्या शासनव्यवस्थेंत येऊन करावें. त्यामुळें त्याची निश्चयानें उन्नति होईल. याप्रमाणें प्रत्येक अवस्थेंतील मनुष्य आणि प्रत्येक चांगलें काम करणारा मनुष्य आपली उन्नति करून घेऊं शकेल, असा विश्वास या घोषणेच्या द्वारें सर्वांच्या अन्तःकरणांत निर्माण करण्यांत आला आहे.

## कौशल्यानें कर्म करा

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।
मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥
योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ।
सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥
तस्माद्योगाय युज्यस्व योग कर्मसु कौशलम् ॥५०॥

(भ. गी. २)

१०. तुम्ही आपलें कर्म अत्यन्त कौशल्यानें सिद्धि–असिद्धीचा विचार न करतां करा. कर्माचें फल प्राप्त व्हावें, असा हेतुही मनांत धरूं नका. कर्म न

करण्याकडेही आपली प्रवृत्ति होऊं देऊं नका.

आमच्या व्यवस्थेत येऊन कार्य करणारांची पद्धति अशी असावी- जें काम करायचें त्यांत कौशल्याची पराकाष्ठा करावी. त्यांत कोणत्याही प्रकारें अनास्था दाखवूं नये. अशा कार्यकर्त्यांच्या योगक्षेमाची चिन्ता आम्हीं करूं.

भगवद्गीतेंत या दहा घोषणाच आहेत असें नव्हे, तर आणखीही कित्येक महत्त्वपूर्ण घोषणा गीतेंत आहेत. येथें केवळ उदाहरणाकरिता दहा घोषणा दिल्या आहेत. भगवद्गीता हें एक काव्य आहे. म्हणून त्यावरचें कवित्वाचें आवरण हळूवार हातानें काढून टाकलें पाहिजे. तसेंच ' धर्मसंस्थापना ' या शब्दाचा अर्थ ' मानवांची धार्मिक, राजकीय, सामाजिक, औद्योगिक इत्यादि विषयांतील उन्नतीची सुव्यवस्था ' असा समजला पाहिजे आणि हा अर्थ ग्रहण करून समग्र या गीतारूपी घोषणेचा विचार करणें उचित आहे अशा रीतीनें विचार केला म्हणजे असें समजून येईल कीं, या ग्रंथांतील घोषणांचा मानवी उन्नतीशीं अत्यंत निकट संबंध आहे.

यापुढें आता क्रमानें या घोषणांचा विचार करावयाचा आहे



# श्रीमद्भगवद्गीतेंतील
# कांहीं पारिभाषिक शब्दांचे अर्थ

श्रीमद्भगवद्गीता हें एक शास्त्र आहे. यासंबंधीं गीतेंतच असा उल्लेख आहे कीं—

इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।
एतद् बुद्ध्वा बुद्धिमान् स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥
( भ. गी. १५।२० )

यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।
न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥
तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥
( भ. गी. १६।२३–२४ )

" हे निष्पाप अर्जुना ! हें अत्यन्त गुह्य शास्त्र मीं तुला सांगितलें आहे. हें जाणून मनुष्य बुद्धिमान् आणि कृतकृत्य होतो. जो या शास्त्रविधीचा त्याग करून मनाला वाटेल तसें वागतो, त्याला सिद्धि, सुख आणि श्रेष्ठ गति यांपैकीं एकही प्राप्त होत नाहीं. म्हणून कार्य आणि अकार्य यांचा विचार करतांना तुला हेंच शास्त्र प्रमाण मानणें योग्य आहे. याकरितां या शास्त्राच्या विधानानें जो सिद्धान्त ठरेल, तोच आचरणें तुला उचित होईल. "

शिवाय प्रत्येक अध्यायाच्या अन्तीं असणाऱ्या संकल्पांत गीतेचा "योगशास्त्र" असा निर्देश केला आहे. यावरून असें ठरतें कीं, भगवद्गीता हें एक शास्त्र आहे. प्रत्येक शास्त्राची एक स्वतन्त्र परिभाषा असते. तिचें ज्ञान करून घेतल्याशिवाय जर त्या शास्त्राचें अध्ययन केलें, तर त्या अध्ययनानें त्या शास्त्राचें यथार्थ

ज्ञान होऊं शकत नाहीं. म्हणून गीताशास्त्राच्या परिभाषेचें ज्ञान करून घेतलें पाहिजे. आतां आपण त्याचा उपक्रम करूं.

## धर्म-संस्थापना

'जेव्हां जेव्हां धर्मास ग्लानि येते आणि अधर्माची वाढ होते, तेव्हां महात्मे जन्म घेतात,' असें एक विधान गीतेंत आहे—

> यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
> अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥
> परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
> धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥

(भ. गी. ४)

'सज्जनांचें संरक्षण, दुष्टांचा नाश आणि धर्माची स्थापना करण्याकरितां महात्मे प्रत्येक युगांत अवतीर्ण होतात.' या श्लोकांत **'धर्माची ग्लानि,' 'अधर्माचें आक्रमण' आणि धर्माची स्थापना'** हीं पदें मोठ्या महत्त्वाचीं आहेत. *भगवान् श्रीकृष्णांनीं ज्या धर्माची संस्थापना केली,* तो धर्म माननीय झरतुष्ट्राचा पारशी धर्म, पै० येशूचा ख्रिस्ती धर्म, पू० मोहमद पैगंबराचा मोहमदीय धर्म, भगवान् बुद्धाचा बौद्ध धर्म किंवा पू० महावीरांचा जैन धर्म, यांच्यासारखा आहे कीं काय, हें पाहणें अवश्य आहे.

पूर्वोक्त धर्मांप्रमाणें *भगवान् श्रीकृष्णांनीं कोणत्याही धर्माची स्थापना केलेली* नाहीं, हें सर्वांस माहीतच आहे भगवान् श्रीकृष्णाना कोणी धर्माचार्य म्हणत नाहीं. पण ते **'विशिष्ट व्यवस्थेचे निर्माते'** होते, हें मात्र सत्य आहे. ती व्यवस्था कोणती होती, तें समजल्यावर धर्मसंस्थापना म्हणजे काय, हें कळून येणें संभवनीय होईल. म्हणून आतां आपण या जनपदाच्या व्यवस्थेचा विचार करूं. *भगवान् श्रीकृष्णांनीं गीतेंत सांगितलेली आपली परंपरा अशी आहे*– "मी (आदित्यांतला विष्णु), विवस्वान्, मनु, इक्ष्वाकु, अनेक राजर्षि, भगवान् श्रीकृष्ण, अर्जुन." ही परम्परा गीतेंत चवथ्या अध्यायांतील पहिल्या व दुसऱ्या

श्लोकांत सांगितली आहे.

' आदित्यानां अहं विष्णुः । ' ( गी. १०।२१ ) आणि—

' पाण्डवानां धनंजयः । ' [ गी. १०।३७ ]

असेंही विभूतींचें वर्णन गीतेंत केलेलें आहे. आरंभीं जें ज्ञान विष्णूनें विवस्वानास सांगितलें होतें, तेंच मनु, इक्ष्वाकु व अनेक राजर्षींच्या परम्परेनें भगवान् श्रीकृष्णांपर्यंत येऊन पोहोंचलें आणि त्याच ज्ञानाचा उपदेश या युद्धप्रसंगी ते अर्जुनाच्या द्वारें सर्व जगास करीत आहेत. ही क्षत्रियांची परम्परा आहे. यापैकीं एकही क्षत्रिय वीर येशू ख्रिस्त किंवा बुद्धाप्रमाणें धर्मप्रवर्तक नव्हता. हे सगळे राज्यकारभार व्यवस्थित चालविणारे श्रेष्ठ राजे होते. यांना राज्यकारभार करतांना युद्धें करणें, दुष्टांना शासन करणें, प्रजेचें पालन करणें इत्यादि कर्तव्यें करावीं लागत. यांपैकीं एकही शमदमादींच्या द्वारें तप करून शरीर कृश करण्यांत प्रसिद्ध असलेला असा ब्राह्मण नव्हता. जर शमदमादि साधनेंच भगवन्तास इष्ट असतीं, तर अर्जुन तींच आचरण्याची इच्छा करीत होता! एवढेंच नव्हे तर तो वनांत जाऊन कन्दमुळें खाऊन देह क्षीण होईल, असें तपही आचरण्यास तयार झाला होता. परन्तु भगवान् श्रीकृष्णांनीं त्याला त्यापासून निवृत्त केलें, आणि युद्ध करून राज्यव्यवस्था करायला लावलें. विवस्वान्, मनु, इक्ष्वाकु इत्यादि राजर्षींनीं हेंच राज्यव्यवस्थेचें कार्य केलें, ही कथा इतिहासप्रसिद्ध आहे. या ठिकाणचें राजर्षि पद " **राजांमध्यें श्रेष्ठ** " असा अर्थाचें वाचक आहे. " राजांमध्यें शमदमादि तपसाधनें करणारा राजा " हा अर्थ त्यांतून निघत नाहीं. जो राजा आपलें राज्य उत्तम रीतीनें चालवितो, प्रजाजनांचें पालन, पोषण आणि उन्नति यांची उत्कृष्ट व्यवस्था करतो, तो राजर्षि अर्थात् राजांतील उत्तम राजा होय या शब्दांतील ऋषि हें पद श्रेष्ठतेचें द्योतक आहे. भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनास ज्या ज्ञानाचा उपदेश केला, तें ज्ञान अशा श्रेष्ठ राजांच्या शासनव्यवहारामध्येंच जीवित आणि जागृत होतें. मध्यंतरीं त्याचा लोप झाला होता; श्रीकृष्णांनीं त्याचा पुनरुद्धार केला.

या विवेचनावरून हें स्पष्ट होईल कीं, गीतेंतील ' धर्म ' हें पद

" राज्यशासनाच्या सुव्यवस्थेसाठीं आवश्यक असणाऱ्या कर्तव्यांचा बोध " करीत आहे. याविषयीं गीतेंतील आणखी एक वचन पाहण्यासारखें आहे—

राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।
प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ ( भ. गी. ९।२)

' हें भगवद्गीताशास्त्र राजांची विद्या आहे, हें राजाचें गुह्य ज्ञान आहे. हें पावित्र्य-प्रदान करणारें आहे. हें प्रत्यक्ष अनुभव देणारें आहे. हें धर्मरूप, सहज आचरतां येण्याजोगें आणि (-अव्ययं=economical) ज्याच्या आचरणाला फारशा खर्चाची आवश्यकता नाहीं, अशा प्रकारचें आहे.' येथें गीतेंत सांगितलेल्या विद्येला ' **राजविद्या** ' आणि ' **राजगुह्य** ' असें म्हटलें आहे. पुष्कळ टीकाकारांनीं या पदाचे अर्थ ' श्रेष्ठ विद्या आणि श्रेष्ठ गुह्य ' असे केले आहेत परन्तु पूर्वोक्त परम्परेचा विचार करतां हें स्पष्ट दिसतें कीं, हें राजश्रेष्ठांचें राज्यशासन-विषयक ज्ञान आहे; आणि त्या राज्यशासनव्यवस्थेंतील गुह्यांचा संग्रह या ग्रंथांत केला आहे.

या संबंधांत वेदांतील कांहीं प्रमाणें पाहण्याजोगीं आहेत.'**धर्माय सभाचरं**' (वा. य. ३०।६, काण्व. ३४।६ ) ' धर्म जाणण्याकरितां राजसभेंतील सभासदांना जाऊन भेटा.'जर कोणाला धर्मासंबंधीं म्हणजे राज्यशासन-व्यवस्थेसंबंधीं कांहीं शंका असेल, तर त्यानें राजसभेंतील सुयोग्य सभासदाला भेटून त्यासंबंधीं माहिती प्राप्त करून घ्यावी. या वेदवचनानें धर्म शब्द अधिकच स्पष्ट झाला. त्याचा येथील अर्थ ' राज्यशासनसंबंधीं कर्तव्य ' असा आहे. हेंच राजाच्या यशाचें रहस्य आहे. आणि यासंबंधीं माहिती मिळण्याचें स्थान राज्यशासक सभेचे सभासद हेंच आहे, भगवान् श्रीकृष्ण ज्या धर्माच्या संस्थापनेकरितां कटिबद्ध झाले होते, ती संस्थापना म्हणजे राज्यशासनाची सुव्यवस्थाच होती आणि तिच्यांतील कांहीं वैशिष्ट्यें प्रत्यक्ष कृतींत आणण्याकरितांच भगवान् श्रीकृष्णाचें जीवन व्यतीत होत होतें, हें इतिहासांत सुप्रसिद्ध आहे. एकदां ही गोष्ट सिद्ध झाली, म्हणजे यांत कोणकोणत्या सिद्धांताचा अन्तर्भाव होतो, तें पाहिलें पाहिजे.

राज्यशासनाची सुव्यवस्था याचा अर्थ राज्यांतील सर्व प्रकारच्या राजकीय, सामाजिक, धार्मिक, औद्योगिक जीवनाची सुव्यवस्था, असाच आहे. महाभारतावरून असें दिसून येतें कीं, जेथें पाण्डव राज्य करीत असत, तेथें नवीं नवीं गांवें वसत असत, आणि लहान खेड्यांत सुधारणा होऊन त्यांचीं मोठीं नगरें होत असत याच्या उलट कौरवाच्या राज्यांत नगरांतील जनसंख्या कमी होत असे. याचें कारण राज्यशासनपद्धतींतील भिन्नता हेंच होय.

भगवान् श्रीकृष्ण या शासन-व्यवस्थेंत आणखीही कांहीं विशेष उत्तम सुधारणा करूं इच्छीत होते, आणि या कामाकरितां त्यांनीं अर्जुनाला आपल्या हातीं धरलें होतें. अर्जुन जेव्हां 'मी युद्ध करणार नाहीं, ' असें म्हणूं लागला, तेव्हां भगवान् श्रीकृष्णांनीं त्याला सांगितलें कीं, ' तूं या युद्धांत केवळ निमित्तमात्र होऊन उभा रहा. '

मयैवेते निहताः पूर्वमेव
निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ (भ. गी. ११।३३)

' हे शत्रु मेलेले आहेत. येथें तूं केवळ निमित्तासाठीं उभा रहा.' जर तूं युद्ध करणार नसलास तर तेवढ्यानें हें युद्ध थांबणार नाहीं, तुझ्या ठिकाणीं दुसरा योद्धा येऊन उभा राहील, इतकेंच आतां हें युद्ध टळणार नाहीं.

' विशेष रीतीनें धर्म-संस्थापना करण्याकरितांच ' भगवान् श्रीकृष्णांनीं विश्वव्यापक योजना आंखण्याचें ठरविलें होतें आणि म्हणूनच त्यांनीं अर्जुनास ' **राजविद्या** ' आणि ' **राजगुह्य** ' यांचा उपदेश केला होता. म्हणून ' राजविद्या ' आणि 'राजगुह्य ' यांचा अर्थ ' राज्यशासनाची विद्या ' आणि 'राज्यशासनाचें गुह्य' असाच आहे भगवान् श्रीकृष्ण जी धर्मसंस्थापना करूं इच्छीत होते, ती जनतेच्या विशिष्ट राज्यशासनासंबंधींची योजना होती. समाजाची चार वर्ण आणि चार आश्रम अशी वर्णाश्रमव्यवस्था केलेली आहे. त्यांच्या कर्तव्याचा विचार करूं जातां या व्यवस्थेंत कोणकोणतीं कर्तव्यें अन्तर्भूत होतात, तें कळणें सहज शक्य आहे, म्हणून आतां त्यांचा विचार करू

## चार वर्णांची व्यवस्था

आर्यांच्या समाजव्यवस्थेंत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र असे चार वर्ण आहेत. धर्मसंस्थापनेमुळें या चारही वर्णांची सुव्यवस्था झाली पाहिजे. त्याच-प्रमाणें ज्या लोकांचा समावेश या चार वर्णांत होत नाहीं, त्यांना आपण अवर्गीकृत, अंत्यज, निषाद किंवा आणखी एखादें नांव देऊं. हे लोक चातुर्वर्ण्य-व्यवस्थेच्या बाहेर असूनसुद्धां राष्ट्रांत त्यांचें एक स्थान असल्यामुळें त्यांचीही व्यवस्था लागली पाहिजे. गीतेच्या पांचव्या अध्यायांतील अठराव्या श्लोकांत **'पण्डित आणि श्वपाक (चाण्डाल)'** यांना सम दृष्टीनें पाहण्याविषयीं घोषणा केलेली आहे. त्याचप्रमाणें गीतेच्या नवव्या अध्यायाच्या बत्तिसाव्या श्लोकांत केलेली **" पापयोनि आणि शूद्रांनादेखील** उन्नति करण्यास पूर्ण अवसर दिला जाईल, " ही घोषणाही 'भगवान् श्रीकृष्णांनीं धर्मसंस्थापनेंत अन्त्यजांच्या उन्नतीचा समावेश केला होता,' असेंच सिद्ध करीत आहे. 'श्वपाक' आणि ' पापयोनि ' हीं नांवें चातुर्वर्ण्याबाहेरील जातींचीं आहेत.

वेदमन्त्रांत नरमेधाच्या प्रसंगीं सर्व वन्य जातींना यज्ञमण्डपांत आणून सगळ्यांच्या उन्नतीबरोबर त्यांच्याही उन्नतीचें साधन करावें, असें स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे. या सनातन वैदिक समाजपद्धतीचें पुनरुत्थान गीतेंत केलें गेलें आहे. अर्थात् पापयोनींच्या संपूर्ण उद्धाराची योजनाही या धर्मसंस्थापनेंत आहेच.

## चारही वर्णांचीं कार्यें

मनुष्याची उन्नति कर्मानेंच होऊं शकेल. मनुष्यामध्यें जशी कर्तृत्व करण्याची शक्ति असेल, तशी त्याची उन्नति होईल. याकरितां या चारही वर्णांच्या उन्नतीकरितां गीतेचा काय कार्यक्रम आहे, तें आतां पाहूं.

**१. ब्राह्मणाचीं कर्में**– शम, दम, तप, शुद्धता, क्षान्ति ( क्षमा करणें ), सरळपणा, ज्ञान, विज्ञान, आस्तिक्य ( ईश्वरावर विश्वास ) हीं नऊ कर्में ब्राम्हणानें करावयाचीं आहेत–

**शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च ।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥** ( गी. १८।४२ )

*

यापैकीं जनतेंत ज्ञान आणि विज्ञान यांचा प्रसार करण्याची शैक्षणिक व्यवस्था राज्यसंस्थेच्या द्वारें पाठशाला, विश्वविद्यालयें इत्यादींच्या सहाय्यानें होऊं शकेल. तसेंच नगराची स्वच्छता करण्याचेंही काम स्थानिक संस्थेकडून होऊं शकेल. ज्ञान आणि विज्ञान यांचा यथायोग्य प्रसार झाल्यावर बाकी राहिलेलीं कामें मनुष्य आपल्या उन्नतीसाठीं स्वतःच करून घेईल. कारण तीं सर्व कामें ज्ञान-विज्ञानावर अवलंबून आहेत. हे नऊ गुण मनुष्याच्या सभ्यतेची कसोटीच आहेत.

**२. क्षत्रियाचीं कर्में**- शौर्य, तेजस्विता, धैर्य, दक्षता, युद्धांतून परावृत्त न होणें, दान, राज्याचें शासन करणें, हीं सात कर्में क्षत्रियाचीं होत—

शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।
दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ।।
(गी. १८।४३)

युद्धशास्त्राच्या उत्तम शिक्षणानें आणि नियमित राहणीच्या अभ्यासानें समाजांत हे गुण वाढवितां येतील, राज्यसंस्थेच्या द्वारें ह्या कर्मांचें शिक्षण देणें योग्य होईल.

**३. वैश्यांचीं कर्में**— शेती, गो-रक्षण आणि व्यापार हीं वैश्यांचीं कर्में आहेत—

कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यं कर्म स्वभावजम् ।
(गी. १८।४४)

या तिन्ही धंद्यांचें शिक्षणही राज्यसंस्थेकडून दिलें जाणें योग्य आहे. शेती, गोरक्षण, व्यापार-व्यवहार, पैशाची देवघेव इत्यादींचें शिक्षण देणारीं मोठमोठीं विद्यालयें चालू करून हें काम होऊं शकेल.

**४. शूद्राचीं कर्में**- शूद्राचे वर्ग दोन; एक सच्छूद्र व दुसरा असच्छूद्र. यांतला पहिला वर्ग विविध कलांच्या द्वारें आपलें उदरंभरण करतो '**शिल्पैर्वा विविधैर्जीवेत्**' असें स्मृतिवचनही आहे आणि दुसरा वर्ग पहिल्या तीन वर्णांची सेवा करून आपली उपजीविका चालवितो.

याप्रमाणें या चार वर्णांत चौदा विद्या आणि चौसष्ट कला राहतात व पोसल्या जातात, आणि धर्मसंस्थापनेंत यांच्या संवर्धनाची व्यवस्था केली जाते. चारही वर्णांच्या या कर्मांचा जे विचार करतील त्यांना कळून येईल कीं, मनुष्याच्या उन्नतीला आवश्यक असणाऱ्या सर्व विद्यांचा अन्तर्भाव या कर्मांत झाला आहे. यदाकदाचित् एखाद्या नव्या विद्येचा शोध लागला, तर ती शिकविण्याची व्यवस्था करणें हें धर्मसंस्थापना करणाराचें आवश्यक कर्तव्यच आहे. तात्पर्य, धर्मसंस्थापनेचा अर्थ एखाद्या नूतन धर्माची स्थापना करणें (Establishing a new order of religion) असा नव्हे. येथें गौतम बुद्धाप्रमाणें नूतन धर्मस्थापनेची कल्पनाच नाहीं. तर जीं चारही वर्णांच्या उन्नतीचीं आणि उपजीविकेचीं कार्यें आहेत, त्यांची उन्नति आणि सुव्यवस्था करणें हा भाव आहे (Establishing by mutual co-operation, a new order in social, moral, industrial & economic conditions of society).

प्राचीन काळीं मोठमोठालीं गुरुकुलें असत. हजारों तरुण त्यांत शिकत असत. त्यांना तेथें ज्ञान, विज्ञान, कला, युद्ध, यंत्रें इत्यादि सर्व विद्यांचें शिक्षण दिलें जात असे. म्हणून 'धर्मसंस्थापना' या शब्दांत जो धर्म शब्द आहे, तो केवळ पारलौकिक (Religion) धर्माचा वाचक नाहीं. तर तो या चार वर्णांच्या संपूर्ण ऐहिक व्यवसायांचा बोधक आहे व या व्यवसायांत सगळ्या प्रकारच्या औद्योगिक जीवनाचा अन्तर्भाव होतो. हा ' धर्म ' पदाचा योग्य अर्थ लक्षांत येण्याकरितां संपूर्ण व्यावसायिक जीवनाचा विचार केला पाहिजे. तो विचार येथें करण्याचा आमचा मानस नाहीं; तर येथें केवळ ' धर्म ' आणि 'धर्मसंस्थापना' यांचेच अर्थ स्पष्ट करावयाचे आहेत. हा भाव लक्षांत न घेतां, जर ' धर्म ' शब्दाचा 'पारलौकिक उत्कर्ष करणारा' एवढाच अर्थ घेतला तर मूळ भगवंतांच्या घोषणेचा अर्थ समजणें शक्यच नाहीं. भगवान् श्रीकृष्णांना जी धर्मसंस्थापना करावयाची होती, ती विवस्वान्, मनु, इक्ष्वाकु आणि अनेक राजांच्या परम्परेंत व्यक्त केली गेली होती. आज 'मनुस्मृति' नांवाची मनूची धर्म-

व्यवस्था उपलब्ध आहे. तिचें अवलोकन केल्यास ' धर्म-व्यवस्थेचें स्वरूप ' लक्षांत येईल. या अर्थासाठीं आणखी इतर स्मृतीही पाहण्याजोग्या आहेत.

पूर्वोक्त चार वर्णांतील प्रत्येक वर्णांत कितीतरी पोट जातींचा अन्तर्भाव होतो. या प्रत्येक जातीचा स्वतःचा असा एक उद्योग आहे व तो दुसऱ्या जातीला करतां येत नाहीं. एका वर्णाचा उद्योग दुसऱ्यानें करूं नये, अशा प्रतिबंधक व्यवस्थेनें त्या उद्योग करणाराच्या व्यवसायाला सहजच संरक्षण मिळतें. अशा प्रकारें ही संरक्षणाची (Protection) योजना या व्यवस्थेंत केली गेली आहे. प्रत्येक जातीला आपल्या कर्मांत पाहिजे तेवढी उन्नति करायला वाव आहे. पण दुसऱ्या जातीचा उद्योग करण्यास मात्र तिला प्रतिबन्ध आहे. या योजनेनें सर्वांचें संरक्षण आणि सर्वांची उन्नति होऊं शकते. आजच्या ' युनियन्, गिल्ड् ' इत्यादींमध्यें हीच कल्पना आहे. उन्नति आणि संरक्षण या बाबतींत प्राचीन वर्ण-व्यवस्थेची तुलना आजच्या युनियन् आणि गिल्डच्या व्यवस्थेशीं करून पाहणें मनोरंजक ठरेल. यासंबंधीं विचार करणारांनीं इकडे अधिक लक्ष द्यावें. येथें आम्हांला केवळ यासंबंधाचें दिग्दर्शनच करणें आहे.

चार वर्णांच्या व्यवस्थेंत संरक्षणाचें तत्त्व कसें सामावलेलें आहे, हें गीतेंतील खालील श्लोकांवरून कळून येईल—

> स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ॥४५॥
> श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
> स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥४७॥
> (भ. गी. १८)

' जो मनुष्य आपापल्या कर्मांत कुशल व तत्पर असतो, त्यालाच उत्तम सिद्धि प्राप्त होते. आपलें नियत कर्म गुणहीन असलें तरी तेंच करणें अधिक श्रेयस्कर आहे. दुसऱ्याचें कर्म कितीही सोपें दिसलें तरी तें करण्यानें कधींही हित होत नाहीं. मनुष्य त्याच्या स्वभावानुरूप ठरवून दिलेली कर्मेच करीत असतो. यामुळें त्याला पापाचा स्पर्श होऊं शकत नाहीं. '

हा उपदेश अर्जुनाला केला आहे. अर्जुन हा क्षत्रिय असल्यामुळें युद्ध

करणें हा त्याचा स्वभाव होता. पण तो आपल्या कर्तव्याचा त्याग करून शमदमादि ब्राम्हणाचीं कृत्यें करूं इच्छीत होता. भगवन्तांनीं त्यास सांगितलें कीं, क्षत्रियाला क्षत्रियोचित कर्मे करणेंच इष्ट आहे. ब्राम्हणांचीं शमदमादि कृत्यें करायला कितीही बरी दिसलीं, तरी तीं करणें हें क्षत्रियास श्रेयस्कर नाहीं. याप्रमाणें भगवान् श्रीकृष्णांच्या धर्मसंस्थापनेंत क्षत्रियाला ब्राम्हणाचीं कामें करण्यास प्रतिबंध होता. या प्रतिबंधाचा संबंध आर्थिक व्यवहाराशीं आहे. ब्राम्हणाचें काम हें अनुत्पादक ( unproductive ) आहे. क्षत्रियाचें कर्म हें संरक्षक ( Protective ) आहे, व वैश्याचें व शूद्राचें कर्म उत्पादक (Productive ) आहे. ब्राम्हण हे द्रव्योत्पादन करीत नसल्यामुळें राष्ट्रांत त्यांची संख्या मर्यादित असली पाहिजे. उत्पादक उद्योगधंदे करणाराची संख्या राष्ट्रास आवश्यक इतकी असावी. हें नियंत्रण राहण्यासाठीं या सगळ्यांवर राजाचें नियंत्रण असलें पाहिजे.

जर ही व्यवस्था समाजाच्याच इच्छेवर सोंपविली गेली, तर मग राष्ट्राच्या आर्थिक अवस्थेवर तिचा दुष्परिणाम होईल. जैन आणि बौद्ध धर्मांच्या भरभराटीच्या काळांत असेंच झालें. या धर्मांनीं मनुष्यांची पात्रापात्रता आणि राष्ट्राची आवश्यकता यांवर ध्यान न देतां सरसकट सर्वांस भिक्षु बनण्याचा उपदेश केला. यामुळें राष्ट्रांत अनुत्पादक मनुष्यांची संख्या वाढली, आर्थिक व्यवस्था बिघडली आणि क्षत्रियांचीं संरक्षक दलेंही कमी झालीं. चहूंकडे लढाऊ क्षत्रियांचा अभाव होऊन भिक्षूंचे आणि संन्याशाचे तांडेच जिकडे तिकडे दिसूं लागले. याचा परिणाम जो व्हायचा होता तोच झाला व भारतवर्ष परकीयांच्या दास्यबंधनांत पडला !

म्हणून कोणीं कोणतें कर्म करावें, यावर राजाचें नियंत्रण असावें लागतें. यांचेंच नाव **धर्मसंस्थापना**, आणि मनास येईल तसें वागण्याची वृत्ति बोकाळणें यांचें नांव **धर्माची ग्लानि**. या धर्मग्लानीपासून राष्ट्राचा बचाव करण्याकरितां सगळ्या राष्ट्रावर ' धर्मसंस्थापक ' संस्थेचें लक्ष असलें पाहिजे.

कल्पना करा कीं, युद्धाचा प्रसंग उपस्थित झाला आहे. तर अशा वेळीं

सगळ्या क्षत्रियांनीं युद्धाकरितां सिद्ध झालें पाहिजे. त्या वेळीं कोणीही क्षत्रिय संन्यासी अथवा भिक्षु बनून वनांत जाऊं शकणार नाहीं. एवढेंच नव्हे तर सगळ्या क्षत्रियांना युद्धास पाठवून आन्तरिक संरक्षणाचा भार इतरलेल्या वर्णांना आपल्या शिरावर घ्यावा लागेल. याविषयीं मनूचा एक श्लोक पाहण्यासारखा आहे—

> शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुध्यते ।
> द्विजातीनां च वर्णानां विप्लवे कालकारिते ॥
> (मनु. ८।३४८)

'जेव्हां धर्म संकटांत सांपडतो, तेव्हां द्विजातींनीं शस्त्र धारण करावें' अर्थात् त्या वेळीं क्षत्रियांनीं युद्धावर जावें व ब्राम्हण, वैश्य व शूद्रांनीही देशांतील व्यवस्था सुरक्षित ठेवावी. अशा प्रसंगीं जर क्षत्रियच संन्यास घेऊं लागले, तर राजानें त्यांच्यावर निर्बन्ध घालून त्यांचें नियमन केलें पाहिजे.

"स्वधर्मच श्रेयस्कर, आणि परधर्म भयावह," या गीतेच्या विधानाचा हाच अर्थ आहे. धर्म शब्दाचा हा वास्तविक अर्थ मनन करण्याजोगा आहे. येथें 'धर्म' शब्दाचा अर्थ स्नानसंध्यादि कर्में असा नसून राष्ट्रीय, सामाजिक, आर्थिक आणि औद्योगिक सुव्यवस्था, असा आहे. ही सुव्यवस्था निर्माण करण्याकरितांच महात्म्यांचे अवतार होत असतात. धर्म-संस्थापना म्हणजे प्रत्येक वर्णाच्या कर्मांची राष्ट्रीय आवश्यकतेनुसार व्यवस्था. स्नानसंध्या आणि जपतपादि साधनें हीं धर्म शब्दानें येथें अभिप्रेत नाहींत. हीं साधनें द्विजांकरितां आवश्यक असतील पण येथें तर राष्ट्रांत जितके लोक आहेत, त्या सर्वांची योग्य उन्नति व्हावी व कोणाचीही उन्नत होण्यास प्रतिबंध न व्हावा, यासाठीं सर्वांच्या व्यवसायांची योग्य व्यवस्था लावणें अभिप्रेत आहे. म्हणून येथील "धर्म" शब्दाच्या अर्थाचा राष्ट्रीय, सामाजिक, आर्थिक आणि औद्योगिक उन्नतीशीं अधिक संबंध आहे

याच दृष्टीनें विचार केला असतां असें स्पष्ट होतें कीं, "धर्म्यं युद्धं" (गी. २,३१) "धर्म्यं संग्रामं" (गी. २-३३) इत्यादि ठिकाणीं

उल्लेखिलेलें धर्मयुद्ध हें चार वर्णांची सुरक्षितता निर्माण करण्याकरिता आणि पूर्वी सांगितलेली राष्ट्रीय सुव्यवस्था निर्माण करण्याकरिताच आवश्यक झालेलें युद्ध होय. श्रीकृष्णार्जुनांच्या या संवादास " धर्म्यं राजगुह्यं " ( गी. ९।२ ) ' राज्यशासनाचें गुह्य ज्ञान ' असें म्हटलें आहे, तें अगदीं योग्य आहे. " धर्म्यामृतं " ( गी. १२-२० ) म्हणजे अमरत्व प्राप्त करून देणारा धर्म, असाही याचा उल्लेख केला आहे. येथें अमरत्व म्हणजे राज्याचें अमरत्व. या गीताशास्त्रोक्त राज्यशासनशास्त्राप्रमाणें ज्या राष्ट्राचें राज्यशासन चालेल, तें राष्ट्र सर्वदा जीवित आणि जागृत अवस्थेंत राहील, म्हणजेच तें राष्ट्र अमरत्वाचा अनुभव घेईल.

'या धर्मावर श्रद्धा न ठेवणारे नाना प्रकारचीं दुःखें भोगतील ' ( गी. ९।३ ) असें सांगून भगवन्तांनीं जनतेला सावधगिरीची सूचनाही देऊन ठेविली आहे. हा धर्म ' शाश्वत ' आहे, ( गी. १४।२७ ) अर्थात् हा कधीं निरुपयोगी होत नाहीं. अनेक शतकें लोटल्यावरही हा जुना होत नाहीं. या एवढ्या विवरणावरून ' धर्म ' आणि ' धर्मसंस्थापना ' या पदाचा अर्थ लक्षात येईल.

## योग व साम्ययोग

गीतेंत योग शब्दाचे अनेक पारिभाषिक अर्थ आहेत. जेथें कर्म आणि अनुष्ठान असे अर्थ आहेत, त्याविषयींचें विवेचन पुढें केलें जाईल. येथें केवळ राज्यशासनविषयक अर्थाविषयींच विचार करावयाचा आहे.

गी. ४।१-३ मध्यें म्हटलें आहे कीं ' हा योग मी (विष्णूनें) विवस्वानास सांगितला होता. मनु, इक्ष्वाकु तसेंच अन्य राजर्षि यांना परम्परेनें हा योग प्राप्त झाला होता. परन्तु पुष्कळसा काल व्यतीत झाल्यामुळें हा योग नष्ट झाला. तोच पुरातन योग आज मी ( श्रीकृष्ण ) तुला सांगत आहें. तूं माझा परम भक्त आणि मित्र असल्यामुळें मीं हें गुह्य तुजजवळ उघड केलें आहे.'

येथें ' योग ' शब्द तीन वेळां वापरला असून ' रहस्य ' शब्द एकदां वापरला आहे. पुढें अर्जुनानें याच योगाचा ' साम्ययोग ' असा उल्लेख केला आहे–

योऽयं योगः त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ॥ (भ. गी. ६।३३)

' भगवन्ता, तूं जो साम्ययोग मला सांगितलास, ' असें अर्जुन म्हणत आहे. ज्यामध्यें सर्वांकडे समदृष्टीनें पाहिलें जातें, त्यास साम्ययोग असें नांव आहे.

आम्हीं पूर्वी पाहिलें आहे कीं, भगवान् श्रीकृष्ण जी व्यवस्था निर्माण करूं इच्छीत होते, तीमध्यें चाण्डाल, पापयोनि, श्वपच, स्त्री, शूद्र इत्यादि सगळ्यांना आपली उन्नति करून घेण्याला सारखाच अवसर मिळणार होता, या सर्वांनाच समभावानें वागविलें जाणार होतें. हा भाव व्यक्त करण्याकरितांच अर्जुनानें या योगास साम्ययोग म्हटलें आहे.

मनु आदि राजर्षींना सांगितला गेलेला योग निःसंशय राज्यशासनयोगच होता. आज मनुस्मृतींत आणि अन्यान्य स्मृतींत हाच योग सांगितलेला आढळतो. आज उपलब्ध असलेली मनुस्मृति ही भृगूनें लिहिलेली आहे, तरी ती मूळ मनुस्मृतीवरच आधारलेली आहे, म्हणून तिला मनुप्रणीत धर्मशास्त्र ( Law of Manu ) म्हणतात. ( Law, order, justice, equity and righteous living ) विधि, व्यवस्था, न्याय, समता व सदाचार इत्यादि सर्व विषय मनुस्मृतींत आणि अन्य स्मृतींत विवेचिले गेले आहेत. ' योग ' शब्दाचा असा विस्तृत अर्थ येथें सापडतो. साम्ययोग याचा अर्थ ( Order of equanimity ) समत्वाच्या दृष्टीनें केलेली व्यवस्था, असा आहे. हे सर्व भाव राज्यशासनसंबंधींच असल्यामुळें या राज्यशासनयोगाचा उपदेश विवस्वान्, मनु, इक्ष्वाकु, अनेक राजर्षि आणि अर्जुन इत्यादींना केला गेला. यांपैकीं एकही तपश्चर्येचा इच्छुक नव्हता. उलट वनांत जाऊन तपश्चर्या करावी, असें इच्छिणारा अर्जुन या योगाच्या श्रवणानन्तर वनगमनापासून निवृत्त होऊन युद्ध करून विजयश्री मिळविण्यास आणि राज्यशासनाची नवी व्यवस्था प्रचलित करण्यास सिद्ध झाला. म्हणून ' योग ' किंवा ' साम्ययोग ' हें राज्यशासनाच्या एका विशिष्ट पद्धतीचें नांव आहे, हें निःसंशय सिद्ध झालें.

बलगमनास तयार झालेल्या अर्जुनाला त्यापासून निवृत्त करण्याकरितां या 'साम्य-योगा'चा उपदेश केला गेला; आणि तो सफलही झाला, यावरून या योगाचें स्वरूप स्पष्ट कळून येतें.

## भक्त आणि भक्ति

पूर्वी एके ठिकाणीं (अ. ४।३) अर्जुनास भक्त म्हटलें आहे. अर्जुन श्रीकृष्णाचा भक्त होता, हेंही सर्वांस माहीत आहे. आज नामस्मरण करणें, हाच देवाच्या भक्तीचा अर्थ होऊन बसला आहे. चहूंकडे आजचे भक्तजन टाळ-मृदंगांच्या घोषांत ईश्वराचें नामस्मरण करून "कृतकृत्य झालों। इच्छा केली तें पावलों॥" असें स्वतःचें समाधान करून घेत आहेत. सामान्य जनताही या लोकांना भक्त मानून त्यांना उदोउदो करते. ईश्वराच्या भक्तीचें हेंच लक्षण सध्यां मानलें जात आहे. पण भक्त अर्जुन असा टाळ-मृदंगांच्या घोषांत भजन करीत बसला नव्हता. एवढेंच नव्हे तर त्यानें भगवान् श्रीकृष्णांचीही फारशी सेवा केलेली नव्हती. उलट भगवान् श्रीकृष्णच अर्जुनाची सेवा करीत असत! त्यांनीं त्याचा रथ हांकला, घोडे धुतले, शिवाय जेव्हां जेव्हां पांडवावर आपत्ति आली, तेव्हां तेव्हां श्रीकृष्णच त्यांच्या सहाय्याकरितां धावून गेले. भक्ताकडून सेवा घेणें तर दूरच राहिलें, पण देव मात्र येथें भक्तांची सेवा करतांना आढळतो! इतकें असूनही अर्जुनाच्या भक्तपणात काहीं वैगुण्य आलें नाहीं; तेव्हां अर्जुनानें केलेल्या भक्तीचा विचार करणें आवश्यक आहे.

आपण आतां भक्ताचीं लक्षणें पाहूं या. महाभारतकालीन श्रीकृष्ण-भक्त अर्जुनाप्रमाणेंच रामायण-कालीन हनुमान् हा श्रीरामचंद्रांचा मोठा भक्त होता. हा हनुमानही टाळ कुटीत श्रीरामाचें भजन करीत बसला नव्हता. याप्रमाणेंच पूर्वीच्या भक्तांचीं चरित्रें पाहूं जातां आज प्रचलित असलेल्या भक्तिमार्गाचें अनुसरण कोणींही केलेलें आढळत नाहीं. पण यांच्या जोडीचे भक्त पुढें झाले नाहींत, असें ज्या अर्थी म्हटलें जातें, त्या अर्थी त्यांच्या भक्तीचा अवश्य विचार केला पाहिजे.

अर्जुन आणि हनुमान् यांनीं आयुष्यभर काय केलें? हनुमन्तानें आणि

अर्जुनानें श्रीराम आणि श्रीकृष्ण यांचें नामस्मरण केलें होतें, असें सिद्ध करणारें एकही प्रबल प्रमाण सध्यां उपलब्ध नाहीं. पण श्रीराम आणि श्रीकृष्ण यांनीं *समाजाच्या व्यवस्थेची घडी पुनः बसविण्याचें जें महान् कार्य आरंभिलें होतें*, दुष्टांचा नाश आणि सज्जनांचें संरक्षण करण्याचा जो भार उचलला होता, त्यामध्यें मात्र तनमनधनानें, किंचितही कुचराई न करतां, अर्जुन आणि हनुमान् यांनीं त्यांना जेवढें करता येणें शक्य होतें, तें सर्व केलें. जर या भक्तांच्या भक्तीचें कांहीं रहस्य असेल तर तें हें होय. पण आजचे भक्तजन सज्जनांचें परित्राण, दुष्टांचें निर्दालन, समाजाची शासन-विषयक सुव्यवस्था, यांपैकीं कशांतही काडीइतका भाग घेत नाहींत. भगवन्तांनीं आपले जे जीवनोद्देश सांगून ठेवले आहेत, त्यांपैकीं एकाचाही अवलंब न करतां केवळ एखाद्या ठिकाणीं हजारोंच्या संख्येंत जमून टाळ-मृदंगाच्या घोषांत ईश्वराचें नामस्मरण करणें, हेंच श्रेष्ठ भक्तांचें लक्षण होय, अशी या 'भक्तां'ची समजूत होऊन बसली आहे!

पण आम्हांसमोर अर्जुन आणि हनुमान् हे दोन महाभक्त आदर्शभूत आहेत. *यांनीं जशी भक्ति केली, तिचेंच अनुकरण करणें आम्हांस योग्य आहे.*

अर्जुन आणि हनुमान् या दोघांच्या आयुष्याचा विचार केला असतां असें कळून येतें कीं, भगवान् श्रीरामचन्द्रांनीं आणि श्रीकृष्णांनीं पूर्वोक्त समाजाची सुव्यवस्था स्थापन करण्यासाठीं क्रमशः रावणादि राक्षस आणि कौरव यांचा नाश करून तत्कालीन सज्जनांचें रक्षण करण्याचें ठरविलें होतें, आणि नंतर राज्य-शासनाच्या द्वारें चार वर्णांची सुव्यवस्था करण्याचें योजिलें होतें. या आयोजनां-तील जेवढा भार हनुमान् आणि अर्जुन यांना उचलतां येण्याजोगा होता, तेवढा त्यांनीं उचलला.

यावरून असा बोध मिळतो कीं-(१) सज्जनांचें संरक्षण, (२) दुष्टांचा नाश आणि (३) धर्माची संस्थापना, हें त्रिविध कार्य ईश्वराचें स्वतःचें आहे. भक्तांनीं हें कार्य होईल तितकें तन-मन-धन लावून केलें पाहिजे आणि या कर्मांच्या द्वारेंच परमेश्वराची सेवा केली पाहिजे. परमेश्वराच्या सेवेचा हाच मार्ग आहे. ज्या कोणाची सेवा करावयाची असेल, त्याला त्याच्या आवडत्या

कामांत सहाय्य केलें पाहिजे. हीच त्याची सेवा आणि हिचेंच नांव भक्ति.

' भक्ति ' हा शब्द ' भज्-सेवायाम् ' या धातूपासून सिद्ध झालेला आहे; अर्थात् ' भक्ति ' शब्दाचा अर्थ ' सेवा.' सेवा परमेश्वराचीच केली पाहिजे. परमेश्वर जें करूं इच्छितो, तें पूर्वोक्त तीन कर्मांच्या द्वारें सूचित केलेलें आहे. तें त्रिविध कार्य ईश्वराचें प्रिय कार्य आहे. तें कार्य आपल्याकडून होईल तितकें करणें, तें करतांना ईश्वरार्पण-बुद्धि ठेवणें, त्याकरितां पारितोषिक मिळण्याची इच्छा न ठेवणें, तें कार्य ईश्वर-सेवा-भावानें करीत असणें, याचेंच नांव ईश्वरभक्ति. पूर्वोक्त तीन कामें करण्याकरितां स्वतःस योग्य बनविणें, हेंच अनुष्ठान प्रत्येक मनुष्यानें करावें. अस्तु भगवद्गीतेंत जी भक्ति सांगितली आहे, तिचें लक्षण आणि स्वरूप थोडक्यांत हें असें आहे.

ईश्वराचें नामस्मरण अथवा जप करणेंही एक मोठें साधन आहे. परन्तु त्या साधनाचें स्वरूप केवळ नामघोष न करतां त्याबरोबरच त्या नामाच्या अर्थाचें मनन करणें, त्या नामाच्या द्वारें बोधित होणारा अर्थ आपल्या जीवनांत उतरविण्याचा प्रयत्न करणें, असें आहे. उदाहरणार्थ, **हरि** हें ईश्वराचें नाम घ्या. ' दुःखांचें हरण करणारा ', असा याचा अर्थ. समाजाचीं दुःखें दूर करण्याचें जेवढें सामर्थ्य आपल्यांत असेल, तेवढ्याचा उपयोग करून समाजाची सेवा करणें, याचाच अर्थ तें नाम आपल्या जीवनांत ओतणें होय. ' राम ' शब्दाचा अर्थ आनन्द देणारा असा आहे. जो मनुष्य समाजाचा सात्विक आनन्द वृद्धिंगत करण्याचें काम करील, त्यानेंच रामाचें भजन केलें असें समजावें. याप्रमाणें संस्कृत भाषेंत देवाचीं हजारों नांवें सुप्रसिद्ध आहेत. त्या नामांच्या अर्थाचें मनन करण्यानें आणि तो अर्थ आपल्या जीवनांत उतरविल्यानें जो लाभ होईल, तो केवळ आंधळें नामस्मरण केल्यानें कदापि होणार नाहीं. हा अर्थ आपल्या जीवनामध्यें ढाळून, एकरूप करून टाकणें, हें एक फार मोठें अनुष्ठान आहे आणि त्यानेंच मनुष्याची उन्नति होऊं शकेल. नामघोष करणें हें एक चित्तैकाग्र्यासाठीं साधन आहे.

जर अर्जुन आणि हनुमान् हे दोघे श्रीकृष्ण आणि श्रीराम यांच्या विशाल

योजनेंत भाग न घेता केवळ स्वस्थ नामस्मरण करीत राहिले असते, तर मग त्यांच्या उपास्य देवतांनी खचित त्यांची उपेक्षाच केली असती. अर्जुन तर नामस्मरणादि साधनें आचरण्याकरितां वनांतच जायला निघाला होता. वनांत जाऊन त्यानें मोठ्या एकतानतेनें श्रीकृष्णाचें भजन केलें असतें; पण भगवन्तांस हें नको होतें. म्हणून त्यांनीं त्याचा निषेध करून त्याला आपल्या देशाच्या राष्ट्रीय योजनेंत कार्य करावयास लावलें.

यावरून भक्तीची यथार्थ कल्पना येऊं शकेल. भक्ति हें सेवेचेंच दुसरें नांव आहे; त्यांतही 'अनन्य-भक्ति' अधिक श्रेष्ठ आहे. गीतेंत 'अनन्य-भक्ति' हा शब्द वारंवार आला आहे. याचा अधिक विचार पुढें होणार आहे. येथें केवळ इतकेंच सांगावयाचें आहे कीं, आज 'अन्-अन्य-भक्ति' चा अर्थ 'आपल्या उपास्य देवतांवाचून इतर कोणत्याही देवताची उपासना न करणें' असा होऊन बसला आहे. हा अर्थ गीता किंवा उपनिषदें यांत कोठेंही सांपडत नाहीं. गीतेंत 'अनन्य-भक्ती'चा अर्थ 'अनन्य होऊन सेवा करणें,' असा आहे.

'उपासक आणि उपास्य' या दोघांत अन्यभाव नाहीं, उपासक आणि उपास्य हे दोघेही एका सत्तेचीं दोन रूपें आहेत, उपासक उपास्याहून भिन्न नाहीं, हें समजून जी सेवा केली जाते, ती अनन्य-भक्ति होय आणि गीतेला हीच भक्ति अभीष्ट आहे. आपल्या उपास्य दैवताविरहित अन्य देवताची उपासना न करणें, हा आज समजला जाणारा अर्थ गीतेंत नाहीं. या विषयावरील प्रमाणें आणि स्पष्टीकरण योग्य प्रसंगीं दिलें जाईलच. गीतेंत 'अनन्य-भक्ती'वर विशेष जोर दिला गेला आहे, पण उपास्याशीं अपृथक्, अभिन्न, होऊन सेवा करणें, असा अर्थ तेथें ग्रहण केल्यानेंच त्या सर्व वचनांची संगति लागूं शकते, हें विसरतां नये.

## यज्ञाचें महत्त्व

गीतेंत यज्ञाचें स्थान अत्यंत उच्च आहे. आज 'यज्ञ' शब्दाचा अर्थ अग्नींत हविर्द्रव्यांची आहुति देणें, इतकाच समजला जातो, पण वैदिक यज्ञ-संस्थेचे वेळीं यज्ञ शब्दाचा इतका संकुचित अर्थ केव्हांच मानला जात नव्हता. भगवद्गीतेंत व्यापक यज्ञ-संस्थेचें तत्त्व मोठ्या सुंदर पद्धतीनें मांडलें गेलें आहे–

दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।
ब्रह्माग्नौ अपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥२५॥
श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।
शब्दादीन्विषयानन्य इन्द्रियाग्निषु जुह्वति ॥२६॥
सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।
आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥२७॥
द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे
स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥२८॥
अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथाऽपरे ।
प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥
अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।
सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥३०॥
यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् ।
नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥३१॥
एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।
कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥३२॥
श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परन्तप ।
सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥३३॥ ( भ. गी ४)

'( १ ) योगी देवतांस उद्देशून यज्ञ करतात, ( २ ) कोणी ब्रह्माग्नींत आपला यज्ञच समर्पण करतात, ( ३ ) दुसरे संयमाग्नींत श्रोत्रादि इंद्रियांचें हवन करतात, ( ४ ) कोणी इन्द्रियाग्नींत शब्दादि विषयांचें हवन करतात, ( ५ ) कोणी आत्मसंयमरूप अग्नि ज्ञानानें प्रदीप्त करून त्यांत सगळ्या इंद्रिय-कर्मांचें आणि प्राणकर्मांचें हवन करतात, ( ६ ) कोणी द्रव्याचा यज्ञ करतात, ( ७ ) दुसरे कांहीं तपरूप यज्ञ करतात, ( ८ ) तिसरे योगसाधनरूप यज्ञ करतात, ( ९ ) कोणीं स्वाध्याय ज्ञानाचा यज्ञ करतात, ( १० ) कोणीं अपानांत प्राणाचें हवन करतात, ( ११ ) तर दुसरे कांहीं प्राणांत अपानाचें हवन

करतात; ( १२ ) कोणी प्राण आणि अपानाच्या गतीचा रोध करून प्राणायाम करतात, ( १३ ) कोणी आहार नियमित करून प्राणांचें प्राणांतच हवन करतात. हे सगळे यज्ञाचें तत्त्व जाणतात आणि यज्ञ करून आपल्या पापांचा नाश करतात. यज्ञ केल्यावर जें अन्न-शिल्लक राहतें, त्याचें सेवन करणारे सनातन *ब्रह्माला प्राप्त करून घेतात. यज्ञ न करणारांस या लोकांतही सुख मिळत नाहीं,* मग परलोकांत तरी त्यांना स्थान कसें मिळेल ? वेदानें अशा अनेक यज्ञांचें विधान केलें आहे. कर्माच्या द्वारेंच ते सगळे यज्ञ पूर्ण होऊं शकतात, असें जाणून मनुष्य मुक्त होतो. द्रव्य-यज्ञाहून ज्ञानयज्ञ अधिक श्रेष्ठ आहे; कारण ज्ञानांतच सर्व कर्मांची समाप्ति होते.'

येथें कितीतरी प्रकारचे यज्ञ सांगितले आहेत. यांपैकीं कांहीं यज्ञ शरीरांतच होतात. उदाहरणार्थ-(१) इन्द्रियांचें संयमाग्नींत हवन, (२) *विषयांचें इन्द्रियाग्नींत हवन*, (३) इन्द्रियकर्मे आणि प्राणकर्मे यांचें आत्मसंयमाग्नींत हवन, (४) अपानाचें प्राणांत व प्राणाचें अपानांत हवन, (५) आहाराचें नियमन करून प्राणांचेंच प्राणांत हवन. हे सर्व यज्ञ व्यक्तीच्या शरीरांतच होणारे आहेत, पण समाज आणि राष्ट्र यांच्या क्षेत्रांत या यज्ञांचाही बराच परिणाम होतो. उदाहरणार्थ—

**विषयांचें इन्द्रियाग्नींत हवन—** याचा अर्थ असा आहे कीं, यम-नियमपूर्वक विषयांचें ग्रहण करून त्याचा उपभोग घ्यावा. मनुष्यानें शाश्वत कल्याण करणाऱ्या मर्यादित भोगाचेंच ग्रहण करणें इष्ट आहे. त्यामुळें राष्ट्रांत आवश्यक सुखोपभोगांच्या साधनांची उत्पत्ति करण्याची प्रवृत्ति वाढते. जसें, योग्यानें प्राणायामाचे कालांत गाईचें दूध व तूप सेवन करणें इष्ट आहे. जर राष्ट्रांत अशा योग्यांची संख्या वाढली, तर त्यांच्याकरिता गाईचें दूध व तूप यांची अधिक आवश्यकता निर्माण होऊन तीं उत्पन्न करण्याकडे लोकांची प्रवृत्ति वाढेल. ब्रह्मचाऱ्यांनीं योगाभ्यास व प्राणायाम केलाच पाहिजे, असा जर नियम केला गेला, तर मग लाखों लोक गाईच्या दूध-तुपाचें सेवन करूं लागतील आणि त्या प्रमाणांतच त्या वस्तूंची आवश्यकता निर्माण होईल.

याचप्रमाणे इतर अनेक विषयांच्या भोगाच्या न्यूनाधिक्याचा परिणाम राष्ट्रावर होऊं लागतो, हें पाहतां येणें शक्य आहे.

**स्वाध्याय-ज्ञान-यज्ञ—** *हा तर ज्ञानयज्ञच आहे. आपलें ज्ञान दुसऱ्यास यज्ञभावानें देणें म्हणजेच ज्ञानयज्ञ करणें होय. हें ज्ञान चारही वर्णांच्या कार्य-व्यवहाराचें किंवा अध्यात्म-विषयकही असूं शकेल. अर्थात् हा ज्ञानयज्ञ राष्ट्राची मर्यादा उल्लंघून अन्य देशही व्यापून टाकणारा होऊं शकतो; आणि यावरच राष्ट्राचा उत्कर्ष किंवा अपकर्ष अवलंबून आहे.*

या विवेचनावरून हें स्पष्ट होईल कीं, वरवर वैयक्तिक दिसणाऱ्या या यज्ञांचा राष्ट्राच्या उन्नतीशीं अत्यन्त घनिष्ठ संबंध आहे. राष्ट्रांत शमदमानें संयमपूर्ण वागणारे लोक जितके अधिक होतील, तितका त्याच्या राष्ट्राचा संस्कृतीवर व सभ्यतेवर अधिक परिणाम होईल. त्यामुळें समजाच्या सुखांत वृद्धि होईल व राष्ट्रांत शान्तिही नांदूं शकेल व त्याचें यशही वाटेल.

**द्रव्ययज्ञ-** *द्रव्ययज्ञ, संपत्तीचा यज्ञ, हाही राष्ट्राच्या उन्नतीला पोषक असाच आहे.* ज्यांच्याजवळ विपुल द्रव्य असतें, ते सर्वमेध-यज्ञ करून आपलें द्रव्य राष्ट्राच्या हिताकरितां अर्पण करतात. या द्रव्यानें राष्ट्राचीं हजारों कामें होत असतात. बहुतकरून सर्व यज्ञाकरितां द्रव्य हें आवश्यकच असतें व त्या यज्ञांनीं राष्ट्राचें हितही होत असतें.

या यज्ञांत एक महत्त्वाचें तत्त्व आहे त्याच्यासंबंधीं खालील श्लोकांत उल्लेख केला आहे—

> यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः ।
> तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर ॥ ९ ॥
> सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।
> अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥१०॥
> देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।
> परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥

इष्टान्भोगान् हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः ।
तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥१२॥
(गी. ३)

"यज्ञावांचून अन्य हेतूंनीं जीं कर्में केलीं जातात, तीं कर्त्याला बंधनकारक होतात. म्हणून असंग–भावानें यज्ञरूप कर्में केलीं पाहिजेत. प्रजापतीनें प्रजेबरोबर यज्ञाची उत्पत्ति करून प्रजेला सांगितलें कीं– या यज्ञानें तुम्ही आपली उन्नति करून घ्या. हा यज्ञच तुम्हांला तुमचें अभीष्ट देणारा होईल. तुम्ही यज्ञ करून देवांची संभावना करा, देव तुमचें सहाय्यक होतील. अशा प्रकारें परस्पराची समृद्धि करून तुम्ही श्रेय प्राप्त करून घ्या. यज्ञाच्या द्वारें देवतांना हविर्भाग न देता जो स्वत:च उपभोग घेतो तो चोर समजावा."

यात "परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ।" या वाक्यावरून यज्ञाचें स्वरूप स्पष्ट होत आहे. परस्परांचें आदरपूर्वक सहाय्य हाच यज्ञ होय *श्लोकांत परस्परांची संभावना असा शब्दप्रयोग आहे. त्याचा अर्थ परस्परांचा सन्मान, आदर, प्रेमभाव आणि परस्परांच्या हिताकरितां त्यागभाव असा आहे. परस्परांतील प्रेमभावामुळें उभयतांकरितां जो परस्परांकडून त्याग* होतो, तेंच यज्ञाचें मुख्य तत्त्व आहे. हेंच यज्ञचक्र असून हें सतत फिरत राहिलें पाहिजे.

## यज्ञचक्राचें प्रवर्तन

एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।
अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥
(गी. ३।१६)

'जो या यज्ञचक्राचें प्रवर्तन करीत नाही, तो पापी आहे. केवळ इन्द्रियांच्याच सुखाची इच्छा करणारा तो पापी येथें व्यर्थच जगतो.' हें यज्ञचक्र सतत चालू राहिलें पाहिजे. या यज्ञचक्राची गति समजण्याकरितां खालीं एकदोन उदाहरणें दिलीं आहेत–

( १ ) समुद्राच्या अथवा पृथ्वीवरील पाण्याची वाफ होऊन मेघ तयार होतात आणि त्या मेघाच्या योगानें पाऊस पडून नद्या, तलाव, समुद्र परत भरून जातात. हें पर्जन्यवृष्टीचें चक्र सतत चालू आहे. जर कां हें बंद झालें, तर अनर्थच होईल ! ( २ ) वृक्षापासून बीज निर्माण होतें आणि त्या बीजापासून पुनः वृक्ष उत्पन्न होतात. हेंही एक चक्रच आहे. हें जर बंद पडलें तर दुष्काळ पडून माणसें मरतील. ( ३ ) मनुष्याच्या शरिरांत रक्ताचा प्रवाह चालू असतो. शुद्ध रक्ताचें मलिन रक्त होतें आणि मलिनाचें पुनः शुद्ध बनतें. हा प्रवाह चालू राहिल्यानेंच मनुष्याचें आरोग्य टिकतें. जर हा प्रवाह बंद झाला तर मनुष्याच्या शरिरावर सूज येऊन तो मरेल.

येथें अशीं शेकडों चक्रें चालत असल्यामुळेंच मनुष्य-प्राणी सुखी आहे. हीं चक्रें जर सारखीं फिरत न राहिलीं, तर या जगांत अनर्थ होईल. मनुष्यांनीं आपल्याजवळील हविर्द्रव्य देवांस द्यावयाचें आहे व त्याबद्दल देवांनीं आपली सहाय्यक शक्ति मानवांस द्यावयाची आहे. हाच परस्पर-संभावनारूप यज्ञ आहे.

आतां राष्ट्राचा व्यवहार पहा; राजा आणि प्रजा, भांडवलवाले आणि मजूर, ज्ञानी आणि शिष्य, समर्थ आणि असहाय्य इत्यादि दोन प्रकारचे वर्ग राष्ट्रांत असतात. यांचा परस्परांत संघर्ष सुरू असतो. जर हे परस्परांची संभावना म्हणजे प्रेमानें परस्परांचा सन्मान, सहाय्य आणि परस्पराचें हित करतील, तर त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या यज्ञानें सर्वांची उन्नति होईल आणि हेंच करणें सर्वांस योग्य आहे. या उदाहरणांत यज्ञाचें राष्ट्रीय स्वरूप स्पष्ट झालें आहे. गीतेला हेंच इष्ट आहे.

' देवपूजा-संगतिकरण-दान ' या अर्थाच्या यज् धातूपासून ' यज्ञ ' शब्द झाला आहे. यज्ञांत देवपूजा, संगति आणि दान या कर्मांना प्राधान्य आहे. आपल्याहून मोठे असतील, त्यांचा सन्मान करणें इष्ट आहे. आपल्या बरोबरीच्या लोकांशीं संघटन करावें आणि ज्यांची शक्ति आपल्यापेक्षां कमी असेल, त्यांना आपल्या शक्तीचें दान करणें योग्य आहे. समाजांत हे तीन प्रकारचे

*

लोक असतात. यज्ञामुळें या तिघांशींही संबंध येतो. या तिघांची प्रसन्नता हेंच यज्ञाचें सुफल आहे. अशा प्रकारें यज्ञामुळें राष्ट्रांतील सर्व लोकांचें संघटन होऊन त्यांचा उत्कर्ष होतो. याविषयीं पुढील प्रकरणांत अधिक विवरण येणार असल्यामुळें येथें एवढेंच पुरे.

याप्रमाणें गीतेंत कित्येक सांकेतिक शब्द आहेत आणि त्यांचे पारिभाषिक अर्थ राष्ट्रीय-हित-साधनाचा भाव दाखवीत आहेत. आम्ही येथें धर्म, धर्म-संस्थापना, योग, साम्ययोग, राजविद्या, राजगुह्य, भक्त, भक्ति, यज्ञ, यज्ञचक्र-प्रवर्तन इत्यादि शब्दांचे गीतेंतील पारिभाषिक अर्थ पाहिले यावरून असें कळून आलें कीं, हीं पदें गीतेंत राष्ट्रीय भावनांचा विचार व प्रचार करण्याकरितां योजिलीं गेलीं आहेत.

भगवान् श्रीकृष्ण जी राज्य-शासन-पद्धति प्रचलित करूं इच्छीत होते, त्या पद्धतीला पोषक असेच अर्थ या पदांतून निघतात आणि त्याच अर्थांनीं गीतेंत या पदांचा उपयोग केला गेला आहे.

गीतेंत आणखीही कित्येक गूढार्थवाचक शब्द आहेत पण त्यांचा विचार पुढील प्रकरणांत केला जाईल.



# विश्वरूपाचें दर्शन

## ईश्वराच्या सर्वरूपाचें दर्शन

श्रीमद्भगवद्गीतेमध्यें वैदिक परम्परेप्रमाणें परमेश्वराच्या स्वरूपाचें यथार्थ वर्णन आहे. संपूर्ण गीतेचें तत्त्वज्ञान याच ईश्वरस्वरूपाच्या पायावर आधारलेलें आहे. म्हणून या लेखांत ईश्वराच्या विश्वरूपाचाच विचार करावयाचा आहे.

श्रीमद्भगवद्गीतेचा अकरावा अध्याय विश्वरूप-दर्शन या नांवानें प्रसिद्ध आहे. 'विश्व-रूप-दर्शन' म्हणजे परमेश्वराच्या यथार्थ विश्वरूपाचा साक्षात्कार. हें विश्वरूप म्हणजे ईश्वराचेंच समग्र रूप होय. प्रत्यक्ष दिसणाऱ्या प्रभूच्या या सत्य स्वरूपाचा साक्षात्कार घडविण्यासाठींच हा अकरावा अध्याय लिहिला गेला आहे. सबंध गीतेंत हाच अध्याय मुख्य आहे, आणि याच्या आधारावरच गीतेचें तत्त्वज्ञान-मन्दिर उभारलें आहे. सर्व तत्त्वज्ञानें या विश्वरूपाच्या कसोटी-वर घासून पारखलीं जावीत, एवढें याचें महत्त्व आहे. एवढेंच नव्हे, तर अनेक वैदिक सूक्तांत ईश्वराचें स्वरूप जसें वर्णन केलें आहे, अगदीं तसेंच संक्षपानें या अध्यायांत सांगितलें असल्यामुळें हा अकरावा अध्याय अनेक वैदिक सूक्तांचें सारच आहे, असें म्हटलें तरी चालेल. परमेश्वराचें स्वरूप अगदीं गुप्त, लपवून न ठेवतां, त्याला प्रगट करून या अध्यायाच्या द्वारें तें जगाच्या पुढें उघड केलें आहे.

पण हा अध्याय इतका महत्त्वाचा असूनही गीतेसंबंधीं विचार करणारांनीं आजपर्यंत त्याच्याकडे दुर्लक्षच केलें आहे असें दिसतें. कित्येकांचें असें मत आहे कीं, हा अध्याय म्हणजे नुसतें अलंकारिक काव्यमय वर्णनच आहे. यासाठीं तत्त्वज्ञानाचा विचार करतांना या अध्यायाकडे फारसें लक्ष देण्याचें कारण नाहीं. आणि म्हणूनच त्यांनीं या अध्यायाची उपेक्षाही केलेली असावी.

पण आम्ही या ठिकाणीं हें स्पष्ट करूं इच्छितों कीं, हा अध्यायच भगवद्गीतेच्या ज्ञानाचा मूल आधार आहे. हें केवळ काव्यात्मक वर्णन नसून त्यांत विशेष

महत्त्वाचें गुह्य तत्वज्ञान सांगितलेलें आहे. ज्या एका तत्त्वाच्या ज्ञानानें सर्व तत्त्वें सूर्य-प्रकाशासारखीं स्पष्ट होतात, तेंच तत्त्व या अध्यायाच्या द्वारें प्रकट झालें आहे. तें असें आहे, पहा—

## विश्वरूपाचा अर्थ

विश्वरूप या पदाचे अनेक अर्थ होतात. ते सगळे खालीं दिले आहेत—

१. विश्व= [ All, whole, entire, universal, every one; विश्वं= universe, whole world, विश्व= the soul ]= सर्व, अखण्ड, संपूर्ण, विश्वव्यापी, प्रत्येक, विश्व, जगत्, संपूर्ण अखण्ड जगत् आणि आत्मा.

२. रूपं= [ Form, figure, appearance, quality of colour, any visible object of figure, beautiful form, elegance, grace, an image.] आकृति, आकार, रूप, रंगाचा गुण, दृश्य वस्तु, किंवा पदार्थ, सुंदर रूप, लालित्य, लावण्य, शोभा, कोमलता, भव्यता, प्रतिभा.

३. विश्वरूप= [ Omniform, all- formed, having all forms.] = सर्वरूप, अखण्ड, अनंतरूपें असलेला.

या अर्थांचा विचार करतां, 'विश्वरूपा'चे जे अर्थ होतात, ते येणेंप्रमाणें— "सर्व रूपें धारण करणारा, संपूर्ण अखण्डित रूपधारी, विश्वव्यापक आकारयुक्त, प्रत्येक रूपानें युक्त, संपूर्ण विश्व ज्याचें रूप आहे असा. या विश्वांत दिसणारी प्रत्येक वस्तु आत्म्याचेंच रूप आहे. येथें जी कांहीं शोभा, सौंदर्य, लालित्य, लावण्य, कोमलता, भव्यता, विशालता दृष्टीस पडते, ती सगळी आत्म्याची आहे." विश्वरूप या शब्दात हे एवढे अर्थ सामावले आहेत.

'विश्व-रूप-दर्शन' याचा अर्थ असा आहे कीं, या विश्वांत जे जे पदार्थ दिसतात, ते परमात्म्याचें स्वरूप आहेत, हें ओळखून त्या पदार्थांत परमेश्वराचें रूप पहाणें, दिसतें तें सर्व प्रभूचें रूप हें जाणून त्याचा साक्षात्कार करून घेत, मी सर्वेश्वराचेंच रूप पहात आहे, असा अनुभव घेणें. या अकराव्या अध्यायांत

( pantheism ) "सर्वेश्वर-सिद्धान्त" अर्थात् "जें जें डोळां दिसे, तें तें ब्रह्मरूप," हें स्पष्ट करून दाखविलें आहे.

येथें विश्वरूप शब्दातलें रूप हें पद केवळ "दृष्टीला दिसणारें," या अर्थाचें वाचक नाहीं. रूप्= रूपक्रियायां [ To form, to see, to consider, to observe carefully, to find out, to investigate. ]= आकारवान् होणें, किंवा आकार प्रकट करणें, पाहणें, विचार करणें, चिंतन करणें, लक्षपूर्वक निरीक्षण करणें, शोधणें, तपास करणें, संशोधन करणें, इत्यादि सगळे अर्थ या रूप् धातूपासून निष्पन्न होतात.

या सर्व अर्थांचा विचार करतां हें स्पष्ट होतें कीं, रूप शब्दानें बोधित होणाऱ्या अर्थांत केवळ डोळ्यांनीं पहाण्याच्याच क्रियेचा अंतर्भाव होत नाहीं, तर इतर सर्व इंद्रियांना गम्य होणारें ज्ञान आणि मनानें केलें जाणारें चिंतन, इत्यादि रूप शब्दांत समाविष्ट आहे. मनुष्याच्या संपूर्ण इंद्रियांनीं आणि आन्तरिक साधनांनीं ज्याचें ज्ञान होतें, त्याचें नांव विश्वरूप. म्हणून अकराव्या अध्यायात ज्या विश्वरूपाचें वर्णन आहे, तें केवळ डोळ्यांना दिसणारेंच नसून इतर सर्व आन्तर आणि बाह्य इंद्रियांनीं ग्राह्य होणाऱ्या वस्तूंचा समावेश या विश्वरूपांत झालेला आहे गीतेच्या दहाव्या अध्यायात परमेश्वराचीं विशिष्ट रूपें म्हणून ज्याचा उल्लेख केला आहे तींही सगळीं केवळ डोळ्यांनीं दिसणारीं नाहींत, तरी पण तीं विश्वरूपांत समाविष्ट आहेत उदाहरणार्थ आत्मा (२०), मन, चेतना, (२२), ओं, जपयज्ञ (२५), काम (२८), काल (३०), वायु (३१), अध्यात्मविद्या, वादविवाद (३२), अ (३३), मृत्यु, कीर्ति, वाणी, स्मृति, मेधा, धृति, क्षमा (३४), तेजस्विता, जय, व्यवसाय, सत्व (३६), दण्ड, नीति, मौन, ज्ञान (३८) हीं त्या त्या श्लोकांत सांगितलेलीं ईश्वराचीं रूपें विश्वरूपांत समाविष्ट असूनही केवळ डोळ्यांनीं दिसणारीं नाहींत. यावरून हें सिद्ध होतें कीं, केवळ डोळ्यांनीं दिसणारेंच नव्हे, तर इतर इंद्रियांनीं जाणलें जाणारें तत्त्वही विश्वरूपांत समाविष्ट झालेलें आहे.

विश्वरूपाचें दर्शन केवळ डोळ्यांनींच होऊं शकत नसल्यामुळें गीतेंत ११।८

या श्लोकांत अर्जुनाला दिव्य दृष्टि दिल्याचा उल्लेख आहे. गीता ११।३२ या श्लोकांत "मी काल आहें," असें म्हटलें आहे. पण काल ही वस्तु कांहीं डोळ्यांनीं दिसणारी नव्हे. तसेंच ११।३९ मध्यें "माझें रूप वायु आहे," असें म्हटलें आहे. वायु हाही डोळ्यांचा विषय नाहीं. आणखीही अकराव्या अध्यायांत डोळ्यांनीं न दिसणाऱ्या कितीतरी पदार्थांचा विश्वरूप म्हणून उल्लेख केला आहे.

## दिव्य दृष्टि

गीता ११।८ मध्यें म्हटलें आहे कीं, भगवन्तांनीं अर्जुनाला दिव्य दृष्टि दिल्यावर मग तो विश्वरूपाचें दर्शन करूं शकला. या उल्लेखावरून कित्येकांचा असा समज झाला आहे कीं, हें दिव्य दृष्टीचें ज्ञान म्हणजे एखादा मंत्रप्रयोग किंवा योगप्रयोग असेल. कित्येकांची कल्पना अशी आहे कीं, ज्याप्रमाणें चित्रपटावर निरनिराळीं दृश्यें दिसतात, तशीं अर्जुनाला या वेळीं दिसलीं असतील; किंवा अर्जुनाच्या समोर मोठें थोरलें आकाशाला व्यापून टाकणारें विक्राळ रूप उभें राहिलें असेल. पण या सगळ्या केवळ कल्पनाच आहेत.

दिव्यदृष्टि हा एकादा मंत्रप्रयोग, योगनिद्रा अथवा योगसामर्थ्य यापैकीं कांहींही नसून ती जगाकडे पहावयाची एक निराळी दृष्टि आहे. प्रत्येक मनुष्य विश्वाचें रूप पहात असतोच. अर्जुनाच्या समोर सर्व विश्व होतें, आणि चार सामान्य मनुष्यांप्रमाणेंच तोही विश्वरूप पहात होता. सूर्य, चंद्र, पृथ्वी, तारागण, वृक्ष, पर्वत, नद्या, समुद्र, मेघ इत्यादि अनेक वस्तु या विश्वांत आहेत, आणि लोक त्यांच्याकडे पहातही असतात. हेंच विश्वाचें रूप. अर्जुन हें रूप पहातही होता. पण या साध्या पाहण्यांत आणि दिव्य दृष्टीनें पहाण्यांत थोडासा भेद आहे. मनुष्य प्रत्येक वस्तु खण्डित रूपांत पहातो. त्याला प्रत्येक वस्तु दुसऱ्या वस्तूहून वेगळी दिसते. प्रत्येक मनुष्यास या विभिन्नतेचा अनुभव येतो. सर्व साधारण मनुष्याची दृष्टि या विभिन्नतेच्या चष्म्यांतूनच जगाकडे पहात असते. दृष्टींतील हा विभिन्नतेचा दोष दूर करून तिच्यांत एकत्व पहाण्याची शक्ति निर्माण करणें, याचाच अर्थ दिव्य-दृष्टि देणें होय. ही गोष्ट लक्षांत येण्याकरितां खालीं एकदोन उदाहरणें दिलीं आहेत.

## विविधत्वांत एकत्व

१. सोन्याचे नाना प्रकारचे अलंकार घडविले. प्रत्येक अलंकाराचें स्थान, आकार आणि उपयोग यांत भिन्नता आहे खरी. पण सोन्याच्या सोनेंपणांत कोठेंही भिन्नभाव नाहीं. सर्व अलंकार हें सोनेंच आहे, यांत शंका नाहीं. या उदाहरणांत त्या अलंकाराकडे अलंकार-दृष्टीनें पाहणें ही भेददृष्टि, व सुवर्णदृष्टीनें पाहणें ही एकत्व-दृष्टि किंवा अभेददृष्टी आहे. हीच दिव्य दृष्टि होय.

२. साखरेचीं अनेक खेळणीं तयार केलीं. त्या खेळण्यांत प्रत्येक खेळणें वेगवेगळ्या जातीचें आहे, असें जरी वाटलें, तरी साखरपणा मात्र सर्व खेळण्यांत एकच आहे असें एकत्व पाहणें ही दिव्य दृष्टि होय.

प्रत्येक मनुष्य अलंकार आणि खेळणीं याचेबरोबरच सोनें आणि साखर यांस पहातच असतो. अलंकार पहात असून सोनें न पहाणारा असा कोणीच असणार नाहीं. या दोन्ही दृष्टि मनुष्यांत आहेतच. विश्वाला पहात असतांना तो एकत्वदृष्टीचा उपयोग करीत नाहीं, इतकेंच. कारण त्याला प्रत्येक वेळीं प्रत्येक पदार्थ वेगळा दिसतो. आणि यामुळेंच सुप्त असलेल्या या एकत्वदृष्टीचा उदय त्याच्यात होत नाही.

सर्वच मनुष्यें विश्वरूप पहात असतात. विश्वरूप न पहाणारा असा मनुष्य शोधूनही सापडणार नाहीं. पण हीं सगळीं मनुष्यें विश्वांत विभिन्नतेचा अनुभव करतात. या विभिन्नतेला व्यापून असणारी जी एकता, तिचा साक्षात्कार त्यांना होत नाहीं. समजावून सांगितल्यानेंच ही एकत्वदृष्टि मनुष्यास प्राप्त होऊं शकते. गीतेच्या सातव्या अध्यायांत हें समजावण्यासाठीं म्हटलें आहे—

> भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।
> अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥४॥
> अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।
> जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥५॥ ( भ.गी. ७ )

'पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धि, अहंकार आणि जीवभाव अशी नऊ प्रकारची ईश्वराची प्रकृति आहे. अर्थात् हें नवविध ईश्वराचें शरीरच

आहे. प्रकृति म्हणजे शरीरच. हें नवविध शरीर माझें आहे, असें प्रत्यक्ष भगवान् म्हणतात. यावरून कबूल करून घेतें की, या नऊ तत्त्वांचें मिळून जसें मनुष्य-शरीर झालें आहे, तसेंच ईश्वराचा विराट् देहही या नऊ तत्त्वांचाच झालेला आहे. हीं एकंदर नऊ तत्त्वें एकापेक्षा एक सूक्ष्म व एकाच्या आत एक अशीं आहेत.

जीवभाव हा सर्वांच्या आंत असून त्याच्या बरोबर अहंकार आणि बुद्धि यांचें वास्तव्य आहे. बुद्धीच्या बाहेर मन, त्याच्याबाहेर आकाश, आणि आकाशानंतर वायु, तेज, जल व पृथ्वी हीं तत्त्वें आहेत. भगवन्ताच्या म्हणण्यावरून हें ईश्वराचें शरीर आहे, हें सिद्ध होत आहे. एकदा ही गोष्ट मानली की, मग जेथें जेथें हीं नऊ तत्त्वें असतील, तेथें तेथें तें परमात्म्याचें शरीर आहे, असें म्हणावें लागेल.

हें समजल्यावर जेथें जेथें पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश हीं तत्त्वें दिसतील तेथें तेथें परमात्म्याच्या स्वरूपाचा साक्षात्कार होऊं लागेल. हीं पंचमहाभूतें कोठें नाहींत? ह्यांच्यावांचून विश्वांतील एकही स्थान रितें नाहीं. म्हणून जेथें परमात्म्याचा देह नाहीं, अशी जागा कोठें शोधूनही सापडणार नाहीं. आम्ही आत्म्याला देहावरून जाणूं शकतों, तसेंच परमात्म्यालाही त्याच्या विश्वरूप देहावरूनच जाणता येईल! देहाला पाहिल्यावरच आत्म्याचें ज्ञान होतें. देह बाजूला ठेऊन केवळ आत्म्याला जाणणें असंभवनीय आहे. त्याचप्रमाणें विश्वरूप देहावरूनच परमात्मा, परब्रह्म किंवा ईश्वर यांचा साक्षात्कार होऊं शकेल.

ॐ खं ब्रह्म ।　　( वा. य. ४०।१७ )

' ओंकारानें जाणलें जाणारें ब्रह्म आकाशवत् आहे ' अथवा आकाशच त्याचा देह आहे, असेंही म्हणतां येईल तसेंच अग्निही त्याचा देह आहे अग्नि कोठें नाहीं? विचाराअन्तीं असें कबूल करून घेईल कीं, तो सर्वत्र आहे. पृथ्वी, पाणी, वृक्ष, प्राणी, सूर्य, चन्द्र, इत्यादि सर्वांत तो भरलेला आहे जर अग्नि हें परमात्म्याचें शरीर आहे, ही गोष्ट खरी आहे, तर मग अग्नि सर्वत्र व्याप्त असल्यामुळें परमात्माही सर्वत्र असलाच पाहिजे तसेंच जेथें जेथें जीवभाव आहे तेथें तेथेंही परमात्म्याचा देह आहेच. तो जीव-भाव सर्वत्र असल्यामुळें निदान

सर्व प्राणी तरी परमात्म्याचे देहीच आहेत, 'हें सिद्ध झालें. भगवद्गीतेच्या या दिव्य दृष्टीनें विश्वाकडे पाहिलें असतां सर्व प्राणी मिळून परमेश्वराचा देहच आहेत, हें समजून येईल. आकाश हें परमात्म्याचें शरीर आहे. म्हणून संपूर्ण आकाश हें परमात्म्याचा देहच आहे. याचप्रमाणें गीतेंत सांगितलेलीं नवविध शरीरें परमात्म्याचीं आहेत, ही वस्तुस्थिती ध्यानात आल्यावर सर्वत्र परमात्मा अनुभवास येऊं लागेल. या तत्त्वांपैकीं प्रत्येक तत्त्व कोठें कोठें आहे, याचा शोध करून तें तत्त्व परमात्म्याचें शरीर आहे, असा निश्चय करीत जावें. परमेश्वर-साक्षात्काराचा हा अभ्यास आहे.

याच अभ्यासानें विश्वरूप हें अखण्ड असून तें परमात्मरूप आहे, ही प्रतीती होऊं लागते. सर्वसाधारण समजूत अशी कीं, मानवी दृष्टीला फक्त बाह्य शरीरच काय तें दिसूं शकतें. आत्मा अदृश्य असल्यामुळें तो चर्मचक्षूंना दिसूं शकत नाहीं. आणि आत्मा व परमात्मा या दोन्ही वस्तु मिळून तत्वतः एकच तत्त्व असल्यामुळें आत्म्याप्रमाणेंच परमात्माही मानवी दृष्टीला अदृश्यच आहे. पण गीतेचा सिद्धांत असा आहे कीं, चर्मचक्षूंना न दिसणारें अदृश्य असें परमात्मस्वरूप आहेच, पण पृथ्वी–आप–तेज–वायु–आकाश–मन–बुद्धि–अहंकार-जीवभाव हीं सगळीं एकत्र मिळून आणि एकएकटीं परमात्म्याचीं शरीरें असल्यामुळें परमात्मा हा विश्वरूपानें चर्मचक्षूंनाही दृश्य आहे. ज्या ठिकाणीं या नऊ वस्तूंपैकीं एकादी वस्तु दिसेल तेथें तें परमात्म्याचें शरीर आहे, असें समजावें. सर्व प्राण्यात हीं नऊ तत्त्वें आहेत. म्हणून गीतेच्या सिद्धान्ताप्रमाणें जीवमात्राचीं शरीरें हीं परमात्म्याचीं. शरीरें अर्थात् परमात्मरूपेंच आहेत. याचप्रमाणें वृक्षादि इतर पदार्थही परमात्म्याचें शरीर असल्यामुळें तीं परमात्म-रूपेंच आहेत. सूर्य, चंद्र, तारागण हीं सर्व तैजस् तत्त्वाचीं बनलेलीं आहेत; आणि तेज किंवा अग्नि हें परमात्म्याचें शरीर असल्यामुळें हीं सर्व परमात्मरूपें आहेत, हें पूर्वी एकदां सांगितलेंच आहे. पृथ्वी, जल, वायु हीं सगळीं परमात्म्याचीं शरीरें असल्यामुळें परमात्मरूप आहेत, हाही उल्लेख पूर्वी येऊन गेलेलाच आहे. आतां असा प्रश्न निर्माण होतो कीं, गीतेचें पूर्वोक्त वचन मानल्यावर जिच्यामध्यें

हीं नऊ तत्त्वें नाहींत, अशी कोणती वस्तु कोठें आहे बरें? अर्थात् अशी वस्तु कोठेंही असणें शक्यच नाहीं. विश्वांत असलेला प्रत्येक पदार्थ या नऊ तत्त्वांनीं युक्त असल्यामुळें तें सर्व परमात्म्याचें शरीरच आहे. म्हणून सर्व विश्व हें परमात्म्याचें शरीर आहे. यामुळें जें विश्वाचें रूप इंद्रियगोचर होईल किंवा न होईल तें परमात्म्याचेंच रूप आहे, ही गोष्ट सिद्ध झाली.

हेंच विश्वरूपाचें दर्शन-प्रत्येक मनुष्य अशा विवेकाच्या सहाय्यानें परमेश्वराच्या या रूपाचा साक्षात्कार करूं शकतो. या दृष्टीमुळें तो मनुष्य पूर्वी जसें विश्व पहात होता, तसेंच ही दृष्टि प्राप्त झाल्यावरही पाहील. पण पूर्वी त्यास जें भेद-दर्शन होत होतें, त्याचे जागीं आतां त्या भेदांमध्येंच अभेद दिसूं लागेल.

वेदांमध्यें याच सिद्धान्ताचें प्रतिपादन केलें आहे. वेद म्हणतो—

> ब्राह्मणोऽस्य मुखमासीद्बाहू राजन्यः कृतः।
> ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत ॥११॥
> सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात्।
> स भूमिं विश्वतो वृत्वात्यतिष्ठद्दशाङ्गुलम् ॥१॥
> पुरुष एवेदं सर्वं यद्भूतं यच्च भव्यम् ॥२॥ (ऋ. १०-९०)

हेच मंत्र यजुर्वेद आणि अथर्ववेदांतही आहेत. याचें तात्पर्य असें कीं, "ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे या परमात्म्याचें मुख, बाहु, मांड्या आणि पाय आहेत. या पुरुषाचीं हजारों मस्तकें, हजारों डोळे, (हजारों हात आणि हजारों मांड्या) आणि हजारों पाय आहेत. हा पुरुष या विश्वरूपानें पृथ्वीवर सर्वत्र राहतो, आणि विश्वास व्यापूनही शिल्लक उरला आहे. सर्व कांहीं हा परमात्माच आहे. जें भूतकाळीं होतें, वर्तमानकाळीं आहे, भविष्यकाळीं असेल, तें तें सर्व परमात्माच आहे."

पूर्वोक्त वर्णनानें हा सिद्धान्त अधिक स्पष्ट होतो. ज्या अर्थी पंचमहाभूतें, अन्तःकरण-चतुष्टय व जीवभाव हे परमात्म्याचे देह आहेत, त्या अर्थी सर्व प्राणी प्रभूचींच रूपें आहेत. याविषयीं अधिक लिहिण्याची आवश्यकताच नाहीं.

## रुद्रदेवतेचें विश्वरूप

वाजसनेयी यजुर्वेद संहितेच्या १६ व्या अध्यायात रुद्रदेवतेच्या स्वरूपांची मोजणी केली आहे हा रुद्राध्याय कमी अधिक प्रमाणात प्रत्येक यजुर्वेद-संहितेंत आहे त्यांत असा उल्लेख आहे कीं, सर्व मनुष्यें, प्राणी, वृक्षवनस्पती आणि स्थावर जंगमादि पदार्थ रुद्रदेवतेचीं रूपें आहेत. एवढेंच नव्हे, तर त्यापैकीं कित्येकांचीं नावें तेथें दिलीं आहेत त्या नांवांत "मन्त्री, सेनानी, निषंगी, कक्षाणां-पति, इषुधिमान्, सभा, सभापति, इषुकृत्, धन्वकृत्, रथी, अरय, कुलाल, कर्मार, स्तेन, स्तेनपति " अशी कितीतरी निरनिराळे व्यवसाय करणाऱ्या मनुष्यांचीं नावें रुद्राध्यायांत आहेत हीं सर्व रुद्राचीं रूपें आहेत. येथें रुद्रपद ईश्वरवाचक असल्यामुळें हीं रूपें ईश्वराचीच आहेत यांत शंका नाहीं पुरुषसूक्तानें जो सिद्धान्त माण्डला, त्याला रुद्रसूक्तानें पुष्टि दिली आहे या रुद्रसूक्तांत चारही वर्णांच्या लोकांचा उल्लेख रुद्ररूपानें केला गेला आहे चोर-दरोडेखोर इत्यादि दुष्ट-प्रवृत्तीचे लोकही रुद्राचींच स्वरूपें आहेत, मग मंत्री व सेनापति यांच्या रुद्रस्वरूपत्वाबद्दल शंकाच नको

याप्रमाणें वेद ईश्वरस्वरूपाचें वर्णन करीत असून त्यावरून हा निश्चित वैदिक-सिद्धांत आहे, हें स्पष्ट होत आहे. भगवद्गीतेनें पूर्वोक्त दिव्य दृष्टीच्या तत्त्वज्ञानानें याच सिद्धांताचें समर्थन केलें आहे एकदां पञ्चभूतांना परमेश्वराचें शरीर मानलें कीं, मग सर्व विश्व हें त्याचें शरीर बनतेंच अर्थात् सर्व विश्व हें पर-मात्मस्वरूप ठरतें, हें कोणीहि मान्य करील

दिव्य दृष्टीची ही एवढी सिद्धता सातव्या अध्यायाचे प्रारंभींच करून ठेवल्यावर मग त्याच अध्यायांत पुढें भगवन्त म्हणतात—

वासुदेवः सर्वम्। (गी० ७।१९)

'हें सर्व विश्व वासुदेव म्हणजे परमात्माच आहे. अर्थात् या विश्वांत जें जें म्हणून कांहीं आहे, तें सर्वच्या सर्व परमात्म्याचेंच स्वरूप आहे येथील गीतावचन व वेदवचन यांतील शब्दांचें साम्य पहाण्यासारखें आहे—

पुरुष एवेदं सर्वं (ऋ० १०।९०।२)
वासुदेवः सर्वम्। (गी. ७।१९)

हीं दोन्ही वचनें अगदीं एकसारखीं आहेत. वेदवचनांशीं गीतेचा इतका घनिष्ट संबंध आहे, हें पाहिल्यावर आतां आपण भगवद्गीतेच्या अकराव्या अध्यायांत विश्वरूपाचें वर्णन कसें केलें आहे, तें पाहूं. त्यांतली कांहीं वचनें अशीं आहेत—

१. अनेक-बाहु-उदर-वक्त्र-नेत्रं, (१६)
२. अनन्तवीर्य, अनन्तबाहुं, (१९)
३. बहुवक्त्र-नेत्रं, बहुबाहु-उरु-पादं, बहु-उदरं, बहु-दंष्ट्रा-करालं, (२३)
४. अनेक-वक्त्र-नयनं,(१०)

या ठिकाणीं परमेश्वराचीं अनेक मुखें, अनेक नेत्र, अनेक दाढा, अनेक उदरें, अनेक बाहु, अनेक मांड्या, अनेक पाय व आणखीही इतर अनेक अवयव आहेत, असें म्हटलें आहे. आपण कांहीं देवतांच्या मूर्ति पहातों, त्यांना अनेक मुखें व अनेक हात असूनही पोट मात्र एकच असतें. अनेक पोटें असलेली देवतेचीं मूर्ति अजून कोणीही पाहिली नाहीं. "अनेक पोटें," याचा सरळ अर्थ असा आहे कीं, जितकीं पोटें तितके पृथक् प्राणी असलेच पाहिजेत. अर्थात् पूर्वोच्या वर्णनांत असलेलीं 'अनेक-उदर,' 'बहु- उदर,' हीं पदें एकाच शरीराचें वर्णन करीत नसून अनेक भिन्न व परस्पर-पृथक् प्राण्यांच त्या वर्णनकर्त्यास अभिप्रेत आहेत. अभ्यासूनी विचार केला असतां त्यांस असें आढळून येईल कीं, वेदमंत्र आणि हीं गीतावचनें, यांत विलक्षण साम्य आहे. उदाहरणार्थ—

| वेदाचें वर्णन | गीतेचें वर्णन |
|---|---|
| सहस्रशीर्षा | अनेक-वक्त्रं, बहु-वक्त्रं |
| सहस्र अक्षः | अनेक-नेत्रं, बहुनेत्रं, अनेक-नयनं |
| सहस्रपात् | बहु-पादं |
| सहस्रबाहुः | बहु-बाहुं, अनन्त-बाहुं |

याप्रमाणें वेदांतील पदेंच किंचित् फरक करून गीतेंत घेतली गेलीं आहेत. आतां गीता ईश्वरस्वरूपाविषयीं आणखी काय म्हणते, तें पाहूं या.

१. अनन्तरूपः विश्वरूपः ( ११।१६ )
२. विश्वमूर्तिः । ( ११।४६ )
३. सर्व । सर्वः असि । ( ११।४० )

ईश्वराच्या स्वरूपाचें मनन करतेवेळीं हीं पदें महत्वाचीं आहेत; कारण हीं ईश्वराच्या स्वरूपाचा बोध करीत आहेत.

(१) ईश्वराचीं रूपें अनन्त आहेत, ईश्वर विश्वरूप आहे, (२) हें सर्व विश्व ईश्वराची मूर्ति आहे, (३) ईश्वर हें सर्व आहे, जें काय आहे, तें सर्व ईश्वरच आहे.

गीतेचीं हीं पदें विचार करण्याजोगीं आहेत. (१) 'अनन्तरूप' पदानें ईश्वराचीं अनन्तरूपें आहेत, हें सिद्ध झालें, (२) 'विश्वरूप' पदानें विश्व हें ईश्वराचें रूप आहे, हें स्पष्ट झालें. (३) 'विश्वमूर्ति', पदानें विश्व ही ईश्वराची मूर्ति आहे, हें कळून आलें, व (४) 'सर्व' पदानें हें सर्व ईश्वरच आहे हें व्यक्त झालें, या विश्वात असलेले यच्चयावत् पदार्थ प्रत्यक्ष ईश्वररूपच आहेत. हा या सर्व वचनांचा आशय आहे.

येथील 'सर्व' हें पद विश्वांतील एकही वस्तूचा त्याग करीत नाहीं, जे काय बरे वाईट पदार्थ आहेत, ते सगळे ईश्वररूपच आहेत. प्रत्यक्ष ईश्वरच त्यांच्या रूपानें आमच्यासमोर उभा राहिला आहे नुसतें स्थावर जंगमच नव्हे, तर सर्व प्राणी व मनुष्यें हीं सर्व निःसंदेह ईश्वराचीं रूपें आहेत. अर्थात् वर ईश्वराचें स्वरूप वर्णितांना जो त्याच्या अनंत मस्तकें, नेत्र, मुखें, बाहू, छात्या, पोटें, मांड्या व पाय इत्यादींचा उल्लेख केला आहे, तो करीत असतांना उल्लेख-कर्त्यांच्या समोर समष्टिरूपानें सर्व मनुष्येंच असलीं पाहिजेत. आज आपल्या भारतवर्षांत चाळीस कोट लोक आहेत, तितकींच प्रभुचीं मुखें व मस्तकें असून या संख्येच्या दुप्पट डोळे, कान, हात आणि पाय आहेत. या दृष्टिकोनांतून पाहिल्यास 'अनंत बाहु, बहुवक्त्रनेत्र,' इत्यादि वर्णन यथार्थ आहे, असें

अनुभवास येऊं लागेल. पृथ्वीवर असलेला मानवसमाज हें सर्व ईश्वराचें अखण्ड रूप आहे. ज्ञानी लोक हें ईश्वराचें मस्तक, शूर मनुष्यें हे त्याचे हात, व्यापारी हे त्याचें पोट आणि श्रमजीवी हे त्याचे पाय होत. याप्रमाणें आमचा ईश्वर मनुष्यसमूहाच्या रूपानें आम्हांस प्रत्यक्ष आहे.

पशु, पक्षी, कृमी, कीटक इत्यादि सर्व त्या प्रभूचींच रूपें आहेत. वृक्ष–वनस्पति, सर्व स्थावर पदार्थ, हींही त्याचींच रूपें आहेत. सर्व विश्वांत ईश्वराच्या स्वरूपाहून वेगळा किंवा भिन्न असा एकही पदार्थ नाहीं.

प्रत्येक वस्तूचा व्यवहारांत उपयोग करतांना तें ईश्वराचें रूप आहे, ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. आपण सर्वसाधारणपणें वागतांना एखाद्या वस्तूचा तिरस्कार करतों, आणि दुसरीविषयीं आदर बाळगतों. पण हें योग्य नव्हे. सर्व विश्व हें एक अखण्ड जीवन आहे. येथें एका ईश्वराव्यतिरिक्त आणखी कांहींही नाहीं. अशा स्थितींत कोणाचा तिरस्कार करावा ? प्रत्येकाशीं प्रेमानें आणि आदरानेंच वागलें पाहिजे. सगळ्यांशीं प्रेममय, समभावयुक्त व्यवहार व्हावा, हीच गोष्ट गीतेनें या विश्वरूप वर्णनाच्या द्वारें व्यक्त केली आहे.

भगवद्गीतेनें अशा प्रकारें विश्वाला ईश्वरस्वरूपत्व दिलें आहे. परन्तु दुर्दैवानें आम्हां भारतवासीयांनीं आजपर्यंत या ईश्वराचा स्वीकारच केला नाहीं ! केवळ एक रामानुजाचार्यच काय ते विश्वाला परमेश्वराचा देह मानतात. इतर सर्वांनीं विश्वाला तुच्छ, त्याज्य, हेय, टाकाऊ, दुःख-हेतूच मानलें आहे ! ईश्वराचें शरीर असलेलें विश्व कधींतरी टाकाऊ होईल काय ? पण तें तसें मानलें गेलें आहे, ही गोष्ट मात्र खरी.

द्वैती लोक तर विश्वाला त्याज्य मानतातच, पण धर्मगुरु शंकराचार्य हे अद्वैत–सिद्धान्ताचें प्रतिपादन करीत असतां देखील विश्वाला भ्रम, ईश्वराहून भिन्न आणि दुःख-हेतुच मानतात. जैन, बौद्ध हे तर या विश्वाला क्षणिक व दुःख-स्वरूप मानतात. मात्र वेद, उपनिषदें व गीता ही विश्व हें ईश्वराचें रूप आहे, असें सांगतात, म्हणून विश्व हें क्षणिक व दुःखरूप आहे, असें न समजतां प्रत्येकानें त्याला परमात्मरूप व सुखदायी मानावें हेंच उचित आहे.

दुःख होत असेल त्याचें कारण शोधावें हें निराळें; पण दुःखाचें कारण आपणा-मध्यें असावें व तें जगावर आरोपावें हें योग्य नव्हे.

आतांपर्यंत आपण वेदवचनें व गीतेंतील वचनें पाहिलीं. आतां यासंबंधीं महत्त्वाचीं अशीं उपनिषद्वाक्यें पाहूं या.

आत्मा वा इदं सर्वम् (छां. उ. ७।२५।२)
ब्रह्मैतत् सर्वम् । (बृ. उ. ५।३।१)
सर्वाणि भूतानि आत्मा एव अभूत् । ( ईश उ.७; वा.य. ४०।७; काण्व य. ४०।७)

सर्वं ह्येतद् ब्रह्म । (माण्डूक्य २)
सर्वं ह्ययमात्मा । (नृ. उ. ७)
ब्रह्मैवेदं सर्वं सच्चिदानंदरूपं । (नृ.उ. ७)
नारायण एवेदं सर्वम् । (नारायण उ. २)
सर्वं खलु इदं ब्रह्म । (छां. उ. ३।१४।१)
अहमेवेदं सर्वम् । (छा. उ. ५।२।६;७।२५।१)
एतदात्म्यमिदं सर्वम् । (छां. उ. ६।१।४)
स एवेदं सर्वम् । (छा. उ. ७।२५।२)
इदं सर्वं यदयमात्मा । (बृ. उ. २।४।६; ४।५।७)
ओंकार एवेदं सर्वम् । (छा. उ. २।२३।४)

हें सर्व विश्व ब्रह्म, आत्मा आणि नारायणरूप आहे, असेंच हीं सगळीं उपनिषद्वचनें सांगतात. ब्रह्म, परब्रह्म, आत्मा, परमात्मा, नारायण, ओंकार, वासुदेव, देव, महादेव, रुद्र, इंद्र, अहं, सः' इत्यादि सर्व नावें जो एक असून विश्वाकार झाला आहे, अशा वस्तूचीं द्योतक आहेत. सगळ्या उपनिषदांचें हेंच सार आहे.

सर्वाणि भूतानि आत्मा एव । (ईश उ. ७)

हें ईशोपनिषदाचें वचन आहे; आणि त्यांत 'सर्व भूतमात्र आत्मा आहेत,' ही वस्तुस्थिति स्पष्टपणें सांगितली आहे. येथें "भूतें" याचा पंचमहाभूतें किंवा प्राणिमात्र यांपैकीं कोणताही अर्थ घ्यावा. या विश्वांतली प्रत्येक वस्तु

निर्माण झाली असल्यामुळें तिला ' भूत, ' अशी संज्ञा आहे. हे सर्व निर्माण झालेले पदार्थ 'आत्मा' किंवा आत्मस्वरूपच आहेत. ज्याप्रमाणें सोन्यापासून अलंकार घडले जातात, व अलंकार बनल्यानंतरही तें सोनेंच असतें तशींच ब्रह्मापासून हीं सर्व भूतें निर्माण झालीं आहेत, व तीं बनल्यानंतरही ब्रह्मरूपच आहेत. आणखी एक उपनिषद्वाक्य येथें आपण पाहूं या—

> अग्निर्मूर्धा चक्षुषी चन्द्रसूर्यौ दिशः श्रोत्रे वाग्विवृताश्च वेदाः। वायुः प्राणो हृदयं विश्वमस्य पद्भ्यां पृथिवी ह्येष सर्वभूतान्तरात्मा ॥ ( मुण्डक उ.२।१।४ )

याच अर्थाचा एक श्लोक भागवतांत आहे—

> इंद्रादयो बाहव आहुरुस्राः कर्णौ दिशः श्रोत्रममुष्य शब्दः।
> नासत्यदस्रौ परमस्य नासे घ्राणोऽस्य गंधो मुखमग्निरिद्धः॥२९
> द्यौरक्षिणी चक्षुरभूत्पतङ्गः पक्ष्माणि विष्णोरहनी उभे च।
> तद्भ्रूविजृम्भः परमेष्ठिधिष्ण्यमापोस्य तालू रस एव जिह्वा॥३०॥
> ( भागवत २।१ )

या दोन्ही वचनाच्या प्रतिपादनाप्रमाणें खालीलप्रमाणें कोष्टक बनतें—

| जीवात्माचे | परमात्म्याचे |
|---|---|
| व्यक्ति-शरीरांतील अवयव | विश्वदेहांतील देवता |
| मस्तक | अग्नि |
| भुवया | नक्षत्रें |
| डोळे | सूर्य-चन्द्र |
| पापण्या | रात्रि-दिवस |
| नाक | अश्विदेव |
| कान | दिशा |
| बाहू | इन्द्रादि देवता |
| वाणी | वेद |
| मुख | प्रदीप्त अग्नि |

| | |
|---|---|
| प्राण | वायु |
| तालु | आप् |
| जिव्हा | रस |
| हृदय | अन्तरिक्ष |
| पाय | पृथ्वी |

याप्रमाणें हें **'सर्वभूतान्तरात्म्याचें विश्व शरीर'** आहे. आणि या विश्व-शरीरांतील कांहीं अंशापासून जीवाचें पिण्डशरीर बनलें आहे. अर्थात् हें जीवाचें शरीर त्या विश्वशरीराचा एक अंश असल्यामुळें त्याच्याहून पृथक् नाहीं. परमेश्वराच्या विश्वमूर्तिरूपी सागरातला एक बिन्दु म्हणजे जीवशरीर होय. हा या दोघाचा अन्योन्य संबंध आहे.

विश्व हीच परमेश्वराची प्रचण्ड मूर्ति आहे. आणि स्वतः परमात्माच या मूर्तीच्या आकारानें प्रकट झाला आहे. याविषयीं ऋग्वेदाचा एक मंत्र पहाण्या-सारखा आहे—

**रूपं रूपं प्रतिरूपो बभूव तदस्य रूपं प्रतिचक्षणाय ।**
**इंद्रो मायाभिः पुरुरूप ईयते० ।** (ऋ. ६।४७।१९)

' प्रत्येक रूपाकरितां तो प्रभु प्रतिरूप झालेला आहे. हें त्याचें रूप त्याच्याच दर्शनाकरिता आहे. इन्द्र आपल्या अनेक शक्तींनीं अनन्तरूप होऊन राहिला आहे. '

परमेश्वराचें यथार्थ रूप समजण्यास हा मंत्र अत्यंत उपयोगी आहे. **' इन्द्रो मायाभिः पुरुरूप ईयते।'** ' प्रभु आपल्या अनन्त शक्तींनीं अनन्त रूपांनीं नटलेला आहे !' हें वचन तर अगदीं स्पष्टच आहे. याहून अधिक स्पष्ट असें काय बरें सांगता येईल ?

इन्द्र हा परमात्माच आपल्या अनंत शक्तींनीं नानाविध रूपांनीं नटलेला आहे. हीं विश्वांत व्यक्त झालेलीं रूपें त्या परमात्म्याचींच असून त्या प्रत्येक रूपात एक किंवा अनेक शक्ती निवास करीत आहेत. म्हणूनच विश्वांत गुण, शक्ती आणि कर्में यांत विविधता दिसून येते. सूर्य आणि अग्नि यांत तेज, जलांत शीतलता,

अन्नांत पुष्टि, औषधींत रोगहरण सामर्थ्य, त्याचप्रमाणें वेगवेगळ्या पदार्थांत वेगवेगळ्या शक्ती प्रकट होतात, या सर्व शक्ति ईश्वराच्या असून त्या भिन्नभिन्न वस्तुंच्या द्वारें विश्वात व्यक्त झालेल्या आहेत. याविषयीं खालील मंत्र पहाण्याजोगे आहेत—

तदेवाग्निस्तदादित्यस्तद्वायुस्तदु चन्द्रमाः।
तदेव शुक्रं तद्ब्रह्म ता आपः स प्रजापतिः॥
(वा. य. ३२।१; काण्व य. ३५।२३)

तदेवाग्निस्तद्वायुस्तत्सूर्यस्तदु चन्द्रमाः।
तदेव शुक्रममृतं तद्ब्रह्म तदापः स प्रजापतिः॥
(तै. आ. १०।१।२; ना. उ. १।२; म. ना. उ. १।७)

'तें ब्रह्मच अग्नि, सूर्य, वायु, चन्द्रमा, शुक्र, अमृत, ब्रह्म, जल आणि प्रजापति आहे.' यावर टीका करतांना सायनाचार्य लिहितात, "**यद्यज्जगद्विद्यादृष्ट्या नानाविधं प्रतीयते, तत्सर्वं विद्यादृष्ट्या अखण्डैकरसं ब्रह्मैव।**" (तै. आ. सा. भा. १०।१।२) अर्थात् अविद्या-दृष्टीनें विश्वामध्यें जे अग्नि, वायु इत्यादि वेगवेगळे पदार्थ दिसतात, ते सर्व दिव्य दृष्टीनें पाहिलें असतां ब्रह्मरूपच दिसतात. विद्यादृष्टि व अविद्यादृष्टि या अनुक्रमें सुखदायी व दुःखदायी आहेत, यात संशय नाहीं. सामान्य मनुष्य गुरुमुखाशिवाय तत्त्वावबोधास पारखा असल्यामुळें पृथ्वी, आप, तेज यांना भिन्न वस्तु मानतो. पण तत्त्वज्ञ मात्र या सर्व वस्तूंचे ठिकाणीं ब्रह्म-स्वरूपाचा अनुभव करून त्यांच्याशी समदृष्टीनें व्यवहार करतो.

पूर्वोक्त मंत्रांतील 'तत्' पद ब्रह्मवाचक आहे. '**तत् एव शुक्रं**' असें म्हणून हा मंत्र शुक्राचें ब्रह्मरूपत्व वर्णीत आहे. अर्थात् मनुष्य-शरीरांतील शुक्र अथवा वीर्य हें ब्रह्मच आहे. वीर्याच्या ब्रह्मत्वामुळें त्यापासून निर्माण झालेली प्रजाही ब्रह्मरूपच सिद्ध झाली. पुरुषसूक्तांत म्हटल्याप्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे त्या पुरुषाचे अवयव आहेत. हा पुरुष-सूक्तांतील सिद्धान्त वीर्याच्या ब्रह्मत्वामुळें आणिकच दृढ झाला आहे. कारण ब्रह्मरूप वीर्यापासून

निर्माण होणारी जीव-जाति ब्रह्माहून वेगळी असूंच शकत नाहीं. ब्रह्मापासून दुसऱ्या कशाची ही उत्पत्ति मानणें युक्तिसंगत होणार नाहीं. हीच गोष्ट ऋग्वेदाच्या खालील मंत्रांत सांगितली आहे-

**इन्द्रं मित्रं वरुणं अग्निं आहुः, अथो दिव्यः स सुपर्णो गरुत्मान्।**
**एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति अग्निं यमं मातरिश्वानमाहुः ॥**
(ऋ० १।१६४।४६)

'(एकं सत्) एकच सत् आहे. त्या एकालाच (विप्रा बहुधा वदन्ति) ज्ञानी पुरुष विविध प्रकारांनीं वर्णितात. त्या एक सतालाच ज्ञानी पुरुष अग्नि, वरुण, इन्द्र, यम, मातरिश्वा, मित्र, सुपर्ण, गरुत्मान् इत्यादि नांवें देऊन त्याचें वर्णन करतात.'

या मंत्राचा विचार केला असतां असें आढळून येईल कीं, एकच सद्वस्तु असून अग्नि आदि देवतांच्या विविध सूक्तांत तिचेंच वर्णन विविध प्रकारांनीं केलें जातें. यावरून असें सिद्ध होतें कीं-

**सर्वे वेदा यत्पदमामनन्ति ।** (कठ उ. १।२।१५)
**वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यः ।** (गी. १५।१५)

सर्व वेदांतील अनेक देवतांचें वर्णन करणाऱ्या सूक्तांनीं एकाच परमात्म्याचें वर्णन केलें जातें. एकाच सद्वस्तूचीं अग्नि आदि सर्व नांवें असल्यामुळें तिचींच हीं भिन्नभिन्न रूपें आहेत. एकाच सद्वस्तुपासून हा सर्व विश्वाकार निर्माण झालेला आहे. अथवा संपूर्ण विश्व मिळून एकच सद्वस्तु आहे. तैत्तिरीय आरण्यकांतील पुढील मंत्र हाच भाव प्रदर्शित करीत आहे.-

**सहस्रशीर्षं देवं विश्वाक्षं विश्वशंभुवम् ।**
**विश्वं नारायणं देवं अक्षरं परमं विभुम् ॥**
(तै आ. १०।११।१)

याचें सायणभाष्य पुढीलप्रमाणें आहे— "......सहस्रशीर्षं अनन्तशिरस्कं, ......सर्वजगदात्मकं विराड्रूपं महेश्वरस्य देहः । ...अस्मदादीनां शिरांसि सर्वाण्यपि तदीयान्येव इति अनन्त-

शिरस्त्वम् । ...... अस्मदादीन्यक्षाणि इन्द्रियाणि तदीयान्येव ......विश्वं जगदात्मकम्०। "

' हा नारायण देव, महादेव, हजारों मस्तकें आणि अवयव यानीं युक्त आहे. कारण आम्हां सर्व प्राण्यांची मस्तकें, डोळे, नाक, कान आदि अवयव हे त्याचेच अवयव आहेत, अर्थात् त्याचे अवयव सहस्रावधि आहेत.' प्राणिमात्र हें ईश्वराचें स्वरूप आहे, असें पूर्वोक्त भाष्यांत सायनाचार्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे. ईश्वर हा 'विश्वरूप' आहे, इतकेंच नव्हे तर तो प्रत्यक्ष विश्वच आहे. वरील मंत्रांत ' विश्व ' पद परमात्म्याचेंच वाचक आहे. विष्णुसहस्रनामाच्या प्रारंभींच असें म्हटलें आहे कीं,

विश्वं विष्णु (वि. स. ना. १)

" विश्व हाच विष्णु आहे, " अर्थात् विश्व हें विष्णु असून विष्णु हा विश्व आहे. विष्णु हें ' व्यापक ' या अर्थाचें नांव आहे. हा व्यापक विष्णु म्हणजे हें प्रत्यक्ष दिसणारें विश्वच होय. हेंच सर्व शास्त्रांनीं केलेलें वर्णन भगवद्गीता अकराव्या अध्यायांत विश्वरूप–दर्शनाच्या रूपानें करीत आहे. वेद, उपनिषदें, भगवद्गीता, विष्णुसहस्रनाम, श्रीमद्भागवत इत्यादि सर्व ग्रन्थ या सिद्धान्ताची सिद्धि करीत आहेत. ही गोष्ट वाचकांच्या ध्यानीं येईलच.

आतां गीतेंतें एतत्संबंधी वर्णन पाहूं या—

पश्यादित्यान्वसून्रुद्रान् अश्विनौ मरुतस्तथा ॥ ११-६
अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ।
अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥१०॥
दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनम् ।
सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम् ॥११॥
तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।
अपश्यद्देवदेवस्य शरीरे पाण्डवस्तदा ॥१३॥
पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ॥
ब्रह्माणमीशं कमलासनस्थं ऋषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥१५॥

अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूप ॥१६॥
अनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रं पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रम् ॥१९॥
रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादं
बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहम् ॥२३॥
अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसंघैः
भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥२६॥
वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति दंष्ट्राकरालानि भयानकानि
केचिद्विलग्ना दशनान्तरेषु संदृश्यन्ते चूर्णितैरुत्तमांगैः ॥२७॥
वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशाङ्कः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ॥३७॥

(भ. गी. ११)

'या परमेश्वरस्वरूपात द्वादश आदित्य, अष्ट वसु, अकरा रुद्र, दोन अश्विनीकुमार आणि सर्व मरुद्गण यांना पहा.' (६) हें देवगणांचें वर्णन आहे, व हें ईश्वराचें अधिदैवत स्वरूप होय.

'या ईश्वराच्या रूपात अनेक मुखें, अनेक नेत्र असून या स्वरूपात पहाण्याजोगीं अनेक रूपेंही दिसत आहेत. या देवानें अनेक दिव्य आभूषणें धारण केलीं असून हातांत अनेक दिव्यायुधें घेतलीं आहेत. हा अनेक दिव्य वस्त्रें ल्याला असून यानें अनेकविध पुष्पमाला धारण केल्या आहेत. तसेंच यानें आपल्या शरीरास विविध चन्दनें आणि उटणीं लावलीं आहेत. हा आश्चर्यकारक देव अनन्त असून चहूं दिशांस तोंडें करून उभा आहे' (१०–११) हें वर्णन प्रत्यक्ष समोर दिसणाऱ्या सैनिकांचें आहे. ते सैनिकच अर्जुनाच्या समोर नानाप्रकारचीं वस्त्रें, माला इत्यादि लेऊन हातांत नानाविध आयुधें घेऊन उभे होते. विश्वरूपांतील हीं सैनिकांचीं रूपेंच अर्जुनास दिसत होतीं, शिवाय हे सैनिक चारी दिशांना तोंडें करून उभे होते. सर्व सैनिकांना ईश्वराचे स्वरूपांत पाहून अर्जुन हें प्रत्यक्ष दिसणाऱ्या वस्तुस्थितीचेंच वर्णन करीत आहे

'या एका प्रभूच्या स्वरूपांत हें विश्व एकरस पण अनेकधा विभक्त होऊन राहिलेलें दिसत आहे.' ( १२ ) या वर्णनानें, संपूर्ण विश्व एक असूनही प्रत्येक

वस्तूच्या भिन्नत्वामुळें विभिन्न दिसतें, ही गोष्ट स्पष्ट झाली आहे अर्थात येथें एकत्वांत विभिन्नत्व व विभिन्नत्वात एकत्व दाखवलें आहे.

'*या विश्वरूप ईश्वराच्या शरीरांत सर्व देव, सर्व भूतांचे संघ, कमलासन ब्रह्मा, ईश, ऋषि, दिव्य सर्पही दिसत आहेत.*' (१५) हें वर्णन भूतकालाचें आहे. हे सर्व ऋषिगण भूतकाली होऊन गेलेले आहेत.

'पहा, या ईश्वररूपात अनेक बाहु, अनेक उदरें, अनेक मुखें व नेत्र आहेत. चन्द्र-सूर्य याचे नेत्र आहेत. प्रदीप्त अग्नि याचें मुख आहे. या स्वरूपांत मुखादि अनन्त अवयवांचा अन्तर्भाव झालेला आहे.' (१६, १९, २३,) सर्व लोकांचे अवयव हे ईश्वराचेच अवयव आहेत, हें जाणून जें दृश्य प्रत्यक्ष दिसत होतें, त्याचेंच हें वर्णन आहे.

'हे प्रभो, हे सर्व धृतराष्ट्राचे पुत्र, अन्य सगळे राजे, भीष्म, कर्ण आणि आमच्या सेनेंतील सेनानायक तुझ्या मुखांत प्रविष्ट झाले आहेत. तुझ्या *दंतपंक्तीखालीं हे सगळे चुरडले जात आहेत, कित्येकांचें तर दाढांखालीं चूर्ण* झालें आहे.' (२६, २७) हें सर्व वर्णन भविष्यकालाचें असून ही घटना युद्धाच्या वेळीं घडणारी आहे

'हे प्रभो, तूंच वायु, यम, अग्नि, वरुण, व प्रजापति पितामह आहेस.' (३९) हें वर्णन अधिदैवताचें असून ६ व्या श्लोकाशीं याचें साम्य आहे.

असो. याप्रमाणें या वर्णनांत भूतकाल व भविष्यकाल या दोन्हींचें वर्णन आहे. वर्तमानकाल तर प्रत्यक्ष समोर दिसतच आहे. युद्ध एकदा अनिवार्य झाल्यावर हे सगळे वीर मरणार, हें अर्जुनाला कळून चुकलें व तो या वीरांच्या मरणासंबंधीं कल्पना करूं लागला. "युरोपमधील सभ्यता युद्धाच्या खाईत जळून भस्म होणार।" असे लेख क्रान्तिदृष्टे लोक युद्ध होण्यापूर्वी ४।५ वर्षे लिहीत होते. ते त्यांनी लिहिले व तसें झालेंही अर्जुनाला विश्वव्यापिनी दृष्टि *प्राप्त झाल्यावर आणि युद्ध अटळ आहे*, असें ठरल्यावर तो या वीरांचा चुराडा होण्याचीं दृश्यें अन्तर्दृष्टीनें पाहून त्याचें वर्णन करीत होता. या एकंदर वर्णनांत पुष्कळसें वर्णन अर्जुनास समोर दिसणाऱ्या वस्तुस्थितीचें होतें. या वर्णनांतलें हें

वैशिष्ट्य पहाण्याजोगें आहे.

जेव्हां भ. गी. ७।४-५ या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें पंचमहाभूतें हा ईश्वराचा देह आहे हें कळून आलें, आणि यामुळें सर्व विश्व पांचभौतिक असल्यामुळें तें ईश्वराचा देहच आहे, अशी त्यास प्रतीति झाली, तेव्हां मग अर्जुनास भेदांत अभेद आणि अभेदांत भेद पहाण्याची दृष्टी प्राप्त होऊन, त्यानंतर हें सर्व विश्व अखण्ड मूर्तीप्रमाणें एकच आहे, अशी दृढ भावना त्याच्या मनांत निर्माण झाली.

हेंच विश्वाचें रूप सर्वांस दृष्टीसमोर दिसत आहे. यास न पहाणारा मनुष्य कोठेंही अस्तित्वांत नाहीं. पण हें सबंध विश्वरूप प्रत्यक्ष पुढें असूनसुद्धां तें एकाच विश्वात्म्याचें रूप आहे, यावर बहुतेकांचा विश्वास बसत नाहीं. म्हणून हीं रूपें विभिन्नच आहेत, असें ते समजतात. पण जेथें जेथें पंचमहाभूतें व अन्तःकरण-चतुष्टय आहेत, तें सर्व एकाच अद्वितीय परमात्म्याचें रूप आहे, ही गोष्ट एकदां त्यांना कळून आली, की मग या विविधतेंतही अखण्ड एकताच अनुस्यूत आहे, हें त्यांना स्पष्टपणें समजेल. हें समजणें म्हणजेच दिव्यदृष्टि प्राप्त होणें. ही दृष्टि कोणालाही वर सांगितलेल्या विशिष्ट मनन-पद्धतीनें प्राप्त होऊं शकेल. अर्जुनाला ही दृष्टि मागच्या अध्यायांतच प्राप्त झाली असल्यामुळें या अध्यायांत भगवन्तांनीं केवळ "दिव्यं ददामि ते चक्षुः।" असें म्हटलें आहे. याहून अधिक वर्णन न करण्याचें कारण असें की, एकदां सांगितलेलें ज्ञानच पुनः पुनः सांगण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं.

सर्वच मनुष्यें विश्वाला पहातात. दिव्यदृष्टिवान् मनुष्य त्यांत एकता आणि अखण्डितता अनुभवतो, आणि सर्वसाधारण मनुष्य त्यांतील विविधतेवर मोहित होतो, हाच दोघांतला भेद आहे.

गीता हा तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ असूनही त्याची भाषा काव्यमयी आहे. म्हणून हा काव्याचा पडदा दूर करून आंतलें शुद्ध सत्य तत्त्वज्ञानाचे दृष्टीनें पहातां आलें पाहिजे. असें पाहिल्यावर जें विश्वरूप दिसेल त्याचेंच वर्णन वर केलें आहे. आतां असा एक प्रश्न निर्माण होतो की, विश्वरूप परमेश्वराचें हें वर्णन ११ व्या अध्यायांत आहे कीं, गीतेंत आणखीही त्याचा उल्लेख केलेला आहे ?

वस्तूंच्या भिन्नत्वामुळें विभिन्न दिसतें, ही गोष्ट स्पष्ट झाली आहे अर्थात येथें एकत्वांत विभिन्नत्व व विभिन्नत्वांत एकत्व दाखविलें आहे.

'या विश्वरूप ईश्वराच्या शरीरांत सर्व देव, सर्व भूतांचे संघ, कमलासन ब्रह्मा, ईश, ऋषि, दिव्य सर्पही दिसत आहेत.' (१५) हें वर्णन भूतकालाचें आहे. हे सर्व ऋषिगण भूतकाली होऊन गेलेले आहेत.

'पहा, या ईश्वररूपांत अनेक बाहु, अनेक उदरें, अनेक मुखें व नेत्र आहेत. चन्द्र-सूर्य याचे नेत्र आहेत. प्रदीप्त अग्नि याचें मुख आहे. या स्वरूपांत मुखादि अनन्त अवयवांचा अन्तर्भाव झालेला आहे.' (१६, १९, २३.) सर्व लोकांचे अवयव हे ईश्वराचेच अवयव आहेत, हें जाणून जें दृश्य प्रत्यक्ष दिसत होतें, त्याचेंच हें वर्णन आहे.

'हे प्रभो, हे सर्व धृतराष्ट्राचे पुत्र, अन्य सगळे राजे, भीष्म, कर्ण आणि आमच्या सैन्यांतील सेनानायक तुझ्या मुखांत प्रविष्ट झाले आहेत. तुझ्या दंतपंक्तीखालीं हे सगळे चुरडले जात आहेत, कित्येकांचें तर दाढाखालीं चूर्ण झालें आहे.' (२६, २७) हें सर्व वर्णन भविष्यकालाचें असून ही घटना युद्धाच्या वेळीं घडणारी आहे.

'हे प्रभो, तूंच वायु, यम, अग्नि, वरुण, व प्रजापति पितामह आहेस.' (३९) हें वर्णन अधिदैवताचें असून ६ व्या श्लोकाशीं याचें साम्य आहे.

असो. याप्रमाणें या वर्णनांत भूतकाल व भविष्यकाल या दोन्हींचें वर्णन आहे. वर्तमानकाल तर प्रत्यक्ष समोर दिसतच आहे. युद्ध एकदा अनिवार्य झाल्यावर हे सगळे वीर मरणार, हें अर्जुनाला कळून चुकलें व तो या वीरांच्या मरणासंबंधीं कल्पना करूं लागला. "युरोपमधील सभ्यता युद्धाच्या खाईंत जळून भस्म होणार!" असे लेख शान्तिदृष्टे लोक युद्ध होण्यापूर्वी ४।५ वर्षे लिहीत होते. तें त्यांनीं लिहिलें व तसें झालेंही अर्जुनाला विश्वव्यापिनी दृष्टि प्राप्त झाल्यावर आणि युद्ध अटळ आहे, असें ठरल्यावर तो या वीरांचा चुराडा होण्याचीं दृश्यें अन्तर्दृष्टीनें पाहून त्याचें वर्णन करीत होता. या एकंदर वर्णनांत पुष्कळसें वर्णन अर्जुनाच समोर दिसणाऱ्या वस्तुस्थितीचें होतें. या वर्णनांतलें हें

वैशिष्ट्य पहाण्याजोगें आहे.

जेव्हां भ. गी. ७।४-५ या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें पञ्चमहाभूतें हा ईश्वराचा देह आहे हें कळून आलें, आणि यामुळें सर्व विश्व पाञ्चभौतिक असल्यामुळें तें ईश्वराचा देहच आहे, अशी त्यास प्रतीति झाली, तेव्हां मग अर्जुनास भेदांत अभेद आणि अभेदांत भेद पहाण्याची दृष्टी प्राप्त होऊन, त्यानंतर हें सर्व विश्व अखण्ड मूर्तीप्रमाणें एकच आहे, अशी दृढ भावना त्याच्या मनांत निर्माण झाली.

हेंच विश्वाचें रूप सर्वांस दृष्टीसमोर दिसत आहे. यास न पहाणारा मनुष्य कोठेंही अस्तित्वांत नाहीं. पण हें सबंध विश्वरूप प्रत्यक्ष पुढें असूनसुद्धां तें एकाच विश्वात्म्याचें रूप आहे, यावर बहुतेकांचा विश्वास बसत नाहीं. म्हणून हीं रूपें विभिन्नच आहेत, असें ते समजतात. पण जेथें जेथें पञ्चमहाभूतें व अन्तःकरण-चतुष्टय आहेत, तें सर्व एकाच अद्वितीय परमात्म्याचें रूप आहे, ही गोष्ट एकदां त्यांना कळून आली, कीं मग या विविधतेंतही अखण्ड एकताच अनुस्यूत आहे, हें त्यांना स्पष्टपणें समजेल. हें समजणें म्हणजेच दिव्यदृष्टि प्राप्त होणें. ही दृष्टि कोणालाही वर सांगितलेल्या विशिष्ट मनन-पद्धतीनें प्राप्त होऊं शकेल. अर्जुनाला ही दृष्टि पातव्या अध्यायांतच प्राप्त झाली असल्यामुळें या अध्यायांत भगवन्तांनीं केवळ "दिव्यं ददामि ते चक्षुः ।" असें म्हटलें आहे. याहून अधिक वर्णन न करण्याचें कारण असें कीं, एकदां सांगितलेलें ज्ञानच पुनः पुनः सांगण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं.

सर्वच मनुष्यें विश्वाला पहातात. दिव्यदृष्टिवान् मनुष्य त्यांत एकता आणि अखण्डितता अनुभवतो, आणि सर्वसाधारण मनुष्य त्यांतील विविधतेवर मोहित होतो, हाच दोघांतला भेद आहे.

गीता हा तत्वज्ञानविषयक ग्रंथ असूनही त्याची भाषा काव्यमयी आहे. म्हणून हा काव्याचा पडदा दूर करून आंतलें शुद्ध सत्य तत्त्वज्ञानाचे दृष्टीनें पहातां आलें पाहिजे. असें पाहिल्यावर जें विश्वरूप दिसेल त्याचेंच वर्णन वर केलें आहे. आतां असा एक प्रश्न निर्माण होतो कीं, विश्वरूप परमेश्वराचें हें वर्णन ११ व्या अध्यायांत आहे कीं, गीतेंत आणखीही त्याचा उल्लेख केलेला आहे ?

दहाव्या अध्यायांत ज्या ईश्वराच्या विभूति सांगितल्या आहेत, त्यांची व या विश्वरूपाची संगति कशी काय जुळते? याचा विचार करण्याकरितां दुसऱ्या अध्यायापासून जीं विश्वरूप-दर्शन-सूचक वचनें आहेत, त्यांचा क्रमशः उल्लेख यापुढें करीत आहों—

(१) दुसऱ्या अध्यायांत '**नित्यः सर्वगतः आत्मा।**' (श्लो० २४) असें म्हटलेलें आहे. सर्वांचा सर्वगत असा एकच आत्मा आहे, असें मानलें म्हणजे विश्वांतलीं सर्व रूपें या आत्म्याचीं आहेत, हें सहजच सिद्ध होतें. दुसऱ्या अध्यायांत हा विश्वरूपाचा, एका आत्म्याचा संकेत आहे.

(२) तिसऱ्या अध्यायांतील १५ व्या श्लोकांत '**सर्वगतं ब्रह्म**' असा उल्लेख आहे. सर्वव्यापक असें एकच ब्रह्म आहे, विश्वांतील सर्व पदार्थांस त्यानें व्यापून टाकलेलें आहे, असा या वचनाचा आशय आहे. तात्पर्य तिसऱ्या अध्यायांतही या संबंधीं हीं सूचक पदें आहेत.

(३) चवथ्या आणि नवव्या अध्यायांतील खालीं दिलेले श्लोक पहाण्यासारखे आहेत–

> **ब्रह्मार्पणं ब्रह्म हविः ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्**
> **ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना॥** (भ. गी. ४।२४)
> **अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम्।**
> **मंत्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम्॥** (भ. गी. ९।१६)

'ब्रह्म हीच अर्पणक्रिया, ब्रह्म हेंच हविर्द्रव्य, ब्रह्मरूप अग्नींत ब्रह्मच आहुती देत आहे. सर्व कर्मे ब्रह्मरूपच आहेत, अशी बुद्धि ज्यास प्राप्त होते, तो ब्रह्मास प्राप्त होतो. तो स्वतःच ब्रह्म बनतो.'

'मीच क्रतु आहें. यज्ञही मीच, स्वधा आणि हवन करण्याच्या औषधि हेंही मीच आहें. मी मंत्र, मीच घृत, मीच अग्नि आणि हवनांतील आहुतिदेखील मीच आहें.'

जेव्हां विश्वरूप-दर्शनामुळें सर्व पदार्थ ब्रह्मरूप होतील, तेव्हांच हे मंत्र यथार्थ रीतीनें अनुभवांत येऊं शकतील. सगळें विश्व हें ब्रह्माचें रूप आहे, हें

अनुभवसिद्ध झाल्यावरच ब्रह्मरूप यजमान, ब्रह्ममय अग्नींत ब्रह्माचें स्वरूप असलेल्या हवनपदार्थांचें हवन करीत आहे, हें सत्य प्रतीतीस येईल. एरवीं ज्यांस हें विश्वरूपदर्शनाचें तत्त्व समजलें नाहीं, असे लोक या गीतेच्या वचनांना अर्थहीन मूर्खपणाचीं वचनें असेंच म्हणणार ! परन्तु यामुळें त्याचाच मूर्खपणा उघड होतो, ही गोष्ट वेगळी. सर्व विश्वात एकच एक सत् असून हीं समोर दिसणारीं सर्व रूपें त्याचींच आहेत, हें अनुभविल्यानन्तरच यजमान, ऋत्विज, अग्नि, वेदी, हविर्द्रव्य, मंत्र इत्यादि सगळीं त्या सद्वस्तूचींच रूपें आहेत, अशी प्रतीती येईल. मग त्या सद्वस्तूला ' ब्रह्म ' हें नाव द्या, कीं ' अहं ' म्हणा. चवथ्या अध्यायाच्या पूर्वोक्त श्लोकांत याला ' ब्रह्म ' म्हटलें असून नवव्या अध्यायांत त्याचाच उल्लेख ' अहं ' असा केला आहे. सर्व विश्व हें ब्रह्मरूप झाल्यामुळें ' अहं ' हीं ब्रह्मच आहे, कारण त्या सद्वस्तूहून वेगळा असा कोणीही दुसरा राहूं शकत नाहीं. असो. याप्रमाणें चवथ्या व नवव्या अध्यायातील हीं वर्णनें विश्वरूप ब्रह्माच्या अखड सत्तेचा स्वीकार करून नंतरच केलीं गेलीं आहेत

( ४ ) पाचव्या अध्यायातील खालीं दिलेला श्लोक याविषयीं विचार करण्यासारखा आहे–

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।**
**शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः ॥** (भ गी ५।१८)

' विद्वान ब्राह्मण, गाय, हत्ती, कुत्रा आणि श्वपाक म्हणजे कुत्र्याचें मास खाणारा चाण्डाल, या सर्वांना पण्डित समदृष्टीनें पहातात.' वरवर पाहिलें असतां विद्वान् ब्राह्मण व अडाणी चांडाल यांचेविषयीं समबुद्धि बाळगणें कठीण व सर्वथा विपरीत आहेसें वाटतें पण जेव्हां सर्व विश्व ब्रह्माची मूर्ति आहे, असा निश्चय होईल, तेव्हा मग हीं दोन्ही ब्रह्माचींच रूपें आहेत हें समजून त्यांचे-विषयीं समदृष्टि निर्माण होईल. पण्डित लोक सर्वत्र समबुद्धीनें पहात असल्यामुळें त्याच्या दृष्टीला ब्राह्मण, गाय, हत्ती, कुत्रा व चाण्डाल हे सर्व ब्रह्मरूपच दिसतात विश्व ब्रह्मरूप आहे, हा सिद्धान्त मानल्यावर मगच या श्लोकांतील

विधान सत्य व यथार्थ आहे हें कळून येईल. म्हणून हा श्लोक या अध्यायांत विश्वरूपदर्शनाची सूचनाच देत आहे.

( ५ ) सहाव्या अध्यायांत ' **सर्वत्र समदर्शनः** '। असा (गी. ६।२९ मध्यें ) एक उल्लेख आहे. याचा अर्थ ' सर्वत्र ब्रह्माचें दर्शन, ' असा आहे. हें वचन संपूर्ण विश्वास ब्रह्मरूप पाहण्याविषयीं सांगत आहे. पुढीं चवथ्या व नवव्या अध्यायां तील श्लोकांविषयीं जें लिहिलें तें येथें विचारांत घ्यावें

( ६ ) सातव्या अध्यायांतील चवथ्या व पांचव्या श्लोकांत तर दिव्यदृष्टीचें मर्मच सांगितलें आहे, व त्याच दृष्टीनें पुढील एकोणीसाव्या श्लोकांत '**वासुदेवः सर्वं** ' असें म्हटलें आहे या ठिकाणी सर्व विश्व वासुदेवमय असल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. खरें पाहिलें तर येथेंच अर्जुनास ' विश्वरूप-दर्शन 'करविलें गेलें आहे. अथवा याचें स्पष्टीकरण करण्याकरितांच पुढें अकरावा अध्याय सांगितला आहे, असें म्हटलें तरी चालेल. अकराव्या अध्यायाचा सारांश येथें या दोन पदांतच वर्णन केला आहे, असें समजावें

(७) आठव्या अध्यायांत असा उल्लेख आहे कीं, **अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे । राज्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके** (१८) ' एका अव्यक्त तत्वापासून या सर्व व्यक्ती सृष्टीच्या प्रारंभीं प्रकट होतात, आणि प्रलयकालीं त्याच्यातच लय पावतात. ' अर्थात् एकच अव्यक्त सत् असून तें अनेक व्यक्त रूपांत प्रगट होतें, म्हणून हें विश्व त्या अव्यक्ताचेंच रूप आहे.

(८) नवव्या अध्यायांत '**समोऽहं सर्वभूतेषु** ' ( श्लो. १९ ) असें म्हटलें आहे. ईश्वर सर्व भूतांत सारख्या स्वरूपानें भरला आहे, असें म्हणणें म्हणजेच सर्व भूतें ईश्वराचीं रूपें आहेत, या सिद्धान्ताच पुष्टि देणें होय. जरी 'सर्व भूतामध्यें सम,' याचे दोन अर्थ होऊं शकतात, तरी पूर्वी सांगितलेल्या एकंदर वचनांशीं सुसंगत असा हाच अर्थ असल्यामुळें त्याचाच स्वीकार करावा हें योग्य आहे.

(९) दहाव्या अध्यायांत ' **विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत्** ' (४२) 'मी या सर्व जगतास आपल्या एका अंशानें व्यापिलें आहे.

हें विधान पाहतां, नवव्या अध्यायांतील वचनांशीं सुसंगत असाच याचा अर्थ लावला पाहिजे, हें पुनः एकदां सांगण्याची आवश्यकता नाहीं. दहाव्या अध्यायांत ईश्वराच्या विभूतींचा विस्तार सांगितला आहे. त्याचा आतां विचार करूं-

## ईश्वराच्या विभूती

या दहाव्या अध्यायांत आणि सातव्या अध्यायांत ८ पासून ११ पर्यन्तच्या श्लोकांत ईश्वराच्या विभूती सांगितल्या आहेत. हा विभूति-विस्तार पाहिला असतां या विभूतींहून अन्य रूपें ईश्वराचीं नसून तीं भिन्न सत्तेचीं रूपें असलीं पाहिजेत, असा समज होणें संभवनीय आहे, म्हणून त्याविषयीं विचार करणें येथें आवश्यक आहे. दहाव्या अध्यायांतील कांहीं विभूति अशा आहेत.

१ पाण्डवानां धनंजयः (३७)
२ स्रोतसामस्मि जान्हवी (३१)
३ मेरुः शिखरिणामहम् (२३)

(१) पाण्डवांमध्यें अर्जुन, (२) स्रोतांमध्यें गंगा नदी, (३) पर्वतांमध्यें मेरु, या ईश्वराच्या विभूती आहेत.

हीं वचनें आत्यन्तिक सत्य मानल्यास पाण्डवांतील धर्म, भीम आदि बंधु, नद्यांतील यमुना, सिंधु इत्यादि नद्या व पर्वतांतील हिमालयादि हीं ईश्वराचीं रूपें नाहींत, असें मानावें लागेल. पण सातव्या अध्यायांत तर, 'ईश्वरच सर्व विश्व आहे' असें (१९व्या श्लोकांत) म्हटलें आहे. जर हें सर्व विश्व ईश्वरच आहे, तर पांची पाण्डव, सगळे जलप्रवाह आणि सर्व पर्वत हीं ईश्वराचींच रूपें आहेत. मग पाण्डवांतील अर्जुन हेंच ईश्वराचें रूप, असें १० व्या अध्यायांत कां म्हटलें ? याचा हेतु असा कीं 'सर्व रूपें ईश्वराचीं' हेंच आत्यन्तिक सत्य आहे व तेंच अकराव्या अध्यायांत सांगावयाचें आहे. तो उपदेश ग्रहण करण्याची तयारी व्हावी म्हणून दहाव्या अध्यायांत ईश्वराचीं विशेष रूपें कोठें आणि कशीं आहेत, तें सांगितलें आहे. जेव्हां शिष्याच्या अथवा जिज्ञासूच्या मनांत 'पाण्डवांतील अर्जुन हा ईश्वराची विभूति' असा बोध निर्माण होईल, तेव्हां तो सहजच असा प्रश्न करील कीं "तर अन्य पाण्डव ईश्वराचीं रूपें नाहींत काय?

मग तीं कोणाचीं रूपें आहेत ? जिच्यापासून भीम इत्यादि पाण्डवांची उत्पत्ति मानली जावी, अशी ईश्वराहून भिन्न सत्ता अस्तित्वांत आहे काय ? जर त्या भिन्न सत्तेचें अस्तित्व मानलें, तर ' ईश्वरच सर्व कांहीं आहे ' (७।१९) या घोषणेचा अर्थ काय ?" असे अनेक प्रश्न साधकाच्या पुढें उभे राहतील. अशा वेळीं त्याला अकराव्या अध्यायातील उपदेश केला तर तो त्याच्या मनावर योग्य प्रकारें ठसेल. संपूर्ण विश्वरूप हें ईश्वराचें अद्वितीय रूप आहे, हें समजून आल्यावर मग "ईश्वरच सर्व कांहीं आहे " हें सिद्धांतवाक्य असल्याचा बोध त्याला होईल. मधला दहावा अध्याय हा अकराव्या अध्यायांतील उपदेशाची प्रस्तावना आहे असें समजावें. एकदां अकरावा अध्याय त्याच्या मनांत योग्य प्रकारें ठसला म्हणजे मग दहावा अध्याय त्यानें विसरावयाचा आहे. कारण आंशिक सत्य प्रगट करण्याकरिताच दहावा अध्याय निर्माण झाला आहे. ' विश्वरूप हें परमेश्वराचें रूप आहे ' हें अकराव्या अध्यायात सांगितलें गेलेलें तत्त्वच पूर्ण सत्य आहे जेव्हां जिज्ञासूला हें दर्शन होईल, तेव्हां मग सातव्या अध्यायातील ' ईश्वरच सर्व कांहीं आहे, ' हें सिद्धान्तिक सत्य त्याच्या मनांत पूर्णपणें ठसेल, आणि नंतर त्याच्या समोरील सृष्टींत ईश्वराहून भिन्न अशी सत्ताच राहणार नाहीं. संपूर्ण विश्वाबरोबर स्वतःलाही तो ईश्वररूपांत पाहील, आणि अशा प्रकारें तो ईश्वराहून अभिन्न व अनन्य होईल. हेंच परम प्राप्तव्य आहे. जें जाणल्यानें सर्व कांहीं जाणल्यासारखें होतें, तें हेंच परम श्रेष्ठ असें ज्ञान आहे.

## अनन्य-भाव

परमेश्वराच्या विश्वरूपासंबंधीं इतका अनुभव घेतल्यावर मग ' अनन्य ' शब्दानें काय बोध होतो तें सहज समजूं शकेल. गीतेंत—

पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ॥ ८।२२
भक्त्या त्वनन्यया शक्यः अहमेवंविधोऽर्जुन। ११।५४
अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ॥ ९।३०
अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते॥ १२।६
मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ॥ १३।१०

भजंत्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ ९।१३
अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ॥८।१४
अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ॥८।८
अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ॥९।२०

इतक्या वचनांत अनन्यभावाचें वर्णन आहे. त्यांत—

(१) अनन्यभाक्ति (८।२२; ११।५४), अनन्यभाक् (९।३०)

(२) अनन्ययोग (१२।६; १३।१०)

(३) अनन्यमनाः (९।१३), अनन्यचेताः (८।१४), अनन्याः चिन्तयन्तः (९।२२), अनन्यगामी चेतः (८।८)

असे तीन भाग दिसतात ही अनन्य-भावाची प्राप्ति विश्वरूप दर्शनानेंच होते. विश्वरूप-दर्शनानें संपूर्ण विश्व हें एक अखण्ड अद्वितीय परमात्म्याचें रूप सिद्ध झाल्यावर 'मीही त्या विश्वरूपाचा एक अंश आहें.' हें निश्चित होतें आणि हें ठरल्याबरोबर साधक ईश्वररूप बनतो, तो ईश्वराहून अपृथक् अथवा अनन्य होतो. नर आणि नारायण यांचें असें ऐक्य होतें, जीव शिवांत मिसळून जातो. यावेळीं साधक 'सर्व कांहीं प्रभूच आहे,' असेंही म्हणेल, व त्याचबरोबर 'सर्व कांहीं मीच आहे' असेंही म्हणेल.

अनन्य होऊन ईश्वराचें मनन करण्याचा हा अर्थ आहे ईश्वराशीं अभिन्न झाल्यावर मगच गीतेचा उपदेश व्यवहारांत येऊं शकेल. आणि हें ज्ञान दुष्प्राप्यही नाहीं. साधारण-बुद्धिवान् मनुष्यही ही गोष्ट समजूं शकेल, आपलीशी करून घेऊं शकेल, व त्याला हें ज्ञान व्यवहारांतही आणतां येईल. 'अनन्य' पदाचा जो अर्थ आज समजला जातो, तो गीतेस अभिप्रेत नाहीं.

## याचें फल

आतांपर्यंत ईश्वराच्या विश्वरूपासंबंधीं विवरण केलें. यावरून असें सिद्ध झालें कीं—

१. ईश्वर विश्वरूप आहे. या विश्वांत जें कांहीं म्हणून आहे, तें सर्व ईश्वराचें रूप आहे.

२. ईश्वर विश्वरूप असल्यामुळे तो अदृश्य नसून प्रत्यक्ष दिसणारा आहे.

३ विश्वरूपाची सेवा करणें हेंच मनुष्याच्या उन्नतीचें एक मात्र साधन आहे.

४. विश्वरूप हें ईश्वररूप असल्यामुळें तें हेय, त्याज्य, दुःखरूप नाहीं. कारण ईश्वर सच्चिदानंद-स्वरूप आहे.

५. ज्याप्रमाणें बीजाचा विस्तार होऊन वृक्ष होतो, आणि त्याचीं फुलें व फळें ही *विकासाची पराकाष्ठा आहे*, त्याचप्रमाणें ईश्वररूप बीजाचा विस्तार होऊनच हा. विश्वरूप वृक्ष अस्तित्वांत आला आहे, म्हणून ही पूर्णतेची पराकाष्ठा आहे. विश्वाकडे कांहीं लोक हीन दृष्टीनें पाहतात, ती हीन दृष्टि सर्वथा त्याज्य आहे.

६. विश्वाला दुःखरूप मानून ज्या विचारपद्धति प्रचलित झाल्या आहेत, त्या सर्व गीतेच्या या 'विश्वरूप परमेश्वर' सिद्धान्तानें खण्डित झाल्या आहेत.

'असो.' 'परमेश्वर विश्वरूप आहे,' हा सिद्धान्त मानल्यानें विश्वांतील मानवांच्या विचारपद्धतीत व आचारांत मोठी विलक्षण क्रान्ति व उलथापालथ होणार आहे. आज विश्वाच्या व्यवहारांत राजा-प्रजा, मालक-मजूर, पुरोगामी-प्रतिगामी इत्यादि पक्षोपपक्षांचा विग्रह सुरू आहे. हे सगळे अज्ञानामुळें स्वतःला दुसऱ्यापासून भिन्न मानतात. पण गीतेचें म्हणणें असें आहे कीं, हे सगळे *पक्षोपपक्ष मिळून एकच अखंड जीवन आहे, आणि हें सर्व ईश्वराचें स्वरूप आहे.* या गीतेच्या सिद्धान्ताचें अनुकरण केल्यास राजे आणि अधिकारी प्रजेला ईश्वर-स्वरूप मानून तिची सेवा करण्यांतच स्वतःला कृतकृत्य समजतील. त्याचप्रमाणें प्रजा, मालक, मजूर हे सर्व विश्वसेवेच्या योगानें आपलें जीवन सफल आणि कृतकृत्य होतें, असें मानतील. गीतेच्या सिद्धान्ताचा स्वीकार करण्यानें परस्परांची सेवा करून परस्परांचें हित साधणें, हेंच एकमात्र सर्वांचें ध्येय होईल.

याप्रमाणें गीतेचें हें 'विश्वरूप-दर्शन' ही केवळ कविकल्पना, तात्त्विक चर्चेचा विषय, भक्तिरसाची अत्युत्कटता किंवा मंत्र अथवा इन्द्रजालाचा चमत्कार नसून हा एक जिवन्त आणि जागृत तत्त्वज्ञानाचा सत्य-सिद्धांत आहे. याचाच आश्रय करून मानवी व्यवहारांतले सर्व प्रश्न सुटतील. आणि या सिद्धांताची सर्वत्र जागृति झाल्यानेंच कधींकाळीं संपूर्ण मानव-व्यवहारांत सुख आणि शान्तीचें राज्य प्रस्थापित होण्याची शक्यता आहे.

पुढील प्रवचनांत या विश्वरूप-सिद्धांताचाच संबंध येणार असल्यामुळें अभ्यासूंनीं विचार करून हा सिद्धांत आपल्या मनांत ठसविण्याचा प्रयत्न करावा.



# ईश्वराच्या विश्वरूपदर्शनाचा

## मनुष्याच्या आचार-व्यवहारावर होणारा परिणाम

विश्वरूप हे परमेश्वराचें स्वरूप असून तें अखण्ड, एकरस व एकच एक अविभक्त जीवन आहे परमेश्वराच्या अनन्त शक्ति नानाविध रूपें धारण करून या विश्वांत अवतीर्ण होत असतात, हें समजलें आणि तसा अनुभव आला म्हणजे मनुष्याच्या जीवनात, त्याच्या आचारावर आणि व्यवहारावर या अनुभवाचा कसा काय परिणाम होऊ शकेल, तें आता पहावयाचें आहे

### १. अनन्य-भावाचें दृढीकरण

विश्व हें अद्वितीय अशा परमात्म्याचें अखण्ड स्वरूप आहे, अशी प्रतीति होऊ लागताक्षणींच " मीही त्या परमात्म्याच्या रूपाचाच एक अंश आहें, ' हें कळून येतें व स्वतःस हीनदीन मानण्याचें काहीएक कारण नाहीं, असा निश्चय होतो. " मी ईश्वराहून पृथक् आहें, ईश्वर पूर्ण आहे, मी अपूर्ण आहें, अशी माझी पूर्वी असलेली भावना अज्ञानजन्य होती, मी नि सन्देह ईश्वरस्वरूप आहें." हें ज्ञान झालें, म्हणजे त्यायोगें साधकाचा आत्मविश्वास नि संशय वृद्धिंगत होणें शक्य आहे.

महासागरातील जलबिन्दु सागराहून वेगळा नसतो, वृक्षाचें पान वृक्षाहून निराळें नसतें, वस्त्रातील सूत आणि सुतातील कापूस हीं क्रमशः वस्त्राहून अथवा सुतापासून निराळीं नाहींत सुवर्णाचे अलंकार अलंकाररूपानें विलक्षत असतांही सुवर्णरूपच असतात तसा मी, जीवरूप असतांही परमात्मस्वरूपाहून तत्त्वतः भिन्न नाहीं ज्याप्रमाणें आकाश, मठाकाश आणि घटात असलेलें आकाश, हीं एकच आहेत, त्याप्रमाणेंच जीव आणि शिव हे तत्त्वतः एक, अभिन्न आणि अनन्य आहेत, हें ज्ञान विश्वरूपाचें यथार्थ दर्शन झाल्यावर प्राप्त होतें म्हणून या ज्ञानाच्या योगानें आपला हीनता, दीनता व तुच्छता

सहजच नाहींशी होते, एवढेंच नव्हे तर विश्वातील सर्व पदार्थांचें मानीव निकृष्टत्व दूर होऊन, ते साक्षात ब्रह्मरूपच आहेत, हें स्पष्टपणें अनुभवास येतें. मग ते सर्वच्या सर्व पदार्थ परब्रह्माच्या श्रेष्ठ अशा रूपामध्यें सुशोभित झालेले दिसूं लागतात. मनुष्याची स्वतःविषयींची व जगताविषयींची हीनत्वाची कल्पना दूर होणें, हा विश्वरूपदर्शनानें होणारा एक मोठा लाभ आहे. सर्व विश्व सच्चिदानंदस्वरूप आहे, असें वाटूं लागलें कीं, ईश्वर स्वतः जसा सच्चिदानंदरूप आहे, तसेंच विश्व हेंही त्याचेंच रूप असल्यानें, तेंही त्याच्या-सारखेंच सच्चिदानंदरूप आहे, यांत तिळमात्र शंका उरत नाहीं.

या दिव्य दृष्टीमुळें शून्यवाद आणि विश्वाला भ्रम, हीन, दीन, तुच्छ आणि त्याज्य मानणारांचे अनेक प्रकारचे संदेहवाद सहजच दूर होतात. यामुळें या मिथ्या भ्रांतिवादापेक्षां गीतेचा हा आनंदवाद निःसंशयच श्रेष्ठ आहे.

## २. विश्व आनन्दमय आहे.

परमेश्वर स्वतः सच्चिदानन्द असल्यामुळें त्याचें स्वरूप जें विश्व, तेंही त्याच गुणांनीं युक्त असलें पाहिजे. ईश्वरच विश्वरूप झाला आहे, म्हणून ज्याप्रमाणें ईश्वर पूर्ण आहे, त्याप्रमाणें विश्वही पूर्ण आहे–

पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥ ( उपनिषच्छान्ति )

"तो (ईश्वर) पूर्ण आहे आणि हें (विश्व) ही पूर्णच आहे. कारण पूर्णा-पासून निर्माण झालेली वस्तु पूर्णच असली पाहिजे. पूर्णांतून पूर्ण बाजूला काढलें तरी पूर्णच शिल्लक राहतें" अर्थात् परमेश्वर पूर्ण आहे आणि हें विश्व ईश्वरापासून निर्माण झालें असल्यामुळें तेंही पूर्णच आहे. कारण पूर्णापासून पूर्णाचीच उत्पत्ति होणें शक्य आहे. पूर्णापासून कधींही अपूर्ण वस्तु निर्माण होऊं शकत नाहीं. पूर्ण परमेश्वरापासून हें पूर्ण विश्व निर्माण होऊनही ईश्वराच्या पूर्णत्वांत कोठेंही न्यूनता आलेली नाहीं. कारण पूर्णांतून पूर्ण काढल्यावर पूर्णच अवशिष्ट राहतें. म्हणून ईश्वराच्या मूळ एवढ्या मोठ्या पूर्ण विश्व उत्पन्न झाल्या-वरही तो पूर्ववत् पूर्णच राहिला आहे, त्याच्यांत यत्किंचितही न्यूनाधिक भाव

निर्माण झालेला नाहीं, हेंच त्याच्या पूर्णत्वाचें द्योतक आहे.

ईश्वरापासून विश्व कसें निर्माण झालें, या प्रश्नाचें उत्तर देताना शास्त्रकारांनीं अनेक उदाहरणें दिलीं आहेत. गीतेंत ईश्वराला **विश्वरूप, विश्वमूर्ति, विश्व, सर्व'** असें म्हटलें आहे. जें जें म्हणून अस्तित्वांत आलें आहे, तें तें सर्व ईश्वररूपच आहे. यावरून ईश्वरनामक कर्त्यानें ईश्वररूपी उपादान कारणापासून, अर्थात् स्वतःपासूनच हें विश्वरूप निर्माण केलें, असा गीतेचा सिद्धान्त आहे. शास्त्रकार या विचारसरणीला 'अभिन्न-निमित्त-उपादान-कारण' असें म्हणतात.

सुवर्णाचे अलंकार केले, तरी ते सोनेंपणाहून भिन्न असूं शकत नाहींत; साखरेची केळणी साखर-रूपच असतात; लाकडाचीं टेबल, खुर्ची, पेटी इत्यादि भिन्नभिन्न उपकरणें तयार केलीं तरी त्यामुळें त्याच्या लाकूडपणात काहीं न्यूनत्व येत नाहीं, त्याचप्रमाणें ईश्वरापासूनच हें विश्व निर्माण झालें असल्यामुळें, किंवा ईश्वरच विश्वरूप बनला असल्यामुळें तें ईश्वरस्वरूपाहून भिन्न असणें सर्वथा अशक्य आहे. ईश्वरापासून विश्व कसें बनलें आणि बनल्यानंतरही त्याचें स्वरूप ईश्वरमयच कसें आहे, इत्यादि प्रश्नांवर वरील दोनही उदाहरणांनीं चांगलाच प्रकाश पडूं शकेल.

अग्नीपासून निघणाऱ्या ठिणग्या अग्निरूपच असतात. पाण्याची वाफ आणि बर्फ हीं दोन्ही जलरूपच असतात. समुद्रांत तरंगणाऱ्या बर्फाच्या तुकड्यांना समुद्राहून पृथक् मानता येणार नाहीं. त्याचप्रमाणें परमेश्वररूपी अथांग महासागरांत हे विश्वान्तर्गत सर्व पदार्थ बर्फाच्या तुकड्यासारखे तरंगत आहेत. त्यामध्यें परस्पर-विभिन्नता दिसून येत असताही ईश्वर-स्वरूपाच्या दृष्टीनें किंवा तत्त्वतः हे सर्व अभिन्नच आहेत

कापसापासून सूत आणि सुतापासून कापड होतें कोणत्याही जातीचें कापड हें कापसाचेंच रूप असतें. तसेंच हें विश्वही परमेश्वर-स्वरूपच आहे. परमेश्वरापासून सूत्रात्मा निर्माण झाला आणि त्याच्यापासून विश्वरूपी वस्त्राची निर्मिति झाली. या उदाहरणानीं उपनिषदादि ग्रंथानीं विश्वरूप ईश्वराचा हा क्लिष्ट प्रश्न

*

अगदीं सोपा केला आहे

राजा, राणी, सेवक, कारकून, रथ, घोडे इत्यादि साखरेचीं खेळणीं तयार केलीं खेळांत तीं आपापल्या जागीच राहतील, पण त्यापैकीं कोणतेंही खेळणें दुधाची गोडी वाढविण्याकरितां दुधांत टाकलें, तर त्याच्या खेळांतील स्थानामुळें दुधाच्या गोडींत कांहींही कमी-जास्तपणा येणार नाहीं दुधांत राजा टाकला काय किंवा एखादा सेवक टाकला काय, दोन्ही पदार्थ दुधाची गोडी सारखीच वाढवितील याचप्रमाणें विश्वांत अनेक रस उत्पन्न करण्याकरितां जी विविधता निर्माण केली गेली तीमुळें विश्वाच्या किंवा ईश्वररूपाच्या आनंद-घनतेंत मुळींच न्यूनाधिकता निर्माण झाली नाहीं म्हणून विश्व ईश्वराचें रूप असल्यामुळें तें आनन्दमयच अहे. सर्वत्र त्याच्या आनन्दमयतेचा अनुभव साधकानें घ्यावा. जर कोणास या आनन्दाचा अनुभव नसेल, तर त्याच्या दृष्टिकोणांतच कांहींतरी दोष असला पाहिजे. विश्वामध्यें कोणताही दोष नाहीं, तें स्वयंपूर्ण, अगदीं जसें असावें तसेंच आहे

## ३. विश्व सच्चिदानन्दरूपच आहे.

गीतेनें ' विश्वरूप परमेश्वर ' हा सिद्धान्त सिद्ध केला आहे, यावरूनच विश्व सच्चिदानन्दरूप आहे, हें स्पष्ट झालें. विश्व व त्यांतील प्रत्येक वस्तु " आहे " आणि म्हणून तें " सत् " आहे, याविषयीं कोणालाही संशय वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. हें विश्व प्रकाशत आहे, अनुभूत च, ज्ञानाचा विषय होत आहे, म्हणून तें विश्व ' चित् ' आहे त्याचप्रमाणें विश्वांतील सर्व पदार्थ कोणा ना कोणाला तरी सुख देत आहेत; कोणालाच आणि केव्हांही सुख न देणारा पदार्थ या विश्वांत नाहींच नाहीं आणि म्हणूनच तें विश्व ' आनन्दमय ' ही आहे. विश्वमात्रांत जर आनन्दाचा पूर्णपणें अभाव असता, तर मग कोणीही जिवन्तच राहिले नसते या आनन्दाचा उपभोग घेत असल्यामुळेंच प्राणी जीवित रहात आहेत. मनुष्य जर आपल्या दिवसभरानाल अनुभवाचा विचार करील, तर त्यास असें निश्चितपणें कळून येईल कीं, आपण दिवसांतील बहुतेक वेळीं

आनन्दाचाच उपभोग घेत आहोत.

'गाढ निद्रा, भक्षामुळें होणारी तृप्ति, विश्रान्ति, प्रिय वस्तूची प्राप्ति, इत्यादि किती तरी प्रसंगांनीं मनुष्य विश्वातील अखण्ड आनन्दाचा उपभोग घेत असतो. दिवसांत दुःखाचे क्षण थोडे असून आनन्दाचेच अधिक असतात. मनुष्य ज्याला दुःख मानतो, तेंच अनेक वेळां सुख असतें. उदाहरणच द्याव-याचें झालें तर असें देतां येईल कीं, विद्यार्थी अभ्यास करीत असतां तो दुःखाचा अनुभव करतो हें खरें, पण अभ्यास हा सुखदाताच आहे. असे शेंकडों अनुभव सांगतां येतील. म्हणून हें विश्व गीतेच्या विश्वरूप-सिद्धान्ता-प्रमाणें सच्चिदानन्दस्वरूपच आहे कारण हें विश्व ज्याचें रूप आहे, तो स्वतः सच्चिदानन्द आहे.

या विश्वरूपदर्शनानें जगद्दुःखवादाचे निरसन झालें आहे. त्याचप्रमाणें विश्व हें दुःखमय आहे, असें मानून जीं मतें प्रचलित झालीं आहेत, तीं सर्व मानण्यास अयोग्य आहेत, हेंही यावरून निश्चितपणें सिद्ध आहे.

## ४. परमेश्वर विश्वरूपांत प्रत्यक्ष दिसत आहे

परमेश्वर विश्वरूप आहे; विश्वाचें रूप डोळ्यांना दिसूं शकतें, त्या अर्थी परमेश्वरही दिसूं शकतो, अर्थात् विश्वाच्या रूपाचें दर्शन हेंच परमेश्वराचें दर्शन आहे. परमेश्वर प्रत्यक्ष असून विश्वरूपानें तो प्रत्येकाला आणि प्रत्येकाच्या समोर विलसत आहे. विश्वरूप-दर्शनाच्या सिद्धान्ताची मांडणी करून गीतेनें " परमेश्वर अदृश्य आहे," हा सर्वांचा गैरसमज दूर केला आहे विश्वरूप हें ईश्वररूपच आहे, अखण्ड* विश्वच परमेश्वर आहे आणि विश्वांतील प्रत्येक वस्तु परमात्म्याचें अंशस्वरूप आहे या विश्वमात्रांत ईश्वराहून भिन्न अशी कोणतीही दुसरी वस्तु नाहीं, म्हणून जें जें दिसतें, तें तें ईश्वराचेंच रूप आहे. विश्वरूप परमेश्वर प्रत्यक्ष दिसत आहे. या प्रत्यक्ष ईश्वरास सोडून अप्रत्यक्षाच्या मागें लागणें, प्रत्यक्ष ईश्वराची सेवा करण्याचें सोडून देऊन अप्रत्यक्षाचें ध्यान करण्याचा प्रयत्न करणें, हें सर्व प्रकारें अयोग्य आहे. याविषयीं गीता म्हणते–

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ (गी. १२-५)

" जे आपलें चित्त अव्यक्तात स्थिर करूं पाहतात, त्यांना फारच कष्ट सहन करावे लागतात. कारण अव्यक्त रूपात प्रगति करणें देहधारी मनुष्यांस फारच कठीण आहे." आणि आपणास तर देहधारी मनुष्याच्या विषयींच विचार करावयाचा आहे जे देहधारी आहेत, त्यांचा अव्यक्तात प्रवेश होणें अत्यंत कठीण आहे. अर्थात् विश्वरूपाची सेवा हीच सुखानें होणारी ईश्वरसेवा आहे. कारण विश्वरूप हें प्रत्येक मनुष्यास प्रत्यक्ष दिसणारें आहे. म्हणून याची सेवा करणें मनुष्यास शक्य आहे.

मनुष्याची उन्नति होणें ईश्वरसेवेनेंच संभवनीय आहे, तें दुसऱ्या कशानेंही होणें शक्य नाही. ज्या ईश्वराची सेवा करून ही मानवाची उन्नति व्हावयाची, तो ईश्वर विश्वरूपच आहे. म्हणून या विश्वरूप परमेश्वराची सेवा, हाच मनुष्याचा धर्म, हेंच त्याचें कर्तव्य व हेंच त्याचें कृतकृत्य होण्याचें साधन आहे.

प्राचीन कालीं भक्तश्रेष्ठ हनुमान् आणि अर्जुन यांनीं प्रत्यक्ष भगवान् श्रीरामचन्द्र व श्रीकृष्ण यांचीच उपासना केली होती. ते कोणत्याही अप्रत्यक्ष अव्यक्त स्वरूपाचें ध्यान करीत बसले नव्हते अथवा त्यांनीं कोणा प्राचीनकालीन विभूतींचीही उपासना केलेली नाहीं. म्हणून सर्व भक्तांनीं विश्वरूपामध्यें प्रकट झालेल्या भगवन्ताचीच सेवा करावी, हें त्यास योग्य आहे.

भगवान् हे विश्वरूपांत नाना रूपें घेऊन प्रकट झाले आहेत. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांची रूपें हीं क्रमशः भगवंताचे मस्तक, बाहु, मांड्या व पाय आहेत (ऋ. १०।९०). यांत सर्व मानवाचा अन्तर्भाव झाला आहे. त्याचप्रमाणें पशुपक्षी, वृक्षवनस्पती, स्थावरजंगम, वायु, विद्युत् इत्यादि स्थूल व सूक्ष्म सृष्टि हीं सर्व ईश्वराचीच रूपें असून ती उपासना व सेवा करण्यास योग्य अशींच आहेत. या विश्वाची सेवाच मानवाला उन्नतीचा मार्ग दाखवील. मनुष्यांची सर्व प्रकारची उन्नति याच साधनानें होऊं शकेल.

मानवरूपामध्ये ब्राम्हण-क्षत्रिय-वैश्य-शूद्र (ज्ञानी-वीर-व्यापारी व कारागीर) हीं ईश्वराचीं रूपें आहेत, तसेंच पशूंमध्यें गाय, घोडा, बकरी, मेंढी इत्यादिकांच्या रूपानें परमेश्वर नटला आहे. ह्याच प्रकार वृक्ष-वनस्पतींविषयींही समजावा. हीं सर्व ईश्वराचीं रूपें सेवा करण्यास योग्य अशींच आहेत. हिंदुधर्मांत मानवाची पूजा तर होतेच; पण त्याबरोबरच गाई, घोडे, हत्ती, वड, पिंपळ, औदुंबर, इत्यादि पशूंची व वृक्षांचीही पूजा केली जाते. गंगा, यमुना, नर्मदा, तापी, तुंगभद्रा इत्यादि नद्यांप्रमाणेंच पर्वत व प्रसिद्ध स्थानें यांचीही पूजा करण्याचा प्रघात आहे. कित्येक लोक हिंदूंची ही पूजापद्धति पाहून विस्मयचकित होतात. पण विश्वरूप परमेश्वर मानणाऱ्याच्या दृष्टीनें प्रत्येक वस्तु ईश्वराचें स्वरूप असल्यामुळें ही पूजापद्धति योग्यच आहे. मात्र हिंदुजनता या ईश्वरस्वरूपावर गंधाक्षता टाकून त्याची पूजा पूर्ण होते, अशी जी कल्पना करून बसली आहे, ती चूक आहे. या स्वरूपाची खरी सेवा केली पाहिजे. उदाहरणार्थ, गाईवर गंधाक्षता व फुलें वाहिल्यानें तिची पूजा झाली, असें समजलें जातें, पण ही पूजा नव्हे, उपासनाही नव्हे व सेवा तर निश्चितच नव्हे. हा पूजेचा भ्रम आहे. आणि भ्रमानें कार्य पूर्ण होणें अशक्य आहे.

विदेशी लोक गाईची उत्तम सेवा करतात आणि गोमाता त्या सेवेमुळें त्यांच्यावर प्रसन्न होऊन त्यांना प्रत्येक दिवसास तीस चाळीस शेर अमृतासारखें दूधही देते. याचें नाव सेवा. हिन्दुसमाज जी सेवा करतो, ती सेवा नसून उपहास मात्र आहे. अशा उपहासानें गोमाता प्रसन्न होणें असंभवनीय आहे. अशा प्रकारें उपासना, सेवा व पूजा यांचीं तत्त्वें लोकांनीं समजून घ्यावीं.

विश्वरूप-उपासनेंत ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, पशुपक्षी, वृक्ष-वनस्पति आणि स्थावर जगत् यांची शक्य तितकी सेवाच केली पाहिजे आणि तीही हीं उपास्यें प्रसन्न होईपर्यंत! प्रसन्न झाल्यावर तीं उपास्यें उपासकाला प्रसन्न मनानें इष्ट वर देतील व त्याचें सुख वाढवतील.

मनुष्यांमध्यें जीं मनुष्यें अत्यंत निकृष्ट अवस्थेंत कशीं तरी जगत आहेत, त्यांना सर्व प्रकारें साहाय्य करणें हीच त्यांची सेवा होय. स्वच्छता, स्नान,

( भोजन अथवा फलाहार ) वस्त्रसमर्पण इत्यादि अनेक मार्गांनीं त्याची सेवा केली पाहिजे.

गीतेनें या ठिकाणीं प्रत्यक्ष दिसणाऱ्या विश्वरूपी प्रभूची उपासनाच सांगितली असल्यामुळें, या प्रत्यक्ष दिसणाऱ्या विश्वाला क्षणिक, दीनदीन, दुःखमय म्हणून हेय, त्याज्य मानणाऱ्याच्या भ्रान्त मताचा सहजच या प्रतिपादनानें पूर्णपणें येथें निरास झाला आहे.

बहुधा सर्व साम्प्रदायांनीं या संपूर्ण विश्वाला त्याज्य ठरवून अव्यक्त ईश्वरालाच उपास्य मानलें आहे. पण गीतेनें विश्व हें ईश्वराचें रूप ठरवून विश्वरूप हेंच सेवनीय ठरवलें असल्यानें इतर सर्व मतें आपोआपच खण्डित झालीं आहेत. यावरून गीता आपल्या वाचकास कोणता मार्ग दाखवीत आहे, तें कळून येईल. तिच्या मताप्रमाणें विश्वसेवा हाच मानवधर्म असून तोच एक मानवी उन्नतीचा साधक असा सरळ मार्ग आहे. गीता म्हणते—

**अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ॥ ( गी. ९।११ )**

"मूर्ख माणसें मानवदेहाचा आश्रय घेतलेल्या मज ईश्वराचा अपमान करतात." ईश्वर हा मानव-देहांत अवतीर्ण झाला आहे, त्याची सेवा न करतां अजाणते लोक त्याचा अपमान करून कोणा दुसऱ्याचीच सेवा करीत असतात. आणि हा क्रम वर्षानुवर्ष असाच चालला आहे. भुकेलेला दीन दरिद्री भिकारी ( या रूपात प्रत्यक्ष ईश्वरच ) दारीं येतो, त्याला शिव्या देऊन हांकून देणारीं माणसें देवळांत जाऊन तेथें हजारों रुपये दान करून " आपण ईश्वराची पूजा केली," अशी स्वतःची फसवणूक करून घेतात ! खरोखरीच हें केवढें आश्चर्य आहे बरें ?

याप्रमाणें सर्वत्र मानव-देहांत अवतीर्ण झालेल्या ईश्वराचा निरादरच होत आहे. इतकेंच नव्हे तर, पशु-पक्षी, वृक्ष-लता इत्यादि रूपानीं नटलेल्या ईश्वराचाही निरादरच होत आहे. उलट पक्षीं ज्या मूर्ति अथवा मंदिरें, मशिदी इत्यादींना सेवेची आवश्यकता नाहीं, त्याचे साज-शृंगार केले जात आहेत; म्हणून गीतेचा हा उपदेश अगदीं योग्य आहे व त्याप्रमाणें वागल्यासच मनुष्य योग्य मार्गानें जाऊं शकेल. पण गीतेच्या उपदेशाकडे कोण बरें लक्ष

देण्यास तत्पर आहे ?

## ५. परमेश्वराचें विश्वरूप पवित्र आहे.

'देवही परमेश्वराचें हें स्वरूप पाहण्याची इच्छा बाळगतात.' (गी. ११-५२) अर्थात् हें रूप दिव्य आणि पवित्र आहे, यात शंका नाहीं. या रूपाचें दर्शन अनन्य भक्तीनेंच होत असतें (गी ११।५३). जें रूप पाहण्याची इच्छा प्रत्यक्ष देवमुद्धां करतात आणि जें अनन्य भक्तीनेंच प्राप्त होऊं शकतें, तें विश्वरूप दोषयुक्त, हीन, दीन असूंच शकत नाहीं. म्हणून विश्वरूप ही वस्तु पवित्र आहे. आम्ही सर्व मानव या विश्वरूपात समाविष्ट आहोंत हें विश्वरूप आम्हा सर्वांचें निवासस्थान आहे गीतेचें विश्वरूप सर्व जगाला त्याच्या पावित्र्याचा संदेश देत आहे.

पण हें सर्व असें असतांही अलीकडे सर्वसामान्य लोकांची अशी समजूत झाली आहे कीं, हें विश्व एक कारागृह असून सर्व मनुष्यें हीं यांतील बंदिवान् आहेत, किंवा विश्व हें एक मोठें जाळें असून आम्ही सर्व त्यात सापडलेले मत्स्य आहोंत. यांतून सुटून जाणें हेंच आमचें कर्तव्य आहे. अथवा विश्व हें एक माणसाला भ्रमात पाडण्याकरिता निर्माण केलेलें इन्द्रजाल आहे यात फसतां उपयोगाचें नाहीं. अशा प्रकारचीं अनेक मतें आज समाजांत प्रचलित आहेत. पण परमेश्वराचें स्वरूप असलेलें हें विश्व कारागृह, इन्द्रजाल, गौडबंगाल, भ्रमजाल अशा काहीं कपटजालाच्या स्वरूपाचें नसून तें एक अत्यंत पवित्र असें कार्य-क्षेत्र आहे. या ठिकाणीं असलेला आपला अनन्य संबंध जाणून या विश्वाशीं अनन्य होऊन आपलीं कर्तव्यें करून प्रत्येकानें कृतार्थ व्हावें

गीतेची ही विश्वरूप-दर्शनाची विचारसरणी एकदा समजली कीं, मग पूर्वीं सांगितलेले सर्व भ्रमवाद नष्ट होऊन मनुष्य एका उच्च कर्तव्यभूमीवर आरूढ होतो. तेथें तो स्वतंत्रतेनें विचरण करूं लागतो, आणि त्याला आपल्या नैसर्गिक श्रेष्ठत्वाचाही अनुभव येतो.

## ६. विश्वरूपांत जन्म येणें हें बन्धन नव्हे.

विश्वरूप हें परमेश्वराचें रूप असल्यामुळें यांतील जन्म हा कुकर्माचें फल आहे, असें मानणें योग्य नव्हे. परन्तु जगाला दुःखमय मानणारांनीं जन्मास दोषमूलक म्हटलें आहे त्याची विचारपद्धति अशी आहे-मिथ्या ज्ञानानें प्रवृत्ति होते, प्रवृत्तीमुळें कर्में होतात, कर्मांपासून दोष उद्भवतात, दोषामुळें दुःख होणें स्वाभाविकच आहे दुःख भोगण्याकरिता जन्म घ्यावा लागतो, जन्मामुळें शरीर प्राप्त होतें, शरिरात दुःखें भोगावीं लागतात एकदा शरीर-प्राप्ति झाली कीं, *मग दुःखें भोगणें अनिवार्य आहे. म्हणून दुःखें भोगावीं लागूं नयेत, अशी इच्छा* असेल तर शरीर-धारणा होऊं न देण्याची व्यवस्था केली पाहिजे. यावर हे अशी युक्ति सुचवितात कीं, दुःख नको असेल तर शरीरप्राप्ति बंद झाली पाहिजे, शरीरप्राप्तीचें कारण दोष होत म्हणून दोष घडता नयेत. दोष कर्मांपासून संभवतात, म्हणून निर्दोष होण्याकरिता कर्मे सोडलें पाहिजे; पण हें तर शक्य नाहीं, यावर उपाय काय ? कर्मे हीं वासना अथवा प्रवृत्तीमुळें होतात, म्हणून ती वासना अथवा प्रवृत्तीच नाहींशी केली पाहिजे. वासनाहीन अथवा प्रवृत्ति-*शून्य मनुष्य सर्वांत श्रेष्ठ आहे; कारण त्याचे ठिकाणीं प्रवृत्ति नसल्यामुळें* त्याजकडून कर्में होणार नाहींत. कर्मांच्या अभावीं दोष निर्माण होणार नाहींत. यामुळें तो मनुष्य निर्दोष होईल. या निर्दोषत्वामुळें त्याला भोगावयाचीं दुःखें राहणार नाहींत, आणि म्हणून तो मुक्त होईल. याप्रमाणें त्यांनीं प्रवृत्तिशून्य मनुष्य तयार करण्याची युक्ति शोधून काढली ! पण हें सर्व तर्कट युक्तिशून्य आहे. कारण हा विचारप्रवाह मनुष्याला प्रवृत्तिशून्य, कर्महीन आणि वासनाशून्य बनवितो. पण ही स्थिति प्राप्त होणेंच अशक्य आहे. आणि जर हें शक्यही झालें, तर तें मनुष्याच्या उन्नतीचा घात करणारें ठरेल. *मनुष्याचा आत्मा* प्रयत्नशील आहे. "अत् = सातत्य-गमने" या धातूपासून आत्मा हा शब्द सिद्ध झाला आहे त्याचा अर्थ सतत गमन, सतत प्रयत्न, सतत कर्म करणें असा आहे. हा अर्थच मुळीं आत्म्याच्या निज स्वभावाचा उल्लेख करून तो प्रवृत्तिशून्य होऊं शकत नाहीं, ही गोष्ट सिद्ध करीत आहे. मनुष्याचा स्वभावही

सतत प्रयत्न करणें हाच आहे. यविषयीं गीता म्हणते—

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्।**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ (गी० ३।५)**

"कर्म केल्याविना कोणीहि मनुष्य एक क्षणभरही राहूं शकत नाहीं. मनुष्य हा प्रकृति-स्वभावाच्या आधीन होऊन प्रकृतीच्या गुणाप्रमाणें कर्में करीतच असतो." अर्थात् मनुष्याची प्रकृति मनुष्याकडून कर्में करवून घेतेच. असें असूनही या अकर्मण्य लोकांनीं मनुष्याला प्रवृत्तिशून्य बनविण्याकरिता अकर्मवाद निर्माण केला खरा, पण तो मनुष्याच्या स्वाभाविक प्रकृतीशीं सर्वथा विरुद्ध असल्यामुळें त्याज्य आहे. हा वाद म्हणजे कधींहि पूर्ण न होणारी एक इच्छा आहे! शरीर धारण करणें याना अनुचित वाटतें. पण ईश्वराच्या स्वरूपांत येण्यास आणि त्याचा अंश बनण्यास हे इतके घाबरतात कां, कोण जाणे! वस्तुतः परमेश्वराच्या विश्वरूपामध्यें अंशरूपानें जन्म घेऊन त्याच्या विश्वव्यापी कार्यासाठीं आत्मार्पण करणें, हाच मुक्तीचा खरा मार्ग आहे. पण परमेश्वराचा एकेक अंश निष्क्रिय बनवून तो त्याच्या विश्वव्यापी कार्यापासून पृथक् व्हावा, अशी या महाभागाची इच्छा आहे कीं काय, न कळे! हें कदापि होणें शक्य नाहीं. ईश्वराच्या विश्व-शरीराचें अस्तित्व या कर्मशून्यवाद्यांच्या इच्छेवर मुळींच अवलंबून नाहीं, हें येथें सांगण्याची मुळींच आवश्यकता नाहीं.

विश्वरूप हें प्रभूचें रूप असल्याचें सांगून गीतेनें या प्रवृत्तिशून्य लोकांच्या या मतावर कुठाराघातच केला आहे. जन्म घेऊन परमेश्वराच्या शरीराचा अंश बनण्याचें, आणि ईश्वराच्या कार्यांत सहभागी होण्याचें महद्भाग्य जीवाला प्राप्त होऊं शकतें; हें तत्त्व गीतेनें येथें स्पष्ट केलें आहे. म्हणून मनुष्यमात्रास प्रवृत्तिशून्य व क्रियाहीन करण्याचें ध्येय अशास्त्रीय आहे.

गीतेचा असा सिद्धान्त आहे कीं, विश्वरूपी परमेश्वराची एक विश्वव्यापक मोठी योजना निश्चित झालेली आहे. तिला जाणून तिच्यांतील आपल्या वांट्यास आलेलें कर्तव्य कर्म प्रत्येक मनुष्यानें केलेंच पाहिजे. हें कर्म करीत असतां

विश्वात येऊन आपलें विश्वकल्याण-योजनेंतील कार्य करण्यास समर्थ होऊं शकतो.

हे ईश्वरीय जीवभूत अंश इन्द्रियांच्या शक्तींना बरोबर घेऊन आपल्याला योग्य असें स्थान शोधीत आकाशांत फिरत असतात. जेथें त्यांना योग्य स्थान दिसेल तेथें ते प्रविष्ट होतात. जर या प्रवृत्तिशून्यवाद्यांच्या इच्छेप्रमाणें सगळे स्त्रीपुरुष ब्रह्मचारी राहिले, तर मग ते ईश्वरीय अंश कोठें प्रविष्ट होतील ? अर्थात् या प्रवृत्तिशून्यवाद्यांचा सर्वच उपक्रम परमेश्वराशीं विद्रोह करणारा आणि म्हणून मूर्खपणाचा आहे. तसें घडणें सर्वथा अशक्य आहे. ईश्वराविरुद्ध केलेलें बंड कसें यशस्वी होईल ?

गीता तर म्हणते कीं, जीव हे प्रभूचे अंश असून त्याच्या विश्वकल्याण-योजनेंत भाग घेण्याकरितां या जगांत येत असतात. स्त्रीपुरुष-संबंधामुळेंच त्या ईश्वराच्या अंशाचें गर्भ-रूपानें विश्वामध्यें येणें संभवनीय होतें. म्हणूनच गृहस्थाश्रम श्रेष्ठ आहे स्त्रीपुरुष-संबंधही याच कारणासाठीं श्रेष्ठ आहे. कारण स्वतः भगवानच म्हणतात–

**धर्माऽविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ( गी ७।११ )**

" धर्माशीं विरुद्ध नसणारा काम हा ईश्वराची विभूति आहे." असा काम ईश्वराची विभूति आहे, त्याअर्थी ह्या कामाची उत्पत्ति ज्या गृहस्थाश्रमांत व स्त्रीपुरुषसंबंधांत होते, तो गृहस्थाश्रम व त्यांतील धर्मयुक्त स्त्रीपुरुषसंबंध हे परमेश्वराच्या विभूतीचे सहाय्यकच आहेत म्हणून आत्यन्तिक ब्रह्मचर्य हें योग्य नव्हे. एखाद्या योग्य मनुष्यानें एखाद्या विशिष्ट उद्देशाकरितां असें ब्रह्मचर्य पाळणें हें अपवादादाखल मानलें जाईल. पण सर्वांनीं आजीवन ब्रह्मचर्य पाळणें हें तर मुळींच योग्य नाहीं. गीतेनें अशा प्रकारें ब्रह्मचर्य आणि संन्यास यांचा अतिरेक करणाऱ्यांच्या मताचें खण्डनच केलें आहे

जन्म-धारण केल्यानेंच जीव ईश्वराच्या विश्वरूपामध्यें प्रकट होऊं शकत असल्यामुळें जन्म पवित्र आहे आणि तो जन्म स्त्रीपासून होत असल्यामुळें स्त्रीही पवित्र आहे आणि स्त्रीशीं संबंध गृहस्थाश्रमांतच येत असल्यामुळें

गृहस्थाश्रमही श्रेष्ठ आहे. या गृहस्थाश्रमाविषयीं ज्या विकृत भावना अज्ञानी लोकांकडून पसरविल्या गेल्या आहेत, त्या सर्वथा त्याज्य आहेत. गीतेच्या विश्वरूपदर्शनानें हा सिद्धान्त आपोआप सिद्ध होत आहे.

आजपर्यंत पुष्कळ संतांनींही गर्भवासाची निंदा केली आहे; पण ती सर्व अशास्त्रीय आहे. कांहीं संतांच्या ग्रंथात अशी वचनें आढळतात कीं, गर्भाच्या नाकांत, कानात व तोंडात मल, मूत्र व कृमी जातात ! गर्भस्थ जीव विष्ठेंत शिजत असतो. पण हें सर्व अशास्त्रीय वर्णन शरीरशास्त्राच्या अज्ञानाचें द्योतक आहे. जेथें परमेश्वराचा अंश नऊ महिने रहावयाचा, तें स्थान किती तरी पवित्र असलें पाहिजे ! गर्भाची स्थिति इतकी उत्कृष्ट असते कीं, ती पाहून विधात्याच्या रचना-कौशल्याचें कौतुकच करावेंसें वाटतें. गर्भावस्थेंत कोणत्याही प्रकारें क्लेश होत नाहींत. पण शरीर व जन्म यांचे विषयीं ज्यांच्या मनात तिरस्कार होता, त्यांनीं अशा गोष्टी पसरविल्या व मूर्ख लोक त्या शब्दशः खऱ्या मानून बसले ! गर्भ हें देवतेचें मन्दिर आहे. तें एक पवित्र स्थान असून त्यांत देवाचे अंश पाळले व पोसले जातात, म्हणून तें श्रेष्ठ स्थान आहे. असो. अशा प्रकारें विश्वरूपदर्शनानें हे सर्व मिथ्यावाद उध्वस्त झाले आहेत.

## ८. जीव परमेश्वराचा पुत्र आहे.

परमेश्वर हा पिता असून जीव हे त्याचे पुत्र आहेत. याविषयीं गीतेचें स्पष्ट कथन आहे कीं-

पिताऽहमस्य जगतो माता धाता पितामहः ॥ (गी. ९।१७)
तासां ब्रह्म महद्योनिः अहं बीजप्रदः पिता। (गी. १४।४)
पिताऽसि लोकस्य चराचरस्य
त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान्। (गी. ११।४३)
पितेव पुत्रस्य सखेव सख्युः
प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् (गी. ११।४४) ।

"परमेश्वर हा चराचराचा पिता आहे. परमेश्वर आपलें बीज आपल्या प्रकृतीचे ठिकाणीं स्थापित करतो आणि त्यामुळें विश्वाचा विस्तार होतो."

याच बीजरूपी अंशानें मनुष्याची उत्पत्ति झालेली आहे. वेदामध्येंही मानवांना **'शृण्वन्तु विश्वे अमृतस्य पुत्राः'** (ऋ. १०।१३।१) असें म्हटलें आहे. अमृतस्वरूप परमात्म्याचे जीव हे पुत्र आहेत. पित्याच्या प्रत्येक अवयवाचे अंश वीर्यद्वारा पुत्रात येतात. पित्याच्या विश्वदेहात तेहतीस देवता आहेत, जीवाच्या देहात त्या तेहतीस देवाचे अंश भिन्नभिन्न अवयवात व स्तव्य करून आहेत याप्रमाणें पिता आणि पुत्र याचें साम्य आहे. हें साम्य पाहून असा निश्चय होतो की, मनुष्य हा ईश्वराची लहानशी मूर्तीच आहे. अर्थात या ऐश्वर्याची वृद्धि करणें हें मनुष्याचें कर्तव्यच आहे. (चित्रें पहा पृ० ९७-९८-९९)

वेदामध्यें असें म्हटलें आहे की **"सप्तऋषयः प्रतिहिताः शरीरे"** (वा. य. ३४।५५) मनुष्याच्या शरिरात सात ऋषि वास्तव्य करीत आहेत. म्हणून शरीर हा सात ऋषींचा पवित्र आश्रम आहे. वेदानें हें वर्णन ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. वेदानें शरिरास तेहतीस देवताचें मन्दिरही म्हटलें आहे. **"सर्वा ह्यस्मिन् देवता गावो गोष्ठ इवासते"** (अथर्व. ११।८।३२) "ज्याप्रमाणें गाई गोठ्यांत राहतात, त्याप्रमाणें सर्व देवता (इन्द्रियरूपानें) या ठिकाणी राहतात." याप्रमाणें वेदानें मनुष्य-शरिरास देवतांचें मन्दिर, ऋषींचा पवित्र आश्रम, आणि परमेश्वराच्या पुत्रास राहण्याकरितां तयार केलेलें पवित्र निवासस्थान म्हटलें आहे. गीताही जीव हा ईश्वराचा पुत्र आणि अंश व शरीर हें पवित्र स्थान असल्याची साक्ष देत आहे. त्या शरिरास या भ्रमवाद्यांनीं केवळ पिंजरा किंवा कारागृहच नव्हे तर पू, विष्ठा, मूत्र यांचा गोळा असें म्हणून त्याची निंदा केली आहे! वेदामध्यें शरिराविषयीं आदर प्रदर्शित केलेला दिसतो, त्याप्रमाणें गीतेंतही शरिराला **आत्म्याचें कार्यक्षेत्र** (गी. १३।१) म्हटलें आहे. अशा शरिराला मूत्र-विष्ठेचा गोळा म्हणणें म्हणजे शरिराविषयीं किळस उत्पन्न करणें आहे. आज तरी आपल्या समाजात शरिराची निन्दा करणेंच ज्ञानीपणाचें द्योतक समजलें जातें. पण हें सर्व केवळ भ्रमिष्ठपणाचें द्योतक आहे

शरिराला मलमूत्राचें आगर म्हटल्यामुळें त्याच्याविषयीं अंतःकरणात जी




जीवाच्या देहांत त्रिलोकी व त्रिलोकीमध्यें
सर्व देवतांचें अंशभावानें अवस्थान




जीवांच्या देहांत तेहतीस देवतांचा प्रवेश

अवर्णनीय किळस निर्माण झाली, तिच्यामुळें या मतप्रचारकांना त्या शरीराचा त्याग करणें, हेंच आपलें शेवटचें ध्येय मानावें लागलें! जें शरीर सर्वोत्तम साधन म्हणून तयार झालें होतें, तें यांच्या मताप्रमाणें शौचकूप गणलें गेलें! शरीर हें शौचकूप आहे, हें एकदा मानलें कीं, मग त्यांत अधिक काल राहण्याची कोण इच्छा करील? शौचकूपांत कोणालाही फार वेळ बसवत नाहीं. देवता-मन्दिरात आणि ऋषींच्या पवित्र आश्रमांत राहण्याची वैदिक कल्पना जोंपर्यंत अस्तित्वात होती, तोंपर्यंत दीर्घ आयुष्य प्राप्त करणें आणि या मन्दिरास पवित्र राखणें, हें आर्यांचें ध्येय होतें. परन्तु तेंच शरीर मल्मूत्रमय मानलें जाऊं लागलें, तेव्हापासून तें क्षीण करण्याची प्रवृत्तीच वाढूं लागली, एवढेंच नव्हे तर स्नान न करणें, तोंड न धुणें, हेंही तप मानलें गेलें! अशा रीतीनें आजच्या व प्राचीन वैदिक विचारांत आकाश-पाताळाइतकें अन्तर पडलें आहे विश्वरूपाचें दर्शन करवून गीतेनें हे सर्व आधुनिक विश्वनिंदेचे भ्रामक व घातक कुविचार नष्ट केले आहेत आणि मनुष्यप्राण्याला सनातन वैदिक मार्गावर आणण्याचा प्रयत्नही केला आहे पण या विश्व-रूप-दर्शनाच्या अध्यायाचा नित्य पाठ करणारेही या विश्वाला बंधन मानतात, हें महदाश्चर्य आहे!!

जीवानें स्वतःस परमेश्वराचा पुत्र समजावें. आपण नर आहोंत व नारायण होण्याचें सामर्थ्यही आपणांत आहे, हें विसरूं नये. परमेश्वराच्या पुत्रास कारागृहांत घालण्याचें सामर्थ्य कोणांतही नाहीं हा परमेश्वराचा पुत्र जेथें म्हणून जाईल, तेथील पारतंत्र्याच्या शृंखला तटातट तुटतील, असें सामर्थ्य प्रत्येक जीवांत आहे.

परमेश्वराच्या बीजापासून विश्वरूपी महावृक्ष विस्तारला आहे बीजांत जी शक्ति गुप्त होती, तीच वृक्षरूपानें प्रकट झाली आहे. वृक्ष बनणें हा बीजाचा स्वभावच आहे बीजाचा वृक्ष झाल्यानें काहीं बिघडलें अथवा एखादी हीन वस्तु प्रकट झाली, असें कोणीही मानीत नाहीं. फलपुष्पांसहित वृक्ष हें बीजशक्तिचा विस्ताराचें वैभवच आहे याचप्रमाणें परमात्मरूप बीजापासून बनलेला हा विश्वरूप प्रचण्ड वृक्ष हीन-दीन अपवित्र होऊं शकत नाहीं तो.

तर ईश्वरीय शक्तींचा परिपूर्ण विकास आहे. " पूर्ण अदः पूर्ण इदं " तें बीज पूर्ण आहे, त्यापासून बनलेला हा वृक्षही पूर्णच आहे. याप्रमाणें विश्वरूपी वृक्षाचें वर्णन केलेलें आहे.

आतां येथें असा प्रश्न निर्माण होतो कीं, बीजाचा वृक्ष होऊन तो फलपुष्पांनीं समृद्ध झाल्यावर त्याचा त्याग करून बीजाकडे धांव घ्यावी कीं वृक्षाचीच सेवा करावी ? आज तर ' जगताचा त्याग करून मुळाचा शोध करा,' असाच आक्रोश सर्वत्र ऐकूं येतो. म्हणून याविषयीं गीतेचें काय मत आहे, तें पाहिलें पाहिजे.

गीता स्पष्टपणें असें सांगते कीं, विश्वरूपी फलपुष्पांनीं बहरलेल्या वृक्षाचीच सेवा करा. कारण हाच मार्ग योग्य आहे. बीजांत असलेल्या सर्व गुप्त शक्ति वृक्षरूपानें प्रकट झाल्या आहेत. म्हणून वृक्षाचा त्याग करून बीजाकडे जाण्याची यापुढें यत्किंचितही आवश्यकता नाहीं, असा गीतेचा संदेश आहे. जे लोक वृक्षाचा त्याग करून मुळाचा शोध करावयास जातात, त्याचे हातीं मातीशिवाय कांहीही लागणार नाहीं. कारण बीज हें स्वत:च्या गुप्त शक्तींचा विकास करून पूर्ण होण्यासाठींच स्वतः वृक्षरूप झालें आहे. म्हणून तें बीज वृक्षरूप झाल्यानंतर कधींहीं सांपडणार नाहीं. वृक्ष, पानें, फुलें, फळें, हीं बीजाचीं रूपेंच आतां हातीं लागण्यासारखीं आहेत, म्हणून त्यांचीच सेवा केली पाहिजे.

म्हणून मानवानीं विश्वरूपाचीच सेवा करावी. हें प्रत्यक्ष दृश्य असणारें विश्वरूप सोडून कोणा अदृश्य सत्तेच्या मागें लागणें, हें मृगजलाच्या मागें धावण्याप्रमाणे आहे ! विश्वरूपदर्शनाचा हा संदेश सगळ्यानीं ध्यानीं धरावा.

## ९. जन्माचा उद्देश

ईश्वराचे अंश जीवरूपानें त्याच्या विश्वरूपांत जन्म घेतात. ईश्वर सर्वदा पवित्र आहे. त्याचा अंशही पवित्र आहे आणि तो या पवित्र विश्वरूपात अवतीर्ण होतो. याचा हेतु हा कीं, परम पिता परमात्म्याच्या विश्वकल्याणाच्या व्यापक कार्यात सहभागी होण्याकरतां आपण समर्थ व्हावें. वैदिक कालांत, पुढें



लिहिल्याप्रमाणें विचार-प्रवाह जागृत होते-" ब्रह्माचा अंश आपल्या बरोबर तेहतीस देवतांच्या अंशांना घेऊन जीवरूप होण्याकरितां येतो व तो आपल्या जन्माकरितां योग्य स्थान पाहून तेथें प्रवेश करतो आईच्या उदरांत नऊ महिने राहिल्यावर तो जन्म पावतो आणि आपल्या पित्याप्रमाणें यज्ञ करूं इच्छितो. परम पिता परमात्मा नेहमीं यज्ञ करीत असतो, त्याप्रमाणें हा अमृत पुनही यज्ञ करीत असतो. असे शंभर यज्ञ करून जीव हा शतक्रतु बनतो. " हें वैदिक वर्णनही पूर्वीच्या वर्णनाप्रमाणेंच बोधप्रद आहे. अर्थात् विश्वरूपांत जन्म घेणें हें कोणत्याही प्रकारें हानिकारक नाहीं.

विश्वरूपांत ईश्वराच्या देहाचा एक अंश होऊन राहणें परम भाग्याचें लक्षण आहे. परमेश्वराच्या विश्वरूपाचा एक भाग होणें, हें वाईट कसें असूं शकेल? यामुळें शरीरधारणाविषयीं किळस निर्माण करणारी विचार-परंपरा निंद्य आहे, हें ठरतें. शरीरधारणेमुळें काहींही अनिष्ट निर्माण होत नाहीं शरीर हें कोणत्याही प्रकारें निंद्य नसून तें मानवाचें श्रेष्ठ कार्यक्षेत्र आहे. परमेश्वराच्या कार्यांत सहभागी होण्याचें तें एक उत्तम साधन आहे. मानवी जीवनाचा हा उद्देश प्रत्येकानें नेहमीं लक्षांत ठेवावा आणि शरीर, जीवन आणि जगत् यांची निन्दा न करतां आपलें कर्तव्य करीत असावें. )

ईश्वराचें कार्य- "(१) **सज्जनांचें संरक्षण**, (२) **दुष्टांचें निर्दालन** आणि (३) **धर्मसंस्थापन**, असें तीनप्रकारचें आहे. या कार्यांत तनमनधनपूर्वक करतां येईल तेवढा कार्याचा विस्तार करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. हेंच जीवनाचें ध्येय आहे भक्तश्रेष्ठ अर्जुन आणि मारुतिराय हे याच मार्गानें गेले, म्हणून प्रत्येकानें त्यांचेंच अनुकरण करावें

## १०. मूर्त आणि अमूर्त विश्वरूप हाच परमेश्वर आहे

विश्वरूप मूर्त आणि अमूर्त असें द्विविध आहे साकार व निराकार, जड आणि चेतन, दृश्य आणि अदृश्य हें त्या द्विविधतेचें स्वरूप होय. पृथ्वी, आप आणि तेज हीं साकार व दृश्य असून वायु आणि आकाश हीं निराकार आहेत.

यानाच मूर्त आणि अमूर्तही म्हणतां येईल. मूर्त किंवा साकार विश्वरूपाला तुच्छ समजणें योग्य नव्हे; कारण तोही पवित्र विश्वरूपाचाच एक भाग आहे.

दुसरें असें की, साकार अथवा निराकार ही रूपें चिरकाल टिकणारीं नाहींत पाणी थिजलें म्हणजे त्याचें बर्फ होतें व उष्णतेनें त्याची वाफही बनते. वाफ, पाणी व बर्फ ही तिन्ही एका जलतत्त्वाचींच भिन्न रूपें आहेत. अशाच प्रकारें घन पदार्थांवर निरनिराळे प्रयोग केल्यास ते वायुरूप होऊन अदृश्य होतात, आणि पुनः कांहीं प्रयोगानंतर तेच घनीभूत होऊन दृश्यही होतात म्हणून घनत्व, द्रवत्व व वायुरूपत्व या तीन निरनिराळ्या वस्तु नसून त्या तीन अवस्था एकाच तत्त्वाच्या आहेत.

जड आणि चेतन असेही दोन पदार्थ परस्पर पूर्णपणें पृथक् असे अस्तित्वात नाहींत, कारण आजपर्यंत जडाचें चेतनाहून वेगळें अस्तित्व कोणाच्याही अनुभवास आलेलें नाहीं. एका बाटलीत केवळ जड आणि दुसरींत नुसतें चेतन भरून ठेवण्यात आजपावेतों कोणाही शास्त्रज्ञास यश आलेलें नाहीं. कारण हे भेद वस्तुगत नसून कल्पनागत किंवा अवस्थागत आहेत.

साखरसारखेच्या खड्यांत ज्याप्रमाणें **"गोडा आणि गोडी"** या दोघांचेंही एकसमयावच्छेदेंकरून अस्तित्व आहे, त्याप्रमाणें जड आणि चेतन हीं परस्परांत मिसळलेलीं आहेत, या स्वतंत्र अशा दोन वस्तु नाहींत. आज या दोन्ही पृथक् मानल्या जातात, हें खरें आहे. पण ती चूक आहे. ज्याच्यापासून हें विश्व निर्माण झालें, त्या " सत् " वस्तूंत या जड-चेतनांचा अन्तर्भाव आहे. विश्वाला अनेक पदार्थांची खिचडी नसून ईश्वर, परमात्मा, ब्रह्म, आत्मा, परब्रह्म, सत्, नारायण, वासुदेव इत्यादि भिन्न भिन्न नांवानीं ओळखली जाणारी एकच एक वस्तु विश्वरूप बनलेली आहे. त्या सद्वस्तूंत अनन्त गुणांचा समुच्चय असल्यामुळें विश्वांत विविधता आली आहे. एकेक गुणाचा विकास होऊन विश्वांतील निरनिराळे पदार्थ निर्माण झाले आहेत. विश्वातील अनेकत्वाचें हेंच एकमात्र कारण आहे. एका मूलभूत " सत् " वस्तूचेच विश्वांतील नानाविध प्रकार झाले आहेत. एक " सत् " वस्तूच या विश्वांत नाना प्रकारें विलसत आहे. या बरवर

दिसणाऱ्या भिन्नत्वांतही एकत्वच विराजत आहे. या बहुविध द्वंद्वांच्या मुळाशी एक निर्द्वन्द्व सद्वस्तूच आहे. कारण तीच अनेक रूपांनीं प्रकट झाली आहे

यामुळें मूर्त-अमूर्त, सगुण-निर्गुण, साकार-निराकार या भेदकल्पना व त्यावर आश्रित असलेलीं मतमतांतरें निर्मूल आहेत हें सिद्ध झालें असून एकच " सत् " विश्वरूपानें विलसत आहे, हें स्पष्ट झालें आहे

भगवद्गीतेनें " परमेश्वर विश्वरूप आहे, " असा सिद्धान्त सांगितल्यामुळें कितीतरी भ्रान्त कल्पनांचें निराकरण झालें आहे कोणाही साधकाला या विभिन्न मतांच्या भ्रम-जालात फसण्याचें आता कांही कारण नाहीं साधकाचें जें कांहीं बनावयाचें असेल, जें काय त्यानें करावयाचें आहे आणि जें काय त्याला साधावयाचें आहे, त्या सगळयाचा संबंध या विश्वरूपाशींच आहे प्रत्येकानें हें जाणून आपापलीं कर्तव्यें करावींत व कृतकृत्य व्हावें, हें त्यास योग्य आहे

## ११. क्षर, अक्षर आणि उत्तम पुरुष

गीतेंत ' क्षर, अक्षर आणि उत्तम ' अशा तीन प्रकारच्या पुरुषांचें वर्णन आहे. हे पुरुष तीन आहेत, दोन आहेत कीं एकाचींच हीं तीन रूपें आहेत, याविषयीं अनेक शंका अभ्यासूंच्या मनांत निर्माण होतात त्यासंबंधीं थोडक्यात विवरण असें आहे–

> द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।
> क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥१६॥
> उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।
> यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥१७॥
> यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।
> अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥१८॥
> यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।
> स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥१९॥ (भ गी. १५)

या श्लोकांत (१) क्षर, (२) अक्षर आणि (३) उत्तम पुरुष, असे

तीन नांवें आलीं आहेत. आतां प्रश्न आहे कीं, हे तीन वेगवेगळे पुरुष आहेत काय ? जर हे तीन भिन्न पुरुष असतील, तर " वासुदेवः सर्वम् " (गी. ७।१९) 'हें सर्व वासुदेवच आहे,' हा सिद्धान्त खोटा ठरेल आणि विश्वरूप हें ईश्वराचेंच रूप आहे, हा सिद्धान्तही सिद्ध होणार नाहीं. याप्रमाणें या तीन पुरुषास परस्पराहून भिन्न व पृथक मानल्यानें गीतेच्या सर्व सिद्धान्तां-मध्यें उलथापालथ होऊं लागते. म्हणून या तीन पुरुषाच्या स्वरूपाविषयीं येथें विचार करणें आवश्यक आहे.

**क्षर पुरुष**— तुकडे होऊं शकणारा जड पदार्थ.
**अक्षर पुरुष**- ज्याचे तुकडे होऊं शकत नाहींत, जें सर्वत्र व्याप्त असून अखण्ड आहे, असें चैतन्य-तत्त्व.

हे जड आणि चेतन पदार्थ खडीसाखरेचा खडा आणि गोडी, ह्याप्रमाणें एकमेकांत आहेत, ते परस्पराहून भिन्न नाहींत. जडत्व आणि चेतनत्व हे दोन्ही एकच सत् वस्तूचे दोन गुण किंवा दोन भाव आहेत आणि या दोन गुणांनीं युक्त असलेल्या सत् वस्तूचें नावच 'उत्तम पुरुष' किंवा 'पुरुषोत्तम' असें आहे.

खडा+ गोडी= **खडीसाखर**

या उदाहरणात खडीसाखर हा एकच पदार्थ असून खडा व गोडी हे दोन त्याचे गुण किंवा दोन भाव आहेत. हे दोन्ही भाव नेहमीं खडीसाखरेंतच राहतात. खडीसाखर ही एकच वस्तु सत्य आहे. खडा व गोडी हे दोन भाव परस्परांहून पृथक् वस्तुरूप नाहींत. याचप्रमाणें जड प्रकृति, चेतन जीव व पुरुषोत्तम हे तीन वेगळाले पदार्थ नाहींत.

जड+ चेतन = **पुरुषोत्तम**

एका पुरुषोत्तमाचेच जड प्रकृति अथवा क्षर आणि चेतन जीव किंवा अक्षर, असे दोन भाव आहेत. हे दोन भाव ज्यात सामावले आहेत, तो एक परमात्मा हीच एक सत्य वस्तु आहे. विश्वरूप हें त्याचेंच रूप आहे. म्हणून " हें सर्व वासुदेवच आहे, " हा सिद्धान्त मुख्य आहे. गीतेंत दोन अथवा तीन पदार्थांचें

वर्णन मुळींच नाहीं. गीतेनें वर्णिलेला असा एकच 'सत्' पदार्थ म्हणजे 'पुरुषोत्तम' हा असून त्यापासूनच हें विश्व निर्माण झालें आहे किंवा तोच अनंत रूपांनीं नटून विश्वरूप बनला आहे.

अशा रीतीनें हा जड व चेतनाचा भेद निर्मूल असून ते दोन्ही एकाच सद्वस्तूचे दोन भाव आहेत, हें सिद्ध झालें.

परमेश्वर विश्वरूप आहे, हें गीतेनें सांगितलेलें तत्व समजून घेतलें म्हणजे हा बोध प्राप्त होतो. विश्वरूप ईश्वराच्या या सिद्धान्तानें ज्या अनेक भ्रान्त मतांचें खण्डन केलें, त्यांपैकीं उदाहरणांसाठीं म्हणून काहींचा येथें उल्लेख केला आहे. अशाच प्रकारें विचार केला असतां सत्य वैदिक तत्त्व कोणतें व असत्य मतान्तर कोणतें, याचें ज्ञान होईल म्हणून अधिक विस्तार न करतां हा लेख येथेंच संपवितों.



# अनन्य-योग

## अन्यभाव आणि अनन्यभाव

### १. मनुष्याचा व्यवहार

मनुष्याच्या व्यवहारात अन्यभाव व अनन्यभाव असे दोन भाव दिसून येतात. '**अन्यभाव**' या शब्दाचा अर्थ 'दुजेपणाचा भाव' असून '**अनन्यभाव**'-चा अर्थ 'जेथें दुजाभाव नाहीं, असा एकपणाचा भाव,' असा आहे हे दोन्ही भाव व्यवहारांत भिन्न भिन्न वेळीं आढळून येऊं शकतील पण साम्प्रत मात्र चहूंकडे व्यवहारात 'अन्यभाव'च अधिक प्रमाणात दिसून येतो. कोणी साधु किंवा महात्मा आचरणांत अनन्यभाव आणित असेल कदाचित्. पण सर्व सर्वसाधारण जनता ही 'अन्यभावा'चाच उपयोग करते, असें स्पष्ट दिसतें

हें माझें घर, हें माझें शेत, हें माझें धन, हे माझें कुटुंब, हें माझें गाव, हा माझा देश, ही माझी जाति, हा माझा संप्रदाय, हा माझा धर्म, अशा प्रकारें 'माझा' हा शब्द सगळ्यांच्या बोलण्यात आढळतो. याचा अर्थ असा, "हें घरदार इत्यादि सगळ्यावर माझाच अधिकार आहे, दुसऱ्याचा नाहीं." हाच अन्यभाव होय.

त्याचप्रमाणें हें दुसऱ्याचें घर, हें दुसऱ्याचें शेत, हें दुसऱ्याचें गांव, हा दुसऱ्याचा देश, ही दुसऱ्याची जाति, हें दुसऱ्याचें कुटुंब, हें दुसऱ्याचें धन, हा दुसऱ्याचा धर्म, असा दुजेपणाचा भाव आज मानवाच्या व्यवहारात सर्वत्र आढळून येतो. प्रत्येक कार्यक्षेत्रात हा अन्यभावाचा व्यवहार चालू आहे, आणि आज मनुष्याच्या उन्नतीची जी मर्यादा मानली गेली आहे, तिच्यांतही दुजाभाव राहणारच असें दिसतें.

"**मी**" आणि "**मी नाहीं**," "हें माझें आहे," आणि "हें माझें

नाहीं, हा व्यवहार दुजाभावामुळें होणारा असून, सध्या सर्वत्र याचाच प्रसार आढळून येतो. सर्व मानवी व्यवहार रात्रंदिवस यान्याच आधारावर चालतात. ते व्यवहार आणि अन्यभाव यांचा संबंध तुटणें जवळ जवळ अशक्य झालें आहे, इतका हा अन्यभाव मनुष्याच्या स्वभावाशीं मिसळून गेला आहे.

## २. द्वैत आणि द्वन्द्व

'**अन्य, भिन्न, भेद, द्वैत** आणि **द्वन्द्व**' हीं पदें या अन्यभावाच्या अर्थाचीं बोधक आहेत यातील "**द्वन्द्व**" हा शब्द युद्धाचा वाचक आहे जरी 'अन्य, भिन्न, भेद, द्वैत' हे शब्द युद्धाचें वाचक नाहींत, तरी ते युद्धाच्या स्थितीचे पोषक आहेत, एवढें मात्र निश्चित अन्य शब्दाचा अर्थ भिन्नता असा आहे. भिन्नता ही भेद दर्शविते भेदांत दोन पक्ष असतातच. दोन पक्ष असले कीं त्यामध्यें द्वैत असणें अनिवार्य आहे. आणि जेथें दोन पक्ष आहेत तेथें युद्ध हें ठरलेलेंच असतें. याप्रमाणें अन्यभावापासून भिन्नता, भिन्नतेंतून भेद, भेदातून द्वैत, द्वैतापासून द्वन्द्व, आणि द्वन्द्व म्हणजेच युद्ध होय आज विश्वात चहूंकडे अन्यभावाचेंच राज्य असल्यामुळें प्रत्येक क्षेत्रांत युद्ध सुरू आहे, शान्ति नष्ट होत आहे आणि संहार चालला आहे. ही प्रत्यक्ष डोळ्यांपुढें दिसणारी स्थिति असल्यामुळें ही सिद्ध करण्याकरिता निराळीं प्रमाणें देण्याची येथें आवश्यकता नाहीं. युद्धें बंद करण्याकरिताही युद्धाचीच तयारी केली जात आहे, आणि तिच्यामुळें पुनः नवीन युद्धें निर्माण होत आहेत याप्रमाणें सगळें जग अशान्तिच्या खाईत जळत आहे.

जोंपर्यंत मानवसमाज अन्यभावानें आपले व्यवहार चालू ठेवील, तोंपर्यंत युद्धाचा अग्नि भडकणें अनिवार्यच आहे अन्यभावानें व्यवहार करीत असता शान्तीची इच्छा करणें म्हणजे पचाग्निमध्यें बसून शीतलतेची इच्छा करण्यासारखें आहे. पण हें अगदीं असंभवनीय आहे. सध्यांचा मानवसमूह हा शान्तीकरितां युद्धाची इच्छा करीत असून त्याप्रमाणें वागतही आहे तो सतत कायेनें, वाणीनें, लेखानें व मनानें युद्धाचीं बीजें पेरीत असून अशान्तीचीं कटुफळें चाखीत आहे.

जर काहीतरी उपाय करून आपण मनुष्याच्या व्यवहारांतून या 'अन्यभावा' स दूर करूं शकूं, तरच या युद्धाचीं बीजें नाहींशीं होणें शक्य आहे. पण जो अन्यभाव मानवी व्यवहारात शिरून तेथें आपलें स्थान घट्ट करून बसला आहे, तो दूर कसा होणार? आणि जर तो दूर होणार नाहीं, तर मग युद्धाची आग कशी थंड होणार? हें सध्याचें धकाधकीचें जीवन शान्तिपूर्ण कसें होईल? हा एक मोठा प्रश्नच आमच्या समोर उभा आहे.

## ३. विश्वरूप म्हणजे अनन्यभाव

भगवद्गीतेच्या अकराव्या अध्यायानें अखण्ड विश्व हें परमेश्वराचें अखण्ड रूप आहे, असें सिद्ध करून, या नानाविध विविधतेनें नटलेल्या विश्वात अनन्यभावच नांदत आहे, असें सिद्ध केलें आहे. परमेश्वर हा एकरस, एक, अद्वितीय आणि अनन्य आहे. त्याच एकाचें विश्व हें रूप आहे त्यामुळें जरी यात विविधता भासत असली, तरी ईश्वराच्या एकत्वामुळें त्यात मुख्यतः एकताच आहे. मनुष्य या विश्वातील एक अंश असल्यामुळें तो विश्वरूपातच सामावलेला आहे. आणि म्हणून तो विश्वाशीं अ-पृथक्, अनन्य आणि अद्वितीय आहे. अर्थात् तो विश्वाशीं एकरूपच आहे, विश्वाहून वेगळा नाहीं. विश्वाचा आणि त्याचा अनन्य-संबन्ध आहे.

मनुष्य विश्वाहून भिन्न नाहीं, हें गीतेच्या विश्वरूप सिद्धान्तानें स्पष्ट झालें आहे. ज्या एका ईश्वराचें हें विश्वरूप आहे, त्यातील एक बिन्दु म्हणजे मनुष्य. विश्वरूपांत सर्व मनुष्याच्या समूहाचें रूप गोंवलें गेलें आहे, तें विश्वरूपाहून वेगळें नाहीं.

जर सगळें विश्वाचें रूप हें एका अद्वितीय ईश्वराचेंच रूप आहे, तर मग सगळ्या मनुष्याचा अन्तर्भाव या विश्वातच होत असल्यामुळें सगळीं मानवीरूपें परमेश्वराच्या स्वरूपांतच सामावलीं आहेत. म्हणून कोणाचेंही रूप विश्वरूपाहून वेगळें नसून सगळे विश्वरूपाशीं अनन्यभावानें एकरूप झालेले आहेत. सर्व मिळून एकच सत्ता किंवा एकच जीवन आहे. या ठिकाणीं वेगवेगळ्या सत्ता नाहींत. सर्व मिळून एकाच ईश्वराचें एकच अखण्ड, अद्वितीय, एकरस रूप आहे.

याप्रमाणें विश्वरूपाचें दर्शन करवून गीतेनें अनन्यभावाचा संदेशच सर्व मनुष्यांना दिला आहे.

येथें प्रश्न असा उपस्थित होतो कीं, हा संदेश व्यवहारांत आणतां येणें शक्य आहे काय? कीं हा तात्त्विक सिद्धान्ताचा विषय केवळ निष्क्रिय वृद्धांनीं करावयाच्या चर्चेसाठींच आहे? गीतेचा उपदेश हा मानवी व्यवहारांत उपयोगी पडणारा असून तो केवळ चर्चेचा विषय नाहीं, हें सर्वांस माहीत आहे. म्हणून हा अनन्यभाव व्यवहारांत कसा येईल, हा विचार करणें सर्वांस योग्य आहे. वस्तुतः हा मोठाच गहन प्रश्न आहे. पण हा सोडविणेंही तितकेंच आवश्यक आहे. अनन्यभावाचा उपदेश करतांना गीतेनें अनन्यभावानें उपासना अथवा भक्ति करण्यास सांगितलें आहे. पहा–

## ४ अनन्यभक्ति आणि अन्यभक्ति

अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥
येऽप्यन्यदेवता भक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः।
तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम् ॥

(भ. गी. ९।२२,२३)

"(ये जनाः) जे लोक (अन्+अन्याः) अन्यभावानें व्यवहार न करतां, अर्थात् अनन्य होऊन कार्य करणारे (मां उपासते) मज ईश्वराची उपासना करतात, (तेषां नित्याभियुक्तानां) त्या नित्य तत्परतेनें कार्यांत निमग्न असणाऱ्या लोकांचा (अहं योगक्षेमं वहामि) मी योगक्षेम चालवितों. पण जे (अन्य-देवता-भक्ताः) उपास्य देवतेला आपणाहून भिन्न मानून भक्ति करतात, ते विधिमार्ग सोडून कां होईना, पण मज ईश्वराचीच उपासना करतात."

### अनन्य-भक्त

या श्लोकांत दोन प्रकारचे भक्त वर्णिले आहेत. एक "अनन्याः चिन्तयन्तः नित्य-अभियुक्ताः" अर्थात् स्वतःला ईश्वराहून अभिन्न समजणारे, त्याचें अभिन्नपणाचें मनन करणारे, आपलें कर्म नेहमीं कुशलतेनें करणारे,

## अनन्य-योग

नित्य सत्कर्मांत तत्पर असणारे, त्यांस अनन्यभक्त असें म्हणतात. विश्वरूप ईश्वरांत आपला समावेश झाला आहे, हें जाणणारे, आपण ईश्वराशीं अभिन्न आहोंत, हा अनुभव असणारे, आणि म्हणूनच स्वतःला ईश्वराशी अभिन्न किंवा अनन्य समजणारे, याच अभिन्नतेची अर्थात् जीव-शिवाच्या एकत्वाची आपल्या मनात सदोदित जागृति ठेवणारे, आणि स्वतःचा व्यवहार हा ईश्वराशीं होणारा व्यवहार आहे हें ओळखून त्याप्रमाणें वागणारे अनन्यभक्त होत.

## अन्य-भक्त

दुसऱ्या जातीच्या भक्तांस " अन्य-देवता-भक्ताः " असें नांव दिलें आहे. माझी उपास्य देवता माझ्याहून भिन्न आहे, आणि मी तिच्याहून वेगळा आहें, असें मानून तिची उपासना करणाऱ्यांना 'अन्यभक्त' असें नाव आहे. जरी हे विधि सोडून उपासना करतात, तरी हेही भक्तच आहेत. विधि-पूर्वक भक्ति न केल्यामुळें यांच्या भक्तीमुळें मिळणाऱ्या फळांत कांहींतरी कमी-पणा असेल, पण यांचा मुख्य दोष म्हणजे अन्यभाव हा आहे. याविषयीं उप-निषदांत म्हटलें आहे—

**येऽन्यथाऽतो विदुः अन्यराजानस्ते क्षय्यलोका भवन्ति ।**
**(छां ७।२५।२)**

"जे उपास्य देवतेला आपणाहून भिन्न मानतात, ते दुसऱ्याला आपला राजा मानतात, म्हणून ते दुसऱ्याचे दास होतात. यामुळें त्यांना मिळणारे लोक क्षीण असतात.'' हाच उपास्य देवतेला स्वतःहून भिन्न मानण्याचा दुष्परिणाम आहे. "अन्यराजानः" म्हणजे दुसऱ्याचें स्वामित्व मानणारे म्हणजे पराधीन. हे लोक त्या दुसऱ्या स्वामीचे दास असतात. स्वराज्य प्राप्त करून त्यांत 'स्वराट्' बनणें हें साध्य केवळ अनन्यभक्तांनाच प्राप्त होऊं शकेल. 'मी माझा राजा आहें, मीच माझा शासक आहें' हा भाव एका अनन्यभक्तांनाच अंगीं बाणूं शकेल. अन्यभाव हा दुसऱ्याच्या बंधनात टाकणारा भाव आहे, म्हणूनच 'अन्यदेवता-भक्त' हे विधिमार्ग सोडून भक्ति करितात, असें म्हटलें आहे. कोणा दुसऱ्याला

राजा मानून आपण त्याचें दास्य स्वीकारणें हें झाली मनुष्याला योग्य नव्हे वेदाचें ज्ञान अनन्यभाव वाढवून सर्वांस स्वतंत्र करणारें आहे, म्हणून 'अन्यभाव' हा स्वीकार करण्यास योग्य नव्हे. याविषयीं आणखी एक उपनिषद्वाक्य आहे, तें असें—

अथ योऽन्यां देवतामुपास्तेऽन्योऽसौ, अन्योऽहमस्मीति, न स वेद, यथा पशुः, एवं स देवानाम्। यथा ह वै बहवः पशवो मनुष्यं भुंज्युः, एवमेकैक पुरुषो देवान् भुनक्ति, एकस्मिन्नेव पशावादीयमानेऽप्रियं भवति, किमु बहुषु, तस्मादेषा तन्न प्रियं, यदेतन्मनुष्या विद्युः॥

(बृ १।४।१०)

" जो अन्यदेवतेची उपासना करतो, म्हणजे माझ्याहून देवता भिन्न असून मीही देवतेहून भिन्न आहें, असें मानतो, तो जणु काय देवाचा पशुच आहे ज्या-प्रमाणें अनेक पशु हे मनुष्याकरिता भोग देतात, त्याप्रमाणें तो एकटा मनुष्य देवाचा भोग होऊन राहतो आपला एखादा पशु कोणी चोरानें नेला, तर आपणाला किती दुःख होतें ? मग अनेक पशु चोरून नल्यावर तर अधिकच दुःख होईल त्याचप्रमाणें कोणा मनुष्यास ब्रह्मज्ञान झालेलें देवाना आवडत नाहीं कारण त्यामुळें त्याचे भोग कमी होतात "

या उपनिषद्वचनानें अन्यभावानें होणाऱ्या भक्तांचा दुष्परिणाम व तिच्यामुळें होणारें दुःख यावर चांगलाच प्रकाश पडत आहे देवाचा ' पशु ' बनण्यापेक्षां " स्वराट् " होणें कितीतरी चांगलें अ हे भक्ति करण्याकरिता देव आणि भक्त यांच्यात भेदभाव आवश्यक आहे, असें मानणाऱ्यांना गीता व उपनिषदें समजलींच नाहींत, असें म्हटलें पाहिजे ' उपास्य-देवतेस अन्य मानून अन्यभावानें तिची उपासना करणें हें विघीला सोडून आहे,' या गीतेच्या वचनाचें तात्पर्य हेच आहे

अनन्यभक्त हे श्रेष्ठभक्त आहेत, आणि अन्यभक्त हे विधिहीन भक्ति करणारे आहेत अनन्यभक्त हे स्वतः देवतारूप झालेले असतात आणि अन्यभक्त हे स्वतःस देवतेहून भिन्न मानून तिचें दास्य स्वीकारीत असतात

## ८. देव आणि भक्त

देव आणि भक्त हें एक द्वन्द्व मानलें गेलें आहे. या द्वन्द्वावरून अनेक द्वन्द्वांची कल्पना करता येण्याजोगी आहे. देव आणि भक्त, राजा व प्रजा, मालक आणि मजूर, अशीं किती तरी द्वन्द्वें विचारांत घेण्याजोगीं आहेत.

ज्याप्रमाणें, अनन्य भक्ति करणारे भक्त स्वत:ला देवाहून अभिन्न, एकरूप, अविभक्त मानतात, आणि स्वतः देवरूप होऊन तिची उपासना करतात, त्याप्रमाणें स्वराज्यांत प्रजा ही आपणास राज्य-शासनयंत्राशीं अविभक्त व एकरूप मानते, आणि आपल्या हिताकरितां आपला राज्यकारभार स्वतः चालविण्याचा अनुभव घेते. ती प्रजा स्वराट् पदवीला प्राप्त होते—तसेंच जेथें मजूर स्वत:ला मालक समजतात, कारखाना हा आपणा सर्वांचा आहे, असा अनुभव घेतात, स्वत:ला मालकाशीं अविभक्त, एकरूप किंवा अभिन्न मानतात, तेथें तेही आपल्या कार्य-क्षेत्रात 'स्वराट्' च होतात.

आतां अन्यभावाचा काय परिणाम होतो, तें पाहूं या. पूर्वी दिलेल्या उपनिषद्-वाक्यांत म्हटलेंच आहे कीं, अन्यभक्त हे देवतांचे पशु आहेत, ते त्यांचे दास आहेत, आणि देवतांना भोग पुरविणें हेंच त्यांचें काम आहे. राज्यशासनाच्या यंत्रांत हा प्रकार तितकाच अनर्थकारी आहे. अन्यभावानें होणाऱ्या राज्यकारभारात प्रजा ही राजाचे भोग वाढवण्यासाठीं असते, ती राजपुरुषांकडून चिरडली जाते. ती आपल्याला अधिकाऱ्यांहून वेगळें मानते. राजा, अधिकारी आणि प्रजा यांत नेहमीं संघर्ष चाललेला असतो. आणि म्हणून दोन्ही पक्ष नेहमीं चिन्तेंत मग्न असतात. संघर्ष हाच अन्यभावाचा परिणाम आहे. याचप्रमाणें अन्यभावामुळें मालक व मजूर यांच्यातही रात्रंदिवस युद्ध चाललेलें असतें. मालक मजुरांना कमी वेतन देऊन त्यांच्याकडून अधिक काम करवून घेण्याची इच्छा करीत असतो आणि मजूर याच्या उलट, काम कमी करून वेतन अधिक घेण्याच्या प्रयत्नात असतात. तात्पर्य अन्यभाव हा लढाया व युद्धें यांचें मूल कारण आहे उपनिषदानें "अन्यराजानः" या शब्दाच्या द्वारें या अन्यभावानें उपासना करणाऱ्या भक्तास 'दुसऱ्यास राजा समजून

त्याची गुलामगिरी करणारा, ' असें म्हटलें आहे, तर गीतेनें, " अन्यदेवता. " म्हणजे आपल्याहून वेगळ्या देवतेची उपासना करणारा, असें याचें वर्णन केलें आहे. या दोन्हींचा अर्थ एकच आहे. एखाद्या राजाचें दास्य स्वीकारणें, आपणाहून कोणी मोठा देव मानून दासभावानें त्याची भक्ति करणें, अथवा कोणा मालकाच्या हाता खालीं काम करणें, या तिन्हींचा अर्थ एकच. हें सगळें दास्याचेंच द्योतक आहे. अन्यभावात दुसऱ्याचा दास व्हावें लागतें. दोघामध्यें जो प्रबल असेल, तो दुसऱ्याला दास करील, आणि दास्यांत तर असह्य दुःखच आहे. म्हणून अन्यभाव हा दुःख वाढविणारा असून, अनन्यभाव हा सुखाचें संवर्धन करणारा आहे.

धर्मव्यवस्था, राज्यव्यवस्था, उद्योगव्यवस्था आणि दुसऱ्या व्यवस्था, यांमध्यें जेथें जेथें अन्यभावाचें साम्राज्य असेल तेथें पीडाच निर्माण होईल; आणि जेथें म्हणून अनन्यभाव असेल, तेथें सुखाची वृद्धि होईल. म्हणूनच गीतेनें अनन्य-भावाची स्तुति करून अन्यभावापासून दूर राहण्याची सूचना दिली आहे. अनन्य भक्तांच्या योगक्षेमाचा भार भगवान् स्वतः आपल्या शिरावर घेत आहेत, याचें कारण हेंच आहे.

विश्वरूप ईश्वरांत आपल्या अस्तित्वाचा अनुभव घेणें, व स्वतःला ईश्वराशीं एकरूप, अभिन्न व अपृथक् मानणें, हेंच अनन्य भक्तींतील मुख्य तत्त्व आहे. राज्यशासन आणि कारखाना यांच्याविषयीं प्रजा व मजूर यांचे ठिकाणीं जर असाच अभिन्नभाव वाढूं लागला, तर त्यांस 'स्वराट्' होण्याचाव स्वामीपणाचा अनुभव येऊं लागेल. देव आणि भक्त, राजा व प्रजा, आणि मालक व मजूर यां सर्वांविषयीं एकच तत्त्व लागू आहे, हें वाचकांनीं ध्यानांत ठेवावें. सर्वत्र एकच नियम काम करीत आहे. अभिन्नतेचा या एकरूपतेचा नियम हा नेहमीं सुखदायी असून पृथग्भावानें नेहमीं दुःखेंच पेटत राहतील हें नेहमीं लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

५

## ८. देवताविज्ञान, भूतविज्ञान व आत्मज्ञान

आजपर्यंत अभिन्नताज्ञानानें नियम कोणतीही राज्य शासन व व्यापारादि

व्यवहारात लावले नाहींत, म्हणून हा विषय आम्ही येथें थोडा अधिक स्पष्ट केला आहे वेद, उपनिषद्, गीता इत्यादि ग्रंथात दैवतविज्ञानाचीच चर्चा केलेली आढळते. भूत-विज्ञान व मानव-धर्म-विज्ञानाविषयीं क्वचितच एखादे ठिकाणीं उल्लेख आढळतो. त्या दैवतविज्ञानावरूनच मनुष्यानें मानवी व्यवहाराचें ज्ञान जाणून घेतलें पाहिजे. हा नियम सार्वत्रिक असल्यामुळें सर्वांना याचें ज्ञान असणें आवश्यकच आहे. पण दुर्दैवानें सांप्रत सर्वांस याचा विसर पडला आहे. म्हणूनच या ठिकाणीं अन्यभक्ति आणि अनन्यभक्ति हे शब्द केवळ आधिदैवत (उपासना) क्षेत्रातच वापरावयाचे नसून, ते आधिभौतिक (प्राणिव्यवहार) अथवा अधियज्ञ (धर्मव्यवहार) आणि अधिकर्म (कार्यव्यवहार) क्षेत्रातही याच नियमाचा उपयोग करावयाचा आहे, हें येथे विशेषरूपानें स्पष्ट करणें प्राप्त झालें आहे गीतेचा विचार करणारांनी याचा लक्षपूर्वक विचार करावा. **"यद्देवा अकुर्वस्तत्करवाणि"** अर्थात् जें आचरण देवानीं केलें तसेंच आम्हीं करावें या वचनानें असें सिद्ध होत आहे कीं देवतांचीं वर्णनें मानवांसाठीं आदर्श म्हणून घेण्यासाठीं आहेत सध्या जे राजकीय आणि औद्योगिक क्षेत्रात धर्माचे नियम पाळीत नाहींत, ते अशुद्ध मार्गानें जात आहेत आपणास आतां या नियमांची माहिती झालेली असल्यामुळे आपण मानवी व्यवहाराच्या प्रत्येक अंगात अन्यभाव आणि अनन्य भावाच्या आचरणानें काय इष्ट परिणाम होणें शक्य आहे तें पाहूं. गीतेंतील सर्व आधिदैविक वर्णनें जेव्हां याप्रमाणें मानवी व्यवहारात येतील, तेव्हांच गीतेचा उपदेश व्यवहारात आला असें म्हणता येईल गीता ही मनुष्यांनीं व्यवहारात आणण्या साठींच सांगितली आहे.

## ७. भक्त आणि भक्ति

आता भक्त, भक्तीचें स्वरूप आणि भक्ताच्या कर्तव्याचा विचार केला पाहिजे 'भज् सेवायाम्' या धातूपासून भक्त आणि भक्ति हीं दोन पदें निर्माण झालीं आहेत '**भजते य स भक्तः**' अर्थात जो सेवा करतो तो भक्त म्हणावा 'भज्' धातूचा अर्थ सेवा करणं, सन्मान करणें, आदरसत्कार करणें असा आहे अर्थात् 'भक्त' शब्दाचा अर्थ सेवा, सन्मान व आदरसत्कार

*

करणारा असा होतो. सध्यां ईश्वराच्या नावाचा जप करणारासच भक्त म्हटलें जातें. पण गीतेच्या दृष्टीनें भक्ताचें तें प्रधान कर्म नव्हे. सेवाभाव, सत्कारभाव, आदरभाव हे मुख्यतः भक्तामध्यें पाहिजेत. ज्याच्या मनांत व व्यवहारांत हे तीन भाव असतील, तोच खरा भक्त होय. आपल्या कडून होणाऱ्या कर्मांच्या योगानें अनन्यभावानें विश्वरूप ईश्वराची सेवा करणें, पूजा करणें आणि त्याचेविषयीं आदर व्यक्त करणें, याचेंच नांव भक्ति. ही भक्ति " मी माझ्या उपास्य-देवतेहून पृथक् नाहीं," हें जाणून केली पाहिजे.

जो 'आपण विश्वरूपाचा अंश आहोंत,' असा अनुभव घेतो, व जो या विश्वरूपास परमात्मरूप मानतो, तो प्रत्येक कर्म करतांना स्वतःला ईश्वराहून अविभक्त, अभिन्न, अपृथक् किंवा एकरूप च मानील, ईश्वराशीं आपला हा संबंध कधींही न तुटणारा असा आहे, हें ज्ञान त्याला ज्या वेळीं होईल, त्यानंतर त्याचा ईश्वराशीं '**नित्ययोगच**' होत राहील, याच योगाला गीतेनें "**नित्य-युक्तः, नित्य-अभि-युक्तः**" असें म्हटलें आहे. या भक्ताचा ईश्वराशीं असणारा हा योग सतत, रात्रंदिवस व प्रतिक्षणीं होत राहतो. या योगाचा वियोग कधींच होत नाहीं; विश्वरूपाचें यथार्थ ज्ञान झाल्यावरच या नित्ययोगाचें अविच्छिन्नतेनें आचरण होणें शक्य आहे. ज्यांनीं विश्वरूपास याच रीतीनें जाणलें आहे, ते स्वतःला त्या विश्वरूपापासून पृथक् कसें बरें समजतील?

* "*अनन्य*" *याचा अर्थ गीतेच्या टीकाकारांनीं मोठा विलक्षण केला आहे.* उदाहरणार्थ—

अनन्याश्चिन्तयन्तो मां ...... ॥

I. *Those people who, thinking on Me with singleness of purpose.* (Dr. Belvalkar)

II Those who worship Me alone thinking of no other. (Annie Besant)

सध्यां "अनन्य" शब्दाचे असेच अर्थ केले जातात. पण पूर्वी केलेल्या

स्पष्टीकरणाप्रमाणें पाहिलें तर हे अर्थ योग्य नव्हेत हें उघड आहे. याचा खरा अर्थ पुढें दिल्याप्रमाणें आहे —

III Those who identify themselves with Me, realise that they are not separate from Me, meditate on Me (or think of Me, or worship Me.)

"अन्-अन्य, म्हणजे अभिन्न होऊन माझें चिन्तन, ध्यान, पूजन, आदर अथवा सत्कार करतात;" हा त्या श्लोकार्थाचा वास्तविक अर्थ आहे. पण अनेक लोक या शब्दाचा अर्थ, "मला सोडून जे अन्य कोणाही देवतेची पूजा करीत नाहीत," असाच करतात. हा अर्थ योग्य नव्हे. कारण गीतेचा सिद्धान्त व हा अर्थ यात पुष्कळच अन्तर आहे.

विश्वरूपाचा सिद्धान्त न समजल्यामुळें हा असा अर्थाचा अनर्थ झाला आहे. अनन्य भक्त हे श्रेष्ठ आहेत. कारण ते ईश्वर-रूप होऊन भक्ति म्हणजेच सेवा करीत असतात. सर्वांचा सारखाच आदरसत्कार करतात. यांची ही भक्ति विधिपूर्वक भक्ति आहे. हेच भक्त नित्य-अभि-युक्त व सर्वप्रकारें सर्वकाल भक्ति करणारे होत. याच्याकडून घडणाऱ्या कृत्यांनींच ईश्वराचा योग्य सत्कार होत असतो. याच्याकडून होणारी प्रत्येक क्रिया ही ईश्वराची सेवाच होत असते. यांचा व ईश्वराचा संबंध कधींही तुटत नाहीं, अर्थात् तो अखण्डित असतो.

## ८. ईश्वराची नित्य भक्ति

आता ईश्वराचें स्वरूप व त्याची भक्ति यांचा विचार करावयाचा आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे ईश्वराचें मस्तक, हात, उदर व पाय आहेत. पशुपक्षी, वृक्षवनस्पति आदि सर्वच्या सर्व वस्तुजात ईश्वराचें स्वरूप आहे. यांच्याशीं आदरपूर्वक व्यवहार केला पाहिजे. याचा सत्कार करून त्यांची सेवा करणें हाच सर्वांचा धर्म आहे.

हें भक्तीचें यथार्थ रूप आहे. ईश्वरसेवा हीच भक्ति होय. आणि त्या सेवेंत ईश्वराचा आदर आणि सन्मान हीं होत असलीं पाहिजेत. हें संपूर्ण विश्व ईश्वराचें

रूप असल्यानेंच तें सेवा करण्यास योग्य आहे. जेथें जशी सेवा करणें आवश्यक असेल, तेथें त्या प्रकारची सेवा करणें हेंच भक्ताचें कर्तव्य आहे आणि ही सेवा अनन्य भावानेंच केली पाहिजे.

पूर्वी ईश्वर आणि भक्त या द्वन्द्वाविषयीं उल्लेख केला. आता दुसरें द्वन्द्व राजा व प्रजा; तिसरें धनी आणि कामगार, चौथें द्वन्द्व वैद्य व रोगी, गुरु आणि शिष्य हें पाचवें द्वन्द्व. या विश्वात अशीं अनेक द्वन्द्वें आहेत. त्या सर्वांत अनन्यभाव स्थिर राहिला पाहिजे, तरच सुख होणें शक्य आहे. "मी वैद्य आणि हा रोगी या दोघांचेंही जीवन एक अविभक्त आणि अखण्ड आहे" असा विचार वैद्य व रोगी यांच्या मनात निर्माण झाला पाहिजे. वैद्यानें रोग्याची सेवा मोच ही आहे, अशा आत्मीयतेनें करावी प्रत्येक द्वन्द्वांत हा असाच आत्मीयतेचा भाव राहिला पाहिजे. कोठेंही अन्यभाव निर्माण झाला कीं, ती सेवा विधिपूर्वक न होतां तेथें अन्यभावामुळें होणारे सर्व दोष निपजतात. म्हणून या द्वन्द्वभावापासून दूर राहणें सर्वांस योग्य आहे.

## ९. अनित्य भक्त

पूर्वी नित्यभक्ताच्या व्यवहाराचें वर्णन केलें आहे. अनित्य भक्त हा त्याहून विपरीत आहे. आपला ईश्वराशीं संबंध नित्य आणि अखण्ड आहे, असें हा मानीत नाहीं. "जेव्हा मी देवळांत जाऊन देवाचें पूजन अथवा भजन करीन, तेवढ्यापुरताच देवाचा व माझा संबंध येतो, इतर वेळीं त्याचा माझा कांहीं संबंध नाहीं" अशी याची कल्पना असते हा नेहमीं ईश्वरास स्वत हून भिन्न मानीत असतो. या विधिहीन भक्ताचेंच नाव "**अन्य-देवताः**" किंवा "**अनित्य भक्ताः**" असें आहे.

याची अशी समजूत आहे कीं, देवाचें अस्तित्व केवळ देवळातच आहे आपण प्रपंचाच्या खटपटींत वावरत आहोंत या प्रापंचिक व्यवहारांत ईश्वराचें अस्तित्व कसें असेल? परमार्थ हा या दुःखमय प्रपंचाहून अगदीं वेगळा आहे. आम्ही देवळांत जाऊन निरनिराळ्या उपचारांच्या द्वारें तेथील देवाची पूजा करू आणि त्या पूजेनेंच ईश्वर प्रसन्न होऊन तो आमची पापें

नष्ट करील. भक्तीचें स्थान केवळ देऊळ आहे. घर आणि बाजार यात भक्तीहून
वेगळा असा व्यवहार करायचा असतो भक्ति आणि व्यवहार यांचा
परस्पराशी काहीं संबंध नाहीं, या समजुतीमुळें हे अन्यभक्त व्यवहारात
लाडीलबाडी करून, लोकांना फसवून त्यापासून मिळणाऱ्या पैशाचा उपयोग
देवाच्या पूजेकरिता करतात ! आणि याला भक्ति हें गोंडस नांव दिलें जातें !
पण आपण केलेला कपटपूर्ण व्यवहार हा ईश्वराशीच केला असून त्या
कमाईतला काहीं भाग देवपूजेकडे खर्च करून आपण देवालाही त्या कपटव्यव-
हारात भागीदार करीत आहोंत, हें यांच्या लक्षातही येत नाहीं ! अशो.
अशाप्रकारें विश्वरूपाचें यथार्थ ज्ञान न झाल्यामुळें व्यवहारात आणि परमार्थात
जो भेद मानला गेला आहे, त्यामुळे किती तरी अनर्थ झाले आहेत हे अन्य-
देवता-भक्त किंवा अन्यभक्त ईश्वराचीच भक्ति व पूजा करीत असूनही ते ती
विधि सोडून करीत असल्यानें ती अनेक अनर्थास कारण होत आहे

या अन्यभक्ताकडून सदोदित ईश्वराची उपासना होऊंच शक्त नाहीं कधीं
हे भक्ति करितात, तर कधीं व्यवहारात दंग असतात व्यवहार करीत असताही
तोच परमार्थ घडला पाहिजे. हें केवळ अनन्य भक्तीनेंच शक्य आहे

पण जे संपूर्ण विश्वरूपाला ईश्वराचें रूप मानणारे अनन्य भक्त आहेत.
त्यांच्या मनात, "मी ईश्वरांश आहे," असा भाव सतत जागृत असतो, व
संपूर्ण विश्वाला ते ईश्वराचेंच रूप मानतात याप्रमाणें आपला आणि विश्वाचा
अनन्य संबंध आहे, हें पाहून ते जो व्यवहार करतात, तो सर्व ईश्वरस्वरूपाशींच
होत असतो, म्हणून त्यांचा व्यवहार व परमार्थ दोन्ही एकरूपच असतात. व
जेथें जातील तेथें त्यांचें उपास्य दैवत त्यांच्या समोर उपस्थितच असतें ते
यामुळें जें काहीं करतील, ती त्याची सेवाच होते, ते आणि त्यांचा ईश्वर हे
एकमेकापासून दूर असतील, असा एक क्षणही असत नाहीं यामुळें संपूर्ण प्रपंचच
त्यांना परमार्थरूप झालेला असतो व त्यांच्या आयुष्याच्या प्रत्येक क्षणात
ईश्वराची सेवाच त्यांच्याकडून होत राहते. हीच अनन्य आणि विधिपूर्वक
भक्ति होय. हाच अनन्ययोग होय याच्या योगानेंच मनुष्य कृतार्थ होतो.

बहुधा लोकांचा असा समज आहे की, व्यवहार आणि ईश्वरभक्ति यांचा परस्पर संबंध नाहीं. कित्येक लोक शुक्रवारीं अथवा रविवारीं प्रार्थना-मन्दिरांत जाऊन उपासना केली, म्हणजे ईश्वराची भक्ति झाली, असें समजतात. तर दुसरे कांहीं एकादशी, शिवरात्र, सोमवार हे दिवस देवभक्तीकरितां राखून ठेवलेले आहेत, असें मानतात. तसेंच कित्येकांची समजूत अशी आहे कीं, मंदिर, चर्च, मशिदी, यामध्यें गेल्यानें किंवा काशी, रामेश्वर, जेरुशलेम, मक्का, मदीना इत्यादि स्थानाच्या यात्रा केल्यानें ईश्वरोपासना होते. पण या सर्व मतांचे अनुयायी आपण व जग याहून ईश्वर वेगळा आहे, असें मानतात. याची भक्ति ही अन्यभक्तीच आहे व या अविधिपूर्वक भक्तीचा परिणाम मानवी मनाचें दास्य वाढविण्याकडेच होतो. कोणा एकास राजा करून आपल्या लोक्यावर बसवावें, व आपण त्याचें दास्य पत्करावें, यासारखाच हा प्रकार हानि कारक आहे.

म्हणून अनन्यभक्ति श्रेष्ठ आहे, अनन्यभक्तांचें बसणें, बोलणें चालणें इत्यादि सर्व व्यवहार ईश्वरामध्यें व ईश्वराशींच होतात. म्हणूनच हे भक्त 'नित्याभियुक्त' अर्थात् ईश्वराशीं नेहमीं संयुक्त असतात. आणि त्यामुळें त्यांना ईश्वराचा विरह एक क्षणभरही अनुभवावा लागत नाहीं.

## १० अनन्य भक्तीपासून लाभ.

पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया।

(गी. ८।२२)

पूर्वी सांगितलेल्या अनन्यभक्तीच्या आचरणानेंच त्या परम पुरुषाची प्राप्ति होते. "**परः पुरुषः अनन्यया भक्त्या लभ्यः**" या चरणाचा अर्थ भाषान्तरकर्त्यांनी मोठ्या विलक्षण पद्धतीनें केला आहे. "The supreme person is attained by singlepointed devotion." (Dr. Belvalkar).

"The highest spirit may be reached by unswerving devotian to Him alone. (Annie Besant)

अनन्यभक्तीचा अर्थ एकाग्रभक्ति असा समजला जातो, पण तो योग्य नव्हे. उपास्य देवतेला सोडून दुसऱ्या कोणत्याही देवतेची भक्ति न करणें, असाही एक अर्थ केला जातो. पण तोही अशुद्ध आहे. या विश्वमात्रात एका प्रभूवाचून दुसरें कोणीही नसून तोच विश्वरूपानें नटला आहे, असें निश्चितरूपानें जाणून केलेल्या त्याच्या भक्तीस अनन्य भक्ति म्हणावें. गीतेंतील अनन्य शब्दाचा हा अर्थ असून तो एक अत्यंत महत्त्वाचा सिद्धांत आहे. हा चांगला समजल्याशिवाय गीतेचा आशय समजणें अशक्य आहे. हाच अनन्यभावाचा सिद्धांत गीतेनें खालील श्लोकांत अधिक स्पष्ट केला आहे—

भक्त्या त्वनन्यया शक्य अहं एवंविधोऽर्जुन।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥
( गी. ११।५४ )

" याप्रमाणें आचरल्या गेलेल्या अनन्य भक्तीनेंच (अहं) मला अर्थात् ईश्वराला (द्रष्टुं) पाहणें, (ज्ञातुं) जाणणें आणि ( तत्त्वेन प्रवेष्टुं ) तत्त्वतः माझ्यांत प्रविष्ट होणें संभवनीय आहे. येथें ईश्वरास पहाण्याच्या शक्यतेचा उल्लेख केला गेला आहे. अर्थात् ईश्वर हा विश्वरूपानेंच दिसूं शकतो, हें वेगळें सांगणें नको. ( ज्ञातुं ) ईश्वरास जाणणें म्हणजे विश्वाला व विश्वरूपाला अर्थात् त्यांतील पदार्थांना जाणणेंच होय.

येथें 'प्रवेष्टुं' म्हणजे ईश्वरांत प्रविष्ट होणेंही सांगितलेलें आहे. ईश्वराला विश्वरूप मानल्यावरच त्यांत प्रवेश करणें शक्य आहे; तत्त्वतः सर्व मानव ईश्वरांत प्रविष्टच आहेत, मग ते ही वस्तुस्थिति जाणोत अथवा न जाणोत. अनन्य होण्यानेंच ईश्वरांत आपला प्रवेश झाला आहे, ही गोष्ट ध्यानांत येऊं शकते.

विश्वरूप ईश्वराला पाहतां येतें, जाणतां येतें, व त्यांत प्रवेश ही करतां येतो, हें या वचनानें स्पष्ट झालें आहे. सध्या लोक ईश्वराच्या ज्या स्वरूपाची कल्पना करतात, तो ईश्वर पहातां येत नाहीं, जाणला जात नाहीं, व त्यांत आपला प्रवेश झाल्याचें ज्ञान तर कोणालाच होत नाहीं. म्हणून " ज्ञातुं, द्रष्टुं, प्रवेष्टुं "

ही गीतेंतील पदें विश्वरूप ईश्वराचेंच वर्णन करीत आहेत, याकरितां ही पदें अत्यन्त महत्त्वाचीं आहेत. यांपैकीं "द्रष्टुं" या पदाचा अर्थ ईश्वरास पाहणें, असाच आहे, यांत संशय नाहीं. उपनिषदांतही असेंच म्हटलें आहे—

आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यः।

(बृ. उ.)

'आत्म्यास पहावें, त्याचें वर्णन ऐकावें, आणि त्याचें मनन करावें' या उपनिषद्वाक्यांत "द्रष्टव्यः" या पदावरून आत्म्यास पाहणें शक्य आहे, हें स्पष्ट होतें. विश्वरूपानें विलसत असलेला आत्माच पाहिला जाणें शक्य आहे म्हणून वरील उपनिषद्वाक्यांतही विश्वरूप ईश्वराचेंच वर्णन आहे. याप्रमाणें ईश्वर विश्वरूप आहे, हा गीतेचा सिद्धान्त मानल्यावरच त्याच्याशीं आपला अनन्य संबंध आहे, हें जाणणें शक्य होतें. म्हणून प्रथम या अनन्य भावाविषयींच विचार करून तो चांगला समजावून घेतला पाहिजे. कारण हेंच गीतेचें वैशिष्ट्य आहे व तो वेदोपनिषदांचा मुख्य सिद्धांत आहे.

या अनन्यभावाचें वर्णन करण्याकरितां आपण एक दोन उदाहरणें घेऊं या. जीव हा पाण्याचा थेंब असून विश्वरूप परमेश्वर हा महासागर आहे. त्या थेंबानें महासागरांत कोठेंही प्रवास केला, तरी तो नेहमीं त्या महासागराशीं अभिन्न राहील. 'मी या महासागराचा अंश असून सागर हें माझें पूर्णरूप आहे.' हा भाव त्याच्यांत नेहमीं जागृत राहील, व 'माझा त्याच्याशीं अनन्य संबंध आहे,' हेंही तो कधींही विसरणार नाहीं. यालाच अनन्य भाव म्हणतात. महासागराशीं पाण्याच्या थेंबाचा जो संबंध, तोच आपला परमेश्वराशीं आहे. "जीव हा ईश्वराचा अंश आहे." या वचनानें गीतेला नेमकी हीच वस्तुस्थिति सांगावयाची आहे.

विश्वांत व्यापून असणाऱ्या वायूचाच अंश आमचा प्राण आहे, आणि तो श्वासोच्छ्वासाचें कार्य करीत आहे हा प्राण बाहेरील वायूशीं अनन्य आणि अभिन्न आहे. असाच अनन्यभाव जाणण्याचा अभ्यास विश्वाकडे पाहून विवेकानें करीत जावा.

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे अनुक्रमें ईश्वराचें मुख, हात, उदर व पाय आहेत. यांचा परस्परांशीं संबंध कसा असावा, या प्रश्नाचें उत्तर या विचारसरणींत मिळतें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अथवा ज्ञानी, शूर, व्यापारी, आणि कारागीर यांनीं परस्परांस आपणाहून वेगळें समजू नये त्यांनीं या चारी वर्णांत अनन्यभाव पहावा, व त्याप्रमाणें आपला व्यवहार करावा अनन्यभाव हा अभेद्य संघटनेचा दर्शक आहे

आपल्या शरीरांत डोकें, हात, पोट आणि पाय आहेत. वरवर जरी हे अवयव वेगळे दिसले तरी ते शरीराशीं अभिन्न अथवा शरीररूप आहेत जोंपर्यंत हे सुरक्षित आहेत, तोंपर्यंतच शरीराचें अस्तित्व आहे हे जेव्हां वेगळे होतील, किंवा वेगळेपणानें वागू लागतील, त्या क्षणीं शरीराचा नाश होईल

हेंच राष्ट्रासंबंधानेंही सत्य आहे जोंपर्यंत राष्ट्रांतील ज्ञानी, शूर, शेतकरी आणि कारागीर हे अनन्यभावानें संघटित अवस्थेंत राहतील, तोंपर्यंतच राष्ट्राचें बळ वाढत जाईल. ज्या क्षणीं यांच्यांतील अनन्यभाव नष्ट होईल, आणि प्रत्येक वर्ग आपणास वेगळें समजू लागेल, त्या क्षणीं राष्ट्राच्या अधःपाताला प्रारंभ होईल

जेव्हां राष्ट्रांत अनन्यभाव घटतो, तेव्हांच परकीय शत्रूचें आक्रमण होतें जर शत्रूचा पराभव करणें असेल, तर अनन्य भावच वाढविला पाहिजे, किंवा तो सुप्त असलेला अनन्यभाव जागविला तरी पाहिजे अशाप्रकारें अनन्य भक्ति ही राष्ट्रीय जीवनांत परिणत होत असते

मानवांचे सर्वच व्यवहार अशा अनन्य भावानें व्हावेत, हा गीतेचा संदेश आहे शिवाय आणखी:—

## ११ नित्ययुक्त योगी

अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।
तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥१४॥
(गी ८)

'ज्याचें चित्त अनन्य भावानें युक्त आहे व जो अनन्य भावानें नेहमीं मज ईश्वराचें स्मरण-किंवा ईश्वराची सेवा-करितो, त्या नित्ययुक्त योग्याला मी सुलभतेनें प्राप्त होतों.'

जो परमात्म्याशीं सर्वदा संयुक्त असल्याचें जाणत असतो, कधींही ईश्वराहून विभक्त होत नाहीं आणि आपलें कर्तव्य अनन्यभावानें करतो, तो नित्ययुक्त योगी होय. कोणालाही विश्वरूप परमेश्वराशींच नेहमीं संयुक्त राहणें शक्य आहे विश्व रूपाशीं विभक्त होणें शक्यच नाहीं. मनुष्याचा सर्व व्यवहार हा नेहमीं विश्वरूपाशींच होत असतो. तो व्यवहार नेहमीं ईश्वराशीं करण्याच्या बुद्धीनें जाणून करावा, हेंच येथें मुख्य तत्त्व आहे. अशा योग्याला कधींही कोणाचेंही भय नसतें.

पूर्वीच्या श्लोकांत " नित्य-अभि-युक्त " पद आहे, व या श्लोकांत " नित्य-युक्त " पद आहे. या दोन्ही पदांचा आशय एकच आहे, आणि याचा अनन्य भावाशीं घनिष्ठ संबंध आहे. नित्ययुक्तासंबंधीं खालील श्लोक पहाण्यासारखे आहेत —

तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते।
प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थं अहं स च मम प्रियः॥१७॥
उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम्।
आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम्॥१८
वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः॥१९॥
(गी. अ. ७)

" या सर्वांत ज्ञानी हा नित्ययुक्त असतो. तोच एकभक्तही असतो. ज्ञानी हाच माझा आत्मा आहे, आणि तोच युक्तात्मा आहे. कारण हें सर्व विश्व वासुदेव आहे, असा अनुभव त्यालाच येत असतो. "

" जो सर्व विश्वाला परमेश्वर मानतो " त्यालाच येथें ज्ञानी म्हटलें आहे. हेंच ज्ञान्याचें प्रधान लक्षण आहे. " हें सर्व वासुदेवरूप आहे, " असें ओळखणें, हेंच खरें ज्ञान होय. तो ज्ञानी या संपूर्ण विश्वाला परमेश्वराचें रूप मानतो,

सत ला त्या रुपात पहतो आणि सत विश्वरूप परमात्म्याशीं अनन्य होतो, हाच नित्ययुक्त, नित्याभियुक्त आणि युक्तात्मा होऊ शकतो कारण याला परमेश्वराहून वेगळी अशी कोणतीही वस्तु उरलेली नसते ज्या कोणाशीं त्याचा सबध येतो, तो ईश्वररूपच असल्यामुळें त्याचा ईश्वराशीं नित्य संबंध असतो म्हणून त्याची नित्ययुक्त अवस्था ही अगदीं सहज घडणारी स्थिति आहे, हेंच गीतेंत पुढील श्लोकांच्या द्वारें सांगितलें आहे—

> महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।
> भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥१३॥
> सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः ।
> नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते॥१४॥
> ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते ।
> एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम्॥१५॥
>
> (गी ९)

'दैवी प्रकृतीचा आश्रय करून, अनन्यमन होऊन ते माझी उपासना करतात, माझा सेवा करतात, सर्वदा माझेंच वर्णन करतात आणि दृढव्रती होऊन ते यत्नपूर्वक माझीच सेवा करतात हे नित्ययोगी होत एकत्वानें अथवा पृथक्त्वानें ते विश्वरूप परमेश्वराचीच भक्ति किंवा सेवा करतात।'

या ठिकाणी परमेश्वरास 'विश्वतोमुख' म्हटलें आहे सगळीकडे ज्याचीं अनन्त मुखें आहेत, असा हा सर्व प्राण्यांच्या समष्टिरूपानें विलसणारा विश्वरूप परमेश्वरच आहे आणि हाच सर्वदा सेवा करण्यास योग्य आहे मानव प्राणी, गाई इत्यादि पशु या सर्व प्राण्याचीं मुखें हीं त्या विश्वतोमुख परमेश्वराचीं सगळीकडे पसरलेलीं मुखें आहेत, हींच सेवा करण्यास योग्य आहेत नित्ययुक्त, युक्तात्मा व नित्याभियुक्त होऊन ज्या परमेश्वराची सेवा करावयाची, तोच हा विश्वरूपप्रभु विश्वतो मुख झाला आहे याचें दर्शन करावें, याचीच सेवाही करावी

## १२. अनन्ययोग

गीतेंत सांगितलेला अनन्ययोग सिद्ध करण्याची हीच रीत आहे. याविषयीं खालीं दिलेले श्लोक लक्षांत ठेवण्यासारखे आहेत—

मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।

(गी. १३।११)

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥
ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।
अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥ ६ ॥
तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।
भवामि न चिरात् पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥७॥
मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।
निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥८॥

(गी. १२)

'ईश्वराची अनन्य योगानें व्यभिचाररहित भक्ति केली पाहिजे.' अनन्ययोगानेंच खरी व्यभिचाररहित भक्ति होऊं शकेल, कारण जेथें दुसऱ्या उपास्याची कल्पना होणें शक्य असेल, तेथेंच पहिलें उपास्य बाजूला ठेऊन दुसऱ्या उपास्याची उपासना करणें शक्य आहे; पण जेथें एकच विश्वरूप ईश्वर मानला असेल, तेथें त्यास सोडून दुसऱ्या उपास्याची उपासना कशी बरें संभवूं शकेल? म्हणून विश्वरूप ईश्वराचा स्वीकार हेंच एक अव्यभिचारिणी भक्ति आणि अनन्य योग साध्य होण्याचें मुख्य साधन आहे. आणखी म्हटलें आहे तें पहा—

'जे भक्त मज ईश्वरांत सर्व कर्में समर्पण करतात आणि ध्यानाच्या द्वारें अनन्य होऊन माझी उपासना करतात, त्यांचा मी उद्धार करतों मज ईश्वरांत तूं आपलें मन लाव. माझ्यांत बुद्धीचा प्रवेश कर व मग तूं माझ्यांतच राहशील, यांत शंका नाहीं'

या ठिकाणींही सर्व कर्में ईश्वरातच समर्पण करावयाचीं आहेत, हें येथें लक्षात घेण्याजोगें आहे. विश्वरूप ईश्वरांतच सर्व कर्मांचें समर्पण शक्य आहे. कारण मनुष्याचीं सर्व कर्में हीं विश्वाशीच होत असतात. विश्वाशीं संबंध नसलेलें असें एकही कर्म असूं शकत नाहीं, त्यामुळें विश्वरूप ईश्वराची कल्पना मानल्यावरच आपल्या सर्व कर्मांचा संबंध प्रत्यक्ष ईश्वराशीं येणें शक्य आहे. "मयि निवासि-ष्यसि" अर्थात् 'मज ईश्वरांत राहणें "हेंही विश्वरूप ईश्वरांतच शक्य आहे. याप्रमाणें विश्वरूप ईश्वराचा स्वीकार केल्यानें **अनन्य योग, अव्यभिचारिणी भक्ति; ईश्वरांत संपूर्ण कर्मांचें समर्पण, ईश्वरांत मन आणि बुद्धि ठेवणें,** आणि **ईश्वरांत निवास करणें**' हें सर्व सिद्ध होईल. शिवाय—

**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।**
**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन् ॥८॥**

(गी. ८)

' अभ्यासयोगानें युक्त झालेल्या अनन्यगामी चित्तानें चिन्तन केल्यानें भक्त परम दिव्य अशा पुरुषास प्राप्त होतो. येथें ज्याचें अनन्यगामी मन झालें आहे, जेथें अनेक आकर्षक उपास्य देवतांची कल्पना केली असेल, तेथें एकामध्यें मन लावून दुसऱ्यांकडे न पाहणें, हें शक्य होणार नाहीं. मन हें अत्यन्त चंचल असल्यानें केव्हां एका विषयावरून दुसऱ्यावर जाऊन बसेल, हें सांगता येत नाहीं. म्हणून भिन्न देवताच्या आकर्षणानें मन एकावरच स्थिर राहील हें संभवत नाहीं पण जर विश्वरूप ईश्वर आहे असा सिद्धांत मानला, तर मग विश्वात कोठेंही मग भटकलें, तरी तें विश्वरूपातच राहील, आणि त्याला अन्यत्र पळणें शक्य होणार नाहीं व तें सहजच अनन्य होऊं शकेल

थंडीत उष्णता बरी वाटणें आणि उन्हाळ्यात थंड पाणी आवडणें हें अगदीं सहज आहे. पण विश्वरूप ईश्वराचा स्वीकार केल्यावर उष्णता आणि थंड पाणी हीं दोन्हीं ईश्वराचींच स्वरूपें असल्यामुळें त्यापैकीं कोणतेंही आवडो, ती आवड ईश्वराची आवड होईल आणि इकडे तिकडे भटकण्याचा दोष मनाला

लावण्याचें कारण राहणार नाहीं. तें कोठेंहि गेलें तरी एका ईश्वरस्वरूपातच स्थित राहील याप्रमाणें विश्वरूप ईश्वरांतच " **चित्ताचें अनन्यगामित्व आणि अव्यभिचारिणी भक्ति** " यांची शक्यता आहे. दुसऱ्या कोणत्याही उपायानें हें शक्य होणार नाहीं अशा साधकाला नेहमीच परम पुरुष अर्थात् परमात्मा प्राप्त असतो, हा साधक नेहमीं त्याचें एक अंग होऊन राहात असतो अर्थात् *स्वतः परमपुरुष होण्याची सिद्धि त्याला यावेळीं प्राप्त असते* कोणत्याही दुसऱ्या साधनानें हें शक्य होणें नाहीं यांचें फल केवढें मोठें मिळतें, तें पहाण्या सारखें आहे—

> अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।
> साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥३०॥
> क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।
> कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥३१॥
> मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।
> स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥३२॥
> किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ॥ ३३ ॥
>
> (गीता ९)

" *दुराचारी मनुष्यही जर अनन्य होऊन भक्ति करील,* तर तो साधु बनेल कारण तो योग्य मार्गावर आलेला असतो. म्हणून तो धर्मात्मा होईल आणि त्यास शाश्वत शान्ति मिळेल. परमेश्वराचा अनन्य भक्त कधींही नष्ट होत नाहीं. स्त्रिया, पापी, शूद्र हेही अनन्य भक्तीनें श्रेष्ठ स्थितीला प्राप्त होतील मग ब्राह्मण, क्षत्रिय आणि श्रेष्ठ राजर्षि उन्नत होतील, याविषयीं कां बरें संशय *बाळगावा ?* "

अनन्यभावानें भक्ति केल्याचें हें महान् फल आहे. मनुष्य दुराचारी आणि भांडण करणारा कां होतो ? द्वैतभावानें व्यवहार चालू झाला, म्हणजे " *हा मजहून वेगळा आहे. म्हणून त्याला लुटावें. त्याच्याशीं भांडावें त्याला लुटलें तर* माझें कांहीं बिघडणार नाहीं, " असे दुष्ट विचार मनुष्याच्या मनांत प्रबल

होऊन वाढू लागतात, आणि त्यामुळेच मनुष्य दुष्ट बनतो. द्वैत, द्वन्द्व, अन्यभाव यांच्यामुळेच मनुष्यांत दुष्टता निर्माण होते आणि वाढते. याचा उपाय अनन्यभावात स्थिर होणें हाच होय जर अन्यभावच नष्ट होईल तर मग कोण, कोणाशीं, कां लढेल? लढाई, भांडणें, स्पर्धा हे सगळे रोग बरे करणारा वैद्य एक अनन्यभावच आहे हा अनन्यभाव मानवी व्यवहारात कोणत्या मर्यादेपर्यंत येऊं शकतो, या विषयीं खालील दोन श्लोक पहाण्यासारखे आहेत—

ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।
ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥२८॥
(गी. ४)

अहं क्रतुरहं यज्ञ स्वधाहमहमौषधम् ।
मन्त्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥१६॥
(गी. ९)

"अर्पण, हवि, अग्नि, आहुति, हें सर्व ब्रह्मच आहे ज्याला ही प्रतीति येते, तो ब्रह्मच होतो." आणि "क्रतु, यज्ञ, स्वधा, औषधी, मंत्र, घृत, अग्नि आणि आहुति मीच आहें" या ठिकाणीं ब्रम्ह व मी, हीं दोन पदें समानार्थी आहेत. या विश्वांतील प्रत्येक वस्तु ब्रह्म आहे, तेंच ईश्वर आहे आणि मी त्या ईश्वराचा अंश असल्यामुळें तें सर्व मीच आहें. येथें ब्रह्मरूपानें, ईश्वररूपानें अथवा माझ्या रूपानें सर्वत्र समभावच नांदत आहे, सर्वत्र अनन्य-भावाचेंच साम्राज्य आहे.

विश्वरूप ईश्वर मानल्यानें क्रतु, यज्ञ, समिधा, मंत्र, आहुति, यजमान हीं सर्व ईश्वराचींच रूपें झालीं कोणांतही कोणत्याही प्रकारचा भेद राहिला नाहीं. अनन्यभाव हा केवळ यज्ञक्षेत्रांतच पहावयाचा नसून सर्व व्यवहारात अनुभवावयाचा आहे अर्थात् सर्वत्र अनन्यभाव पाहिल्यानें राजा, मंत्री, सेनापति, राजसभा, सदस्य, सैनिक, अधिकारी, सगळे कामगार, सर्व जनता, पशुपक्षी, वृक्ष वनस्पती, स्थावरजंगम, हे सर्व ब्रह्मरूप आहेत, हें सिद्ध झालें न्यायालयांत दोन्ही पक्षकार आणि न्यायाधीश हे ईश्वररूप आहेत.

विद्यार्थी, शिक्षक, परीक्षक हीं ईश्वराचींच रूपें आहेत. रोगी, वैद्य आणि औषधि हीं तिन्हीं ईश्वररूपेंच आहेत याप्रमाणें जेवढें क्षेत्र विस्तृत करणें आवश्यक असेल, तेवढें विचारानें वाढवावें आणि तेथपर्यंत सर्वत्र समभावानें ईश्वरच आहे, याचा अनुभव घ्यावा.

सर्व विश्वच ईश्वराचें रूप आहे आणि विश्वांतून कोणताही पदार्थ सुटलेला नाहीं, हें प्रथम जाणावें व जेवढें वर्णन करायचें असेल तेवढें करीत जावें तें सर्व विश्वरूपाचेंच वर्णन होईल

## १२. अनन्यभावानें व्यवहार

तत्त्वज्ञान हें केवळ विचाराकरितां किंवा चर्चेकरितां असतें, असा अनेक लोकांचा समज आहे. परन्तु गीताशास्त्र हें केवळ चर्चेकरितां सांगितलेलें नाहीं. विवस्वान्, मनु, इक्ष्वाकु आणि दुसरे अनेक राजर्षि हे केवळ चर्चा करण्याकरिता या गीताधर्माचा उपयोग करीत नव्हते, तर ते राज्यकारभाराकडे याचा उपयोग करीत असत. भगवान् श्रीकृष्णांनींही केवळ विचारविनिमयासाठीं हा उपदेश केलेला नाहीं. अर्जुन हा राज्यशासन चालविण्यांत योग्य व्हावा, हाच एक उद्देश या उपदेशामागें होता

राज्यव्यवहार आणि समाजशासन हें अन्यभावानें चालवावें कीं अनन्यभावानें हा प्रश्न आज आमच्यापुढें निर्माण झाला आहे. आजच्या राज्यतंत्राचें सूत्र **'अन्यभाव'** हें आहे. पण गीता असें सांगते कीं, तें सूत्र **'अनन्यभाव,'** हें असलें पाहिजे.

जर अनन्यभावानें राज्यकारभार चालणार असेल, तर आजचे व्यवहाराचे सर्व नियम बदलले पाहिजेत सर्व विधिनियमांतही परिवर्तन केलें पाहिजे. गीतेच्या कथनाप्रमाणें अनन्यभावाच्या शासनानें सर्व लोक सुखी होणार असल्यामुळें हा अनुभव घेऊन पहाण्याजोगा आहे

याचा विचार पुढील लेखांत केला जाईल.



# भागवत राज्यशासन

भगवान् श्रीकृष्णांनी गीतेमध्यें सांगितलेल्या राज्यशासनास 'भागवत राज्यशासन' असें नांव देणें योग्य आहे. भगवद्गीता हा ग्रंथ राज्यशासना-च्या परंपरेतील आहे. यासंबंधीं गीतेचें काय म्हणणें तें पहा—

इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।
विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥१॥
एवं परम्पराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।
स कालेनेह महता योगो नष्टः परन्तप ॥२॥
स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।
भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥३॥ (गी. ४)

"हा योग विवस्वान्, मनु, इक्ष्वाकु आणि अनेक श्रेष्ठ राजर्षि यांस पूर्वी सांगितला होता, तोच योग भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनास या वेळीं सांगितला" श्रीकृष्ण आणि अर्जुन दोघे क्षत्रियच होते. क्षत्रियांहून वेगळा असा या परंपरेंत कोणीही दिसत नाहीं. अर्थात् गीता हें क्षत्रियांच्या राज्यव्यवहाराचें शास्त्र आहे, म्हणूनच तें क्षत्रियांस सांगितलें. या ठिकाणीं या शास्त्राला 'योग' असें म्हटलें आहे.

('योग' शब्दानें गडबडून जाण्याचें कांहीं कारण नाहीं. 'योग' याचा मूळचा अर्थ 'कुशलतेनें केलेली योजना' असा आहे.

## 'योग' शब्दाचे अर्थ

'योग' शब्दाचे भिन्न भिन्न शास्त्रांत भिन्न भिन्न अर्थ होत असतात

१ अध्यात्म शास्त्रांत — योगाचा अर्थ ध्यान, धारणा आहे.
२ वैद्य ,, ,, ,, औषधयोजना आहे.
३ वास्तु ,, ,, ,, दोन वस्तूंना जोडणें आहे.
४ व्यवहार ,, ,, ,, कामधंदा (Business) आहे.

| | | |
|---|---|---|
| ५ इन्द्रजाल शास्त्रांत | योगाचा अर्थ | हस्तलाघव Trick आहे. |
| ६ युद्ध ,, | ,, ,, | युद्धशाहित्याची जुळवणी आहे |
| ७ कर्मयोग ,, | ,, ,, | कुशलतेनें होणारें कर्म आहे |
| ८ ज्योतिष ,, | ,, ,, | ग्रहाची युति आहे. |
| ९ रसायन ,, | ,, ,, | अनेक रसाचें मिश्रण आहे. |
| १० राज्यशासन ,, | ,, ,, | कुशलतापूर्ण शासन-प्रबंध आहे. |

याप्रमाणें अनेक शास्त्रांत योग शब्दाचे निरनिराळे अर्थ आहेत. सध्या योगाचा अर्थ योगशास्त्र, एवढाच लोकांस माहीत आहे. पण ज्या वेळीं आमची संस्कृति जिवन्त होती, त्या वेळीं हा 'योग' शब्द सर्व शास्त्रांत वापरला जात असे व प्रत्येक मनुष्य आपापल्या शास्त्रीय परिभाषेप्रमाणें त्याचा अर्थही समजून घेत असे आज दुर्दैवानें प्रत्येक शब्दाच्या अर्थाविषयीं असाच घोंटाळा झाला आहे, आणि एकच अध्यात्मिक अर्थ प्रत्येक ठिकाणीं घेतला गेल्यामुळें तर अधिकच गोंधळ माजला आहे.

जे लोक योग शब्दाचा विचार करतात, ते अध्यात्मशास्त्रच काय तें विचारात घेतात सध्या गीतेविषयींही असाच प्रचार झाला आहे. गीताशास्त्र राज्यशासना-संबंधीं आवश्यक तो उपदेश करीत आहे, ही गोष्ट पुष्कळांच्या स्मरणांतून नाहींशी झाली आहे आणि त्यामुळें गीताशास्त्र हें क्षत्रिय राजांच्या परंपरेंत प्रचलित होतें, हा विचारही लुप्त झाला आहे गीतेचा प्रत्येक अभ्यासू तिच्याकडे अध्यात्मशास्त्र म्हणूनच मध्यां पहात असतो

या कल्पनेमुळें दुर्दैवानें लोक असें समजूं लागले आहेत कीं, गीता हा पेन्शन घेतल्यावर म्हातारपणीं वाचावयाचा ग्रन्थ आहे. आजही मनुष्य आतां मरणार, अशा वेळीं गीतेचा पाठ सुरु केला जातो ! जणूं काय गीतेचा आणि इहलोकाचा कांहीं सबन्धच नाहीं !

वास्तविक क्षत्रियांच्या परंपरेंत हजारों वर्षें जीवित आणि जागृत असलेलें असें हें गीता शास्त्र आहे. आध्यात्मिक तत्त्वज्ञानाच्या या आधारशिलेवर आधारलेली राज्यशासनाची ही पद्धति एका विशिष्ट रीतीनें प्राचीन आर्यसमाजांत स्थिर

झाली होती. अनेक श्रेष्ठ राजांचे अनुभव या पद्धतींत गोवले गेले होते, अथवा अनेक राजांनी या पद्धतीप्रमाणें आपला राज्यकारभार चालविला होता. या पद्धतीचें अनुकरण करणाऱ्या राजांपैकीं एकही राजा केवळ अरण्यांत जाऊन तेथें ध्यानधारणेंतच निमग्न असा दिसत नाहीं. हे सगळेच राजे महा प्रतापी व शूर वीर होते. म्हणून आम्हांस असें म्हणावयाचें आहे कीं, गीतेचा विचार याच प्राचीन राजकारणी व्यावहारिक दृष्टीनें झाला पाहिजे. या दृष्टीनें विचार न केल्यामुळें शब्दांचे वास्तविक अर्थही बदलण्याची पाळी सध्यां आली आहे. याविषयीं खालील श्लोक पाहणें मोठें मनोरंजक ठरेल—

## राजांची विद्या

राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।
प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥
अश्रद्दधानाः पुरुषाः धर्मस्यास्य परन्तप ।
अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥ ( गी० ९ )

'हें गीताशास्त्र राजांची ( राज्यकारभार करणारांची ) विद्या आहे. हें गीताशास्त्र राज्याचें ( शासन करण्याचें ) गुह्य ज्ञान आहे. हें ( राज्यशासनशास्त्र ) पवित्र आणि उत्तम आहे. याचें फल प्रत्यक्ष अनुभवांत दिसून येणारें आहे. हा राजांच्या राज्यशासनाचा धर्म आहे. हा सहज आचरतां येण्याजोगा आहे. आणि ( अ-व्ययं ) याप्रमाणें व्यवहार करण्यासाठीं फारसा व्ययही करावा लागत नाहीं. जे पुरुष या राष्ट्रधर्मावर श्रद्धा ठेवीत नाहींत, ते माझ्या योग्यतेस प्राप्त न होतां दुःखदायी मार्गांत लागल्यामुळें दुःखाचेच वांटेकरी होतात.'

येथील ' **राजविद्या** ' शब्दाचा अर्थ ' राज्यशासन करण्याची विद्या ' ( Science of administration of Kingdom ) असा आहे. पण आज त्याचा अर्थ "श्रेष्ठ विद्या" असा केला जात आहे. **राजविद्या** या शब्दाचे, king-craft, regel policy, state policy, administration of state, administration of government,

politics, असे अनेक अर्थ कोशात आढळतात.

याचप्रमाणें "राजगुह्य" शब्दाचा अर्थ 'श्रेष्ठ गुह्य' असा सध्यां केला जातो. पण कोशात या शब्दाचे अर्थ Secrets in administration of government, secrets in royal policy, secrets in politics, असे आहेत. म्हणजे राज्य चालवताना उपयोगात आणावयाचे गुप्त संकेत असा याचा अर्थ आहे.

गीतेतील राज्यशासनाचा निर्देश करणाऱ्या पदांचे अर्थ अशा रीतीनें पूर्णपणें बदलले गेले आहेत आणि सध्यां सर्व लोक हे नवीन अर्थच मानूं लागले आहेत. याचें कारण असें कीं, गीतेला राज्यशासनविषयक ग्रन्थ न मानता सध्यां केवळ आध्यात्मिक ग्रन्थच मानलें जात आहे; एवढेंच नव्हे, तर राजकारणाचा अध्यात्माशीं असलेला संबंध सध्यां पूर्णपणें तोडूनही टाकला गेला आहे

वर दिलेल्या गीतावचनातील " राजविद्या " आणि " राजगुह्य " हीं पदें स्पष्टपणें राज्यकारभाराचा निर्देश करणारीं आहेत. हें राज्यशासन गीतेनें सांगितलेलें राज्यशासन आहे. हें ( कर्तुं सुसुखं ) आचरणास सुलभ आहे (Very easy to perform) आणि यात ( अ-व्ययं ) व्ययही फारसा नाहीं, हें कसें सिद्ध होतें तें आपण पुढें पाहूं. जें ' सहज होऊं शकतें ' आणि ज्याकरितां फारसा व्यय करावा लागत नाहीं, तें राज्यशासन सर्वोत्कृष्ट आहे, हें वेगळें कशाला सिद्ध करावयास पाहिजे ?

वरील श्लोकांत असेंही सांगितलें आहे कीं, जे या विधिनियमांवर श्रद्धा ठेवीत नाहींत, ते परम पदास प्राप्त न होतां दुःखें आणि कष्ट भोगीत राहतात.

' सर्वत्र ईश्वर आहे, असें मानून जे सर्व प्राणिमात्रांत त्या ईश्वरस्वरूपातच' पाहतात, सर्वत्र त्याचा अनुभव घेतात, सर्वांचा परस्पराशीं अनन्यसम्बन्ध आहे असें जाणून व अन्य भावास दूर करून अनन्य भावानें व्यवहार करतात, तेच या प्रकारचें राज्यशासन चालवूं शकतात. '

या राज्यशासनात परस्परांत द्वन्द्वभाव नसल्यामुळें स्पर्धा वा संघर्ष होणार

नाहींत, परस्परांशीं अनन्यभावानें, आपुलकीनें सर्वजण वागतील व परस्परांचे साहायक होऊन ते सर्व विश्वसेवा करीत राहतील. थोडक्यांत या राज्यशासनाचें हें स्वरूप आहे. यामुळेंच ह्या राज्यशासनास अधिक व्यय येत नाहीं. कारण यांत कोणीही मनुष्य दुसऱ्यांस लुटण्याची इच्छा न करता त्यांची सेवाच करीत राहतो. म्हणून शान्तीचें संरक्षण करण्याकरितां वेगळी व्यवस्था ठेवण्याची आवश्यकताच येथें नसते. या विषयावर पुढें विस्तारपूर्वक लिहिलें जाणार आहे. म्हणून येथें संक्षेपानें हें नुसतें सुचविलें आहे.

## आध्यात्मिक राज्यशासन

**भागवत राज्यशासनाचेंच** नाव **आध्यात्मिक राज्यशासन** आहे. गीतेला आध्यात्मिक शास्त्र मानावें, या विषयीं आमचाही मतभेद नाहीं पण आपल्या अध्या मशास्त्रांत राज्यशासनाचाही समावेश होत असे, हेंच तत्त्व इथें विशद केलें आहे. आमच्या मतें राज्यशासन हा अध्यात्मशास्त्राचा एक महत्त्वाचा भाग आहे. मध्यां मात्र अध्यात्म आणि राज्यशासन हीं अगदीं भिन्न मानली जात आहेत याविषयींची आमची भूमिका याच लेखांत स्पष्ट होईल. गीता हें अध्यात्मशास्त्र आहे. हें खालील वचनावरून सिद्ध होतें—

> मदनुग्रहाय परमं गुह्य अध्यात्मसंज्ञितम् ।
> यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥
>
> ( गी ११।१ )

अर्जुन म्हणतो – " भगवान् श्रीकृष्णानीं मला जें गुह्य अध्यात्मज्ञान सांगितलें, त्यामुळें माझा मोह नष्ट झाला. " अर्जुनानें हा आपला स्वानुभव सांगितला आहे. या ठिकाणीं अर्जुनास कोणता मोह झाला होता, आणि तो नष्ट होऊन त्याचें *मन कशा प्रकारचें झालें, हें पाहिलें पाहिजे. अर्जुन स्वराज्यप्राप्तीसाठीं युद्ध* करून शत्रूंचा पराभव करण्याकरितां रणभूमीवर आला होता. तेथें त्यास मोह होऊन तो युद्धापासून निवृत्त होऊन, वनात जाऊन तप करण्याची इच्छा करूं लागला. यामुळें एका दृष्टिकोनातून पाहिलें तर अर्जुनाकडून त्याच्या शत्रूंस नकळत साहाय्यच होणार होतें, पण गीतेचें अध्यात्मज्ञान ऐकल्यावर तो शत्रूंचा

नाश करण्यास आणि गीतोक्त राज्यशासन चालविण्यास उद्युक्त झाला. गीतेच्या अध्यात्माचा हा परिणाम लक्षांत ठेवण्याजोगा आहे.

गीतेचा उपदेश ऐकून अर्जुन स्वराज्यप्राप्तीचे प्रयत्न करण्यास सिद्ध झाला, पण सध्यां मात्र लोक गीतेच्या अध्ययनानन्तर स्वराज्यप्राप्तीकरितां प्रयत्न करणें तर दूरच राहिलें, पण संसाराचाही त्याग करूं पाहतात! गीतेच्या अर्थासम्बन्धीं हा केवढा घोंधळ झाला आहे बरें! जें अध्यात्मज्ञान पूर्वी क्षत्रियांकरितांच सांगितलें ज्ञात होतें, तें सध्यां राज्यव्यवहारास निरुपयोगी समजलें जाऊं लागलें आहे! म्हणूनच गीतेची परम्परा ही क्षत्रिय-परम्परा होती, हें जाणूनच तिचा विचार करणें योग्य आहे. असो. वर दिलेल्या वचनावरून गीता आध्यात्मिक ग्रन्थ आहे, हें सिद्ध झालें. आतां अध्यात्माच्या अर्थाविषयीं विचार करूं—

स्वभावोऽध्यात्ममुच्यते । (गी० ८।३)

"अध्यात्म म्हणजे स्व—भाव." स्वभावाचा अर्थ पाहणें आवश्यक आहे. 'भाव' शब्दाचा अर्थ (Being, existing, existence, अर्थात्) अस्तित्व असा आहे. 'स्व' चा अर्थ आपलें, स्वतःचें, यावरून 'स्वभाव' चा अर्थ 'आपलें अस्तित्व, आपली स्थिति, (one's own existence)' स्वभावच अध्यात्म आहे, याचा अर्थ, स्वतःचें अस्तित्व कसें आहे, तें दाखविणारें अध्यात्मशास्त्र, अथवा अध्यात्मशास्त्र म्हणजे आपल्या अस्तित्वाचें शास्त्र, आपल्या जीवनाचें शास्त्र. जीवनामध्यें वैयक्तिक, सामाजिक व राजकीय जीवन येतेंच.

आपल्या अस्तित्वाचें स्वरूप काय आहे, आपलें जीवन कसें होतें, तें कसें होईल, आपलें अस्तित्व स्थायी रूपानें टिकूं कसें शकेल, इत्यादि विचार अध्यात्मशास्त्र करीत असतें. राज्यशासनशास्त्रांतही अध्यात्मशास्त्राप्रमाणेंच आपलें राष्ट्रीय अस्तित्व कसें होतें, सध्यां तें कसें आहे, तें अस्तित्व कायम कसें टिकेल, आपला नाश करणारे शत्रु कोण आहेत, त्यांची शक्ति किती आहे, त्यांचा पराभव करण्याकरितां आम्हांस कोणत्या व्यवस्था कराव्या लागतील, इत्यादि विचार यांमध्यें करावा लागतो.

अध्यात्मशास्त्र हें व्यक्तिगत आत्म्याचा विचार करतें, हें तर सुप्रसिद्धच आहे. त्याच्या क्षेत्रांत व्यक्तिगत आत्मा, बुद्धि, चित्त, अहंकार, इन्द्रिय आणि शरीर येतेंच, पण सर्वव्यापक समष्टीच्या आत्म्याचाही विचार यांत येत असतो, हें पुष्कळ लोक विसरतात. अनेक व्यक्ति मिळून राष्ट्र होतें म्हणून वैयक्तिक गुणांचा सामुदायिक विस्तार म्हणजेच राष्ट्रविचार हें म्हणणें स्वाभाविकच आहे. जे नियम व्यक्तीच्या अस्तित्वामध्यें लागू असतात, तेच थोड्या फार विस्तारानें राष्ट्रामध्येंही लागू होतात. अनेक व्यक्ति मिळूनच राष्ट्र बनत असल्यामुळें व्यक्तींतून विकसित झालेले सामुदायिक नियम म्हणजेच राष्ट्राचे नियम होत.

याप्रमाणें अध्यात्माचे नियमच व्यक्ति आणि राष्ट्र यांत समान रीतीनें अनुभवास येणें स्वाभाविक आहे. गीतेंत म्हटलें आहे–

अध्यात्मविद्या विद्यानाम् । (गी० १०।३२)

"सर्व विद्यांत अध्यात्मविद्या हें ईश्वराचें स्वरूप आहे." अर्थात् हीच विद्या मुख्य आहे हीं सर्व विद्यांची आधारशिला आहे. म्हणून राज्यशासन विद्येचे मूल सिद्धान्तही या अध्यात्मविद्येंत असणें अगदीं स्वाभाविकच आहे

## व्यक्ति आणि राष्ट्र

आतां व्यक्ति आणि राष्ट्र यांविषयीं विचार केला पाहिजे. अनेक व्यक्तींचें मिळून राष्ट्र होतें. मातीचा घट तयार झाल्यावरही ज्याप्रमाणें त्यात मातीचे गुणधर्म असतात, सोन्याचे अलंकार घडल्यानतरदेखील त्यांतून ज्याप्रमाणें सोनेंपण नाहींसें होत नाहीं, त्याप्रमाणें व्यक्तिसमूहापासून निर्माण झालेल्या राष्ट्रांतही व्यक्तीचे गुणधर्म असणें अगदीं शक्य आहे यांविषयीं पुढील कोष्टक पहा—

| व्यक्तींत | राष्ट्रांत |
|---|---|
| गुण | गुणीजन |
| ज्ञानशक्ति | ज्ञानी ( ब्राह्मण ) |
| शौर्यशक्ति | शूर ( क्षत्रिय ) |
| धनसंग्रहशक्ति | व्यापारी ( वैश्य ) |

| कर्मशक्ति | कर्मचारी (शूद्र) |
|---|---|
| अज्ञान | असंस्कृत ( निषाद ) |

व्यक्तींतील वैयक्तिक गुणच केंद्रित होऊन राष्ट्रांत शक्तियुक्त पुरुष झाले आहेत. व्यक्तींमध्यें असणारी शक्तीच त्यांच्यांत परम उत्कर्षास पोंचली आहे. व्यक्तींत ज्ञान-गुण अथवा ज्ञान-शक्ति होती, तीच राष्ट्रांत ज्ञानीजन अर्थात् ब्राह्मण वर्ण्यरूपानें व्यक्त झाली. व्यक्तींत शौर्य होतें व तें या व्यक्तीचें संरक्षण करीत असे तोच शौर्यगुण उत्कर्षास पोंचून त्याचा क्षत्रिय झाला व तो राष्ट्राचें रक्षण करूं लागला. मनुष्यांत धन-लालसा अथवा भोगेच्छा आहे, म्हणून तो आपल्याजवळ भोग्य पदार्थ एकत्रित करीत असतो हा गुण ज्यांच्यांत वृद्धि पावला त्यांना वैश्य हें नाव मिळालें. हे वैश्य राष्ट्रांत धनधान्य एकत्र करून त्याचा सर्वत्र प्रसार करतात. व्यक्तींत कर्म करणें, हा गुण आहे, ज्यांच्यांत कर्माच्या कौशल्याची वृद्धि झाली, ते कर्मकुशल शूद्र झाले. याप्रमाणें व्यक्तींत जे ज्ञान-शौर्य-भोगवृद्धि-कर्मकुशलता हे गुण होते, तेच गुण राष्ट्रांत ज्ञानी, शूर, व्यापारी व कामगार अथवा ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या नांवानीं उत्कर्षास पावले गुण तेच, पण ते व्यक्तींत गुणरूपानें दिसतात व राष्ट्रांत गुणीजनांच्या रूपानें दिसतात त्यांनाच वर्ण, धर्म, अथवा जाति असें नाव दिलेलें आढळतें

ज्ञान-शौर्य-भोगलालसा-कर्मचातुर्य हे गुण न्यूनाधिक प्रमाणानें प्रत्येक व्यक्तींत असतातच हे संस्कारांनीं पुढें विकसित होतात, म्हणून 'असंस्कार,' हाही एक पांचवा गुण व्यक्तींत स्वभावतःच असतो. ब्राह्मण जरी ज्ञानगुणानें युक्त असला, तरी तो क्षत्रियाच्या शौर्यगुणानें उणा असेल. यचप्रमाणें असंस्कार हा गुण प्रत्येक व्यक्तींत कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत असतोच तात्पर्य राष्ट्रांतील जनतेवर कितीही संस्कार केले, तरी कोणत्या तरी अंगांत ती जनता असंस्कृत राहणारच.

याप्रमाणें व्यक्तींत ज्ञान, शौर्य, भोगलालसा, कर्मचातुर्य व असंस्कार (अज्ञान) हे धर्म गुणरूपानें रहणें स्वाभाविक आहे राष्ट्रांतही ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य,

शूद्र व निषाद हे राहणारच. प्रारम्भीचे चार वर्णाचे नागरिक शुभ संस्कारांनी युक्त असतील. यांना वर्गीकृत ( classified) म्हणतात, व पाचव्यास अवर्गीकृत ( unclassified ) म्हणतात.

प्रत्येक राष्ट्रांत असें होणें अगदी स्वाभाविक आहे. या विवरणानें हें स्पष्ट झालें कीं, ज्ञान-शौर्य- भोगलालसा-कर्मचातुर्य यांमुळे जे उन्नतीचे अथवा अवनतीचे नियम व्यक्तीला लागू असतात, तेच राष्ट्रासही लागू आहेत. व्यक्तीचें प्रमाण लहान आणि राष्ट्राचें मोठें, इतकाच काय तो भेद असेल. अध्यात्मशास्त्र हें केवळ व्यक्तीचाच विचार करतें, असा ज्यांचा आग्रह असेल, त्यांना अशा प्रकारच्या मतात परिवर्तन करून हें मान्य करावें लागेल कीं, अध्यात्मशास्त्राचे नियम व्यक्तीला तर लागू पडतातच, पण तेच नियम विस्तृत प्रमाणात समाज आणि राष्ट्र यांनाही लागू पडतात कारण व्यक्तीचे गुणच राष्ट्रांत मोठ्या प्रमाणात विकसित होऊन वर्ग बनत असतात म्हणून अध्यात्मविद्या ही सर्व विद्यांची आधारशिला आहे, हें सत्य आहे. व याच कारणानें व्यक्तीमध्यें आत्मशासन दर्शविणारी व राष्ट्रामध्यें किंवा व्यक्तिसमूहांमध्यें राज्यशासन विद्याही तीच आहे.

या विवेचनावरून आपण असें पाहिलें कीं व्यक्ति आणि राष्ट्र यांत एकच नियम कार्य करीत आहेत आणि त्यात त्या गुणांचा संकोच आणि विस्तार, याहून कोणतीही भिन्नता नाहीं—



## पुरुष आणि प्रकृति

आतांपर्यंत आपण व्यक्तींतील गुण व राष्ट्रांतील गुणी यांचा परस्पर संबंध पाहिला. आतां अध्यात्मशास्त्रांत ज्या पुरुष आणि प्रकृतीचा विचार मुख्यत्वेंकरून केला जातो, त्यांचा राज्यशासनांत कसा संबंध येतो, याचा विचार करूं. ' पुरुष ' म्हणजे ' आत्मा, ' आणि ' प्रकृति ' म्हणजे त्याची ' शक्ति ' किंवा ' शरीर ', हें सर्वांसच माहीत आहे. आत्मा किंवा पुरुष हा सर्वशक्तिमान् असूनही अकर्ता आहे, स्वतः कांहींही करीत नाहीं, हें पुढील वचनांनीं स्पष्ट होईल.

असंगोऽयं पुरुषः । (बृ० ४।३।१५,१६ )
आत्मा——अकर्ता। (श्वे० १।९ )
विद्धि अकर्तारं अव्ययं। (गी० ४।१३ )
आत्मानं अकर्तारं पश्यति। ( गी० १३।२९ )

'पुरुष संगरहित, अकर्ता आहे,—' ' आत्मा अकर्ता आहे'— अर्थात् आत्मा स्वतः कांहींही करीत नाहीं प्रत्येक कर्म प्रकृतीकडून केलें जातें. सर्व कर्में प्रकृतीच करते. आत्मा हा केवळ द्रष्टा आहे, कर्ता नाहीं. याविषयीं गीता म्हणते,—

प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।
यः पश्यति तथात्मानं अकर्तारं स पश्यति ॥
कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ॥
( गी० १३।२९,२० )

' सर्व कर्में प्रकृतीच करते, सर्व कर्में प्रकृतीच्या द्वारेंच होतात, आणि आत्मा अकर्ता आहे, असें जो पाहतो, तोच सर्व दृष्टींनीं सत्य पाहतो. तसेंच कार्य, कारण आणि कर्तृत्व या सर्वांचें मूल कारण प्रकृतीच आहे. ' याप्रमाणें आत्मा अकर्ता असून प्रकृतीच सर्व कर्में करते, हें गीतेनें प्रतिपादिलें आहे. अत्यंत प्राचीन काळीं कपिल महामुनींनीं आपल्या सांख्यदर्शनांत हाच सिद्धान्त मांडला आहे—

( सां० द० १।१५ )

असङ्गोऽयं पुरुषः

मूलप्रकृतिरविकृतिः महदाद्याः प्रकृति-विकृतयः सप्त ।
षोडशकस्तु विकारो न प्रकृतिर्न विकृतिः पुरुषः ॥३॥

अगुणस्य सतः ॥६०॥ ( सांख्यकारिका )

' मूल प्रकृतीच अनेक विकृतींना ( विशेष प्रकारच्या कृतींना ) निर्माण करून सृष्टि-निर्मितिसंबंधी सर्व कार्य करते. पुरुष अथवा आत्मा हा प्रकृतीही नाही आणि विकृतीही नाही. हा आत्मा अगुण असल्याने काही करीत नाही. प्रकृतीच सर्व करीत असून आत्मा अकर्ता आहे. ' सांख्यशास्त्राने केलेल्या या प्रकृति आणि पुरुषाच्या स्वभाववर्णनाचाच स्वीकार गीतेने केला आहे.

'प्रकृति' या शब्दाचा 'प्रजा' हा अर्थ बहुधा सर्वांसच माहीत असेल प्रकृति शब्दाचे अर्थ कोशांत पुढीलप्रमाणे आढळतात—

प्रकृतयः=King's ministers, a body of ministers or councillors, ministry, the subjects of a king, the constituent elements of a state, the King, the minister, the allies, treasury, army, territory, fortresses and the corporation of citizns=स्वामी-अमात्य- सुहृत्-कोश-राष्ट्र-दुर्ग-बलानि च (मनु०९) तसेच मनुस्मृतीच्या नवव्या अध्यायांतील २९४ व्या श्लोकांत म्हटलें आहे—

स्वाम्यमात्यौ पुरं राष्ट्रं कोशदण्डौ सुहृत्तथा ।
सप्तप्रकृतयो ह्येताः सप्ताङ्गं राज्यमुच्यते ।।

' राजा, मंत्री, नगर, राष्ट्र, कोश, दण्डशासन, सुहृद्, या सातांचें मिळून राज्य होतें.' याचेंच नांव प्रकृति, वरील कोशांतील अर्थातही हाच भाव आहे. मंत्रिमंडळ, दरबार, प्रतिनिधि सभा, राजाचे मंत्री, प्रजाजन, जनता, सेना, कार्यकर्त्यांचे संघ, किल्ले इत्यादि सर्व मिळून राजाची प्रकृति होते सर्व सामान्यरीत्या प्रकृति या शब्दाचा प्रजा असा अर्थ आहे. वर सप्तविध प्रकृतींचें वर्णन केलें आहे. हे प्रकृतीचे भेद सात, नऊ, पचवीस अथवा बहात्तरपर्यंत वाढविले

गेले आहेत. वेगवेगळ्या कार्यव्यवहारामुळें राष्ट्रांत जितकीं कार्यांचीं अंगें असतील, तितके प्रजारूप प्रकृतीचे भेद मानणें योग्यच आहे. वरील विवरणानें पुढील समीकरण सिद्ध झालें.

व्यक्ति <—— अध्यात्म ——> राष्ट्र

| | | |
|---|---|---|
| १ | आत्मा, पुरुष हा अकर्ता | राजा, महाराजा अकर्ता |
| २ | प्रकृति सर्व कार्य करणारी | प्रजा (प्रकृति) कार्यकर्ती |

राष्ट्रांत राजानें स्वतः कांहींही करायचें नसून प्रत्येक कार्य प्रजेकडून प्रजेच्या हिताकरितां, प्रजेच्या प्रतिनिधींच्या द्वारें व्हावयाचें आहे. अध्यात्मांतील हा नियम राष्ट्रांत जशाच्या तसा सुरक्षित दिसत आहे, हें येथें लक्षात ठेवण्याजोगें आहे.

सध्यां कित्येक लोकांचें असें म्हणणें आहे कीं, स्वराज्य-शासनांत (Self-government) प्रजेनें आपल्या हितांचें संवर्धन करण्याकरितां आपल्या प्रतिनिधींच्याद्वारें स्वतःच राज्यशासन करावें, त्यांत राजानें कांहीं विशेष निर्माण करूं नये, त्यानें केवळ द्रष्टा होऊन रहावें. पण हें कितीतरी शतकापूर्वी आमच्या अध्यात्मशास्त्रानें सांगितलें आहे. जे स्वतः निःपक्षपात बुद्धीनें विचार करूं इच्छितात त्यांनीं याचा विचार करावा. प्रकृति आणि पुरुष यांचा जो संबन्ध अध्यात्मशास्त्रांत वर्णिला आहे, तोच संपूर्ण जबाबदारीच्या राज्यशासनांत पूर्णत्वानें प्रकट झाला आहे. असा हा अध्यात्म व राज्यशासन यांचा मेळ आहे.

ऋषि-मुनि 'आत्मा आणि प्रकृति' या मार्गानें सर्वगामी सिद्धान्त बोलत असत. व्यवहार करणारांनीं त्या सिद्धान्तांचा आपल्या संक्षिप्त अथवा विस्तृत कार्यक्षेत्र-प्रमाणें विचार करावा आणि त्यांना आपापल्या लहान मोठ्या व्यवहारांत आणावें. गीतेंत म्हटलें आहे—

> प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ॥
> अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥
>
> (गी० ३।२७)

'प्रकृतीच्या गुणांकडून सर्व कर्में केलीं जातात, अर्थात् प्रकृतीच सर्व

काही करीत असते. आत्मा हा वस्तुतः अकर्ता आहे. परन्तु अहंकारामुळें मूर्ख बनलेला मनुष्य मूर्खपणानें स्वत लाच कर्ता समजतो, ' आणि या मूढपणामुळें फसतो. यावरून हें स्पष्ट झालें कीं, (प्रकृतीनें) प्रजेनेंच आपल्या गुणकर्मांप्रमाणें आपल्या विकासासंबंधीं सर्व कर्में करावींत, (आत्मा, पुरुष, स्वामी) राजानें त्या प्रजेनें केलेल्या कर्मांचें निरीक्षण मात्र करावें, प्रजेचें चातुर्य पाहून सन्तुष्ट व्हावें, पण स्वत. त्या कर्मांत हस्तक्षेप करूं नये. जो मूढ बनून प्रजेच्या कर्मांमध्यें विघ्न आणील, अथवा त्याचा भार स्वत.वर ओढून घेण्याचा यत्न करील, तो बन्धनांत पडेल.

जो राजा सर्व कर्तव्यांचा भार आपल्याच शिरावर घेतो आणि स्वतः कर्मकर्तृत्वाचा अभिमान धारण करतो, तो 'अहंकार-विमूढ-आत्मा' असून आदर्श राजा नव्हे. स्वतः काहीं न करतां जो प्रजेला आपलें राज्यशासन चालविण्याचें पूर्ण स्वातंत्र्य देतो, तोच आदर्श राजा होय. जे अध्यात्म-शास्त्राचे मुख्य सिध्दान्त, तेच स्वराज्यशासनाचेही सर्वोत्कृष्ट सिद्धान्त आहेत. हें येथें वाचकांनीं पहावें.

प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।
विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥
(गी० १३।१९)

' प्रकृति आणि पुरुष हे दोन्ही अनादि आहेत. प्रकृतीपासूनच त्रिगुण आणि त्याच्यामुळें नाना प्रकारचे विकार होतात या विकारापासून सर्व सृष्टीची उत्पत्ति होते.' याप्रमाणें सगळें कार्य प्रकृतीकडूनच होतें पुरुष किंवा आत्मा हा प्रकृतीचा अधिष्ठाता अथवा अध्यक्ष आहे. त्याच्या अध्यक्षत्वाखालीं प्रकृति सर्व कार्य करते. आत्मा स्वतः काहीं न करता प्रकृतीचें सर्व कौशल्य पाहत असतो. याचप्रमाणें पुढील वचनेंही पाहण्यासारखीं आहेत-

प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः ।
भूतग्राममिमं कृत्स्नं अवशं प्रकृतेर्वशात् ॥८॥

न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय ।
उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥९॥
मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।
हेतुनानेन कौन्तेय जगद्विपरिवर्तते ॥१०॥ (गी० ९)

" मी प्रकृतीचा अधिष्ठाता असून, तिच्या स्वाधीन होऊन सर्व प्राणिमात्रांस वारंवार उत्पन्न करतों. मी त्या कर्माविषयीं उदासीन असल्यामुळें अर्थात् तीं सर्व कर्मे प्रकृतीकडून होत असल्यामुळें मला तीं बन्धनकारक होत नाहींत. माझ्या अध्यक्षत्वाखालीं ही माझी प्रकृति चराचर विश्व निर्माण करते, आणि यामुळें हें जगताचें चक्र सारखें फिरत असतें "

*आत्मा हा प्रकृतीचा अधिष्ठाता अथवा अध्यक्ष आहे. सभेच्या कामाचें निरीक्षण करणें, हें अध्यक्षाचें काम असतें.* अध्यक्ष हा दोन विवाद करणाऱ्या पक्षांपैकीं एकाचाही पक्ष घेत नाहीं. कोहींमुद्धा नियमबाह्य वर्तन होऊं न देणें एवढेंच अध्यक्षाचें काम असतें. एवढें झालें म्हणजे त्यानें केवळ निरीक्षक म्हणूनच तेथें रहावयाचें असतें. फार झालें तर त्यानें सभेचा निर्णय प्रकट करावा. याचप्रमाणें राजानें राज्यशासनांतील राजसभेचें काम केवळ साक्षी बनून पहावें, त्यांत कसलाही हस्तक्षेप करूं नये, तर केवळ अध्यक्ष किंवा निरीक्षक म्हणूनच रहावें. अध्यक्ष याचा अर्थ ( अधि-अक्ष ) आपल्या दृष्टीनें चालू कार्यावर लक्ष ठेवणारा, असा आहे. राजाचेंही एवढेंच कार्य आहे. त्यानें राजसभेनें केलेल्या कामावर *केवळ स्वाक्षरी करावी, अन्य राज्यशासनाचें सर्व दायित्व प्रजेकडे* अर्थात् प्रजेच्या प्रतिनिधींकडेच असावें.

या ठिकाणीं प्रकृतीचे सत्त्व, रज आणि तम हे तीन गुणच सर्व कार्य करतात, असें म्हटलें आहे. ( गीता ३।२७, १३।१९ ) त्याचप्रमाणें राष्ट्रांतही तीन गुणच अर्थात् तीन गुणधारी लोकच सर्व कार्य करीत असतात. पहा—

अध्यात्म

| व्यक्ति | राष्ट्र (व्यक्तिसमूह) |
|---|---|
| पुरुष, आत्मा | स्वामी, राजा, अध्यक्ष |

| प्रकृति, शक्ति | प्रजा, जनता, शक्ति |
|---|---|
| गुणत्रयविलास | गुणत्रयविलास |
| (१) सत्त्व | (१) ज्ञानी (ब्राह्मण) |
| (२) सत्त्व+रजस् | (२) शूर (क्षत्रिय) |
| (३) रजः+तमस् | (३) व्यापारी (वैश्य) |
| (४) तमस् | (४) कर्मचारी (शूद्र) |

प्रकृतीचे तीन गुण असल्यामुळें मनुष्याचे चार वर्ण झाले आहेत. एखादी काठी तीन जागीं तोडली, तर तिचे चार तुकडे होतात. याप्रमाणें या तीन गुणांमुळेंच मानवसमाजाचे चार वर्ण झाले आहेत. सत्त्वापासून ब्राह्मण, तमोगुणापासून शूद्र, सत्त्वाशीं जवळ असलेल्या रजोगुणापासून क्षत्रिय आणि तमोगुणमिश्रित रजोगुणापासून वैश्य, असे हे चार वर्ण झाले आहेत; आणि हे चार वर्णच राष्ट्रातील सर्व प्रकारचीं कामें करीत असतात. या उदाहरणावरून आध्यात्मिक सिद्धान्त हे व्यक्तिव्यवहारांत व राष्ट्रव्यवहारांत कसें कार्य करतात तें समजेल.

## अध्यात्म, अधिभूत, अधिदैवत

गीतेंत वारंवार ' गुह्यं अध्यात्मसंज्ञितं । ' ' गुह्य अध्यात्मज्ञान सांगतों, ' असें म्हटलें आहे. या गुह्याविषयीं विचार करणें आता आवश्यक आहे. गीतेंत अथवा बहुतेक सर्व धार्मिक ग्रन्थांत एक तर अध्यात्माचा अथवा आधिदैवताचा विचार केलेला असतो. मधील अधिभूताविषयीं लिखाण क्वचित् आढळतें. आपण येथें ज्या मानवधर्माचा विचार करूं इच्छितों, तो अधिभूतविषयक आहे. हा विचार कोठेंही स्पष्टपणें जरी दर्शविला गेला नसला, तरी तो अध्यात्म आणि अधि दैवत यांच्या अनुषंगानें जाणून घ्यावयाचा असतो, त्याचा जाणण्याची रीत खाली दिली आहे.

( १ ) **अध्यात्मज्ञान**– व्यक्तीच्या अन्तर्गत , शक्तीचें ज्ञान, आत्मा, बुद्धि, इत्यादि इन्द्रियें व शरीर या विषयींचें ज्ञान.

( २ ) **आधिभूतज्ञान**– याचे दोन प्रकार— ( १ ) प्राण्यांच्या संबन्धींचें

ज्ञान, मनुष्याच्या व्यवहाराचें ज्ञान, ( २ ) पंचमहाभूताचें ज्ञान. उपनिषदें आणि गीता, यात अधिभूत हें पद दोन्ही अर्थांनीं प्रयुक्त होतें. पण आम्हास मानवधर्माचा निर्णय करणें असल्यामुळें पहिलाच अर्थ येथें अवश्य घेणार आहों.

( ३ ) अधिदैवत ज्ञान— इन्द्र, अग्नि, वायु, सूर्य इत्यादि देवतांच्या संबंधींचें ज्ञान, विश्वाचें ज्ञान.

आध्यात्मांत व्यक्तीच्या अन्तर्गत शक्तींचें ज्ञान, अधिभूतांत प्राणिसमष्टि, विशेषतः मानवसमष्टीचें ज्ञान, आणि अधिदैवतांत दैवी शक्तींचें ज्ञान समाविष्ट होतें. याप्रमाणें या तीन ज्ञानाच्या द्वारें संपूर्ण विश्वाचें यथार्थ ज्ञान होतें. याविषयीं ऋषिमुनींनीं आपल्या प्रज्ञेनें कांहीं सामान्य नियम ठरविले आहेत. मानव धर्माचा विचार करतांना ते लक्षांत घेणें अत्यंत आवश्यक आहे.

## पिण्ड—ब्रह्माण्डाची एकता

पिण्डांत आणि ब्रह्माण्डांत एकच नियम कार्य करीत आहेत, आणि तात्त्विक दृष्टीनें पिण्डब्रह्माण्डाची एकताही आहे. जें ब्रह्माण्डांत आहे, तेंच सूक्ष्म रूपानें पिण्डांत आहे, आणि जें पिण्डांत आहे, तेंच विस्तारशः ब्रह्माण्डांत आहे, हें जाणणें अत्यावश्यक आहे बाहेरील विश्वांत असणारीं पञ्चमहाभूतेंच अल्पांशानें पिण्डांत आहेत. अस्थिरूपानें पृथ्वी, रक्तरूपानें जल, उष्णतेच्या रूपानें अग्नि, प्राणाच्या रूपांत वायु, आणि अवकाशरूपानें आकाश या शरिरांत वास्तव्य करून आहे, हें सर्वांस विदितच आहे. विश्वांतील पञ्चतत्त्वेंच शरिरांत सूक्ष्मरूपानें आहेत, म्हणून, दोन्ही ठिकाणीं या पञ्चतत्त्वाचे नैसर्गिक स्वभाव एकच असल्यामुळें दोन्हीकडे नियमही सारखेच आहेत.

प्राणी हा विश्वाचा एक अंश असल्यामुळें विश्वांतील सर्व तत्त्वें यांत आहेत. जशीं विश्वांतील पञ्चमहाभूतें शरिरांत आहेत, त्याचप्रमाणें विश्वांतील प्रकृतिपुरुषही त्यांत आहेतच. जीवशरीर हें विश्वव्यापक प्रकृतिपुरुषाचा, परमेश्वराचा एक लहानसा अंश आहे, म्हणूनच पिण्ड-ब्रह्माण्डाचे नियमही एकच आहेत. भेद इतकाच कीं, ब्रह्माण्ड अति विस्तृत असून पिण्ड अत्यंत

लहान आहे हें ज्ञान होण्यासाठींच गीतेंत नवधा प्रकृतीचें वर्णन पुढें दिल्याप्रमाणें केलें आहे.—

> भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।
> अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥
> अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।
> जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥
> (गी० ७)

'पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धि, अहंकार आणि जीव ही अशी परमेश्वराची नवविधा प्रकृति आहे.' ईश्वराचें नांव पुरुष असून तो अकर्ता आहे जें कांहीं कार्य होतें, तें सगळें नवविध प्रकृतीकडूनच होतें. ही नवधा प्रकृति विश्वाच्या प्रमाणेंच जीवात्म्याच्या देहातही आहे जीवाच्या देहातील तिचे अंश लहान, व विश्वात्म्याच्या शरीरातील मोठे आहेत. लहान-मोठेपण हा भेद बाजूस सारला, तर दोन्ही ठिकाणी नवधा प्रकृति सारखीच कार्य करीत आहे म्हणूनच दोन्ही ठिकाणीं एकच नियम कार्य करीत आहेत, अथवा दोन्ही ठिकाणीं एकच प्रकृति कार्य करीत आहे. नवधा प्रकृतीचे दोन ठिकाणी अस्तित्व आम्ही केवळ हा विषय समजावा म्हणून येथें मानलें आहे, खरें पाहिलें तर विश्वभर एकच प्रकृति नांदत आहे व त्यांत व्यक्ति, राष्ट्र वा विश्व असा भेद नाहींच आता तिन्ही स्थानांतील या विषयाचे संकेत पहा—

| अध्यात्म | अधिभूत | अधिदैवत |
|---|---|---|
| जीवशरीरांत | राष्ट्रांत | विश्वांत |
| जीव | राजा | ईश्वर |
| प्रकृति | प्रजा | प्रकृति |
| अहंकार | स्व(राष्ट्र)भाव | अहंकार |
| मन | सभा ( प्रतिनिधि ) ( मनन करणारांचा संघ ) | चंद्रमा |
| कान | दूरदर्शी | आकाश ( दिशा ) |

४

| | | |
|---|---|---|
| प्राण | शूर सैनिक | वायु |
| वाक् | वक्ता | अग्नि |
| रुचि | चिकित्सक | जल |
| गन्ध | पोषक | पृथ्वी |
| प्राण | वीरभद्र ( सेनापति ) | रुद्र |
| ,, | सैनिक | मरुत् |
| वीरता | योद्धा ( राजा ) | इन्द्र |
| रोगप्रतिकारकता | चिकित्सक वैद्य | अश्विनौ |
| ,, | औषधि | औषधि |
| ज्ञान, वाक् | ज्ञानी | अग्नि |

( येथें पृ० १४९-१५० वरील आलेख पहा )

या कोष्टकावरून असें समजून येईल कीं, पिण्ड आणि ब्रह्माण्ड, व्यक्ति आणि विश्व, यांत जो संबंध आहे, तोच संबंध एक व्यक्ति आणि व्यक्ति समूह अथवा एक मानव आणि मानवसमूह अथवा राष्ट्र यामध्यें आहे. हें कोष्टक समोर ठेवून आपण आध्यात्मिक सिद्धान्तांवरूनच राष्ट्रव्यवहार अर्थात् राज्यशासनाच्या व्यवस्थेचें ज्ञान करून घेऊं शकतों

## आत्मा आणि राजा यांनीं अकर्ता असावें

१ अध्यात्मशास्त्राप्रमाणें ब्रह्म, आत्मा अथवा पुरुष हा स्वत: अकर्ता आहे तो केवळ द्रष्टा, निरीक्षक आहे, त्याचप्रमाणें राज्यशासनांत राजानें स्वत केवळ द्रष्टा, साक्षी, असंग, अकर्ता आणि अध्यक्ष असावें.

२ अध्यात्मशास्त्रानुसार प्रकृतीच सर्व सृष्टीची रचना, पालन, आणि संहार करते, तिच्यामुळेंच सर्व विकृति निर्माण होतात, सगळा प्रपंच तिच्या मुळेंच वाढतो, विश्वांत होणाऱ्या सर्व घडामोडी प्रकृतीचेंच कार्य आहे याचप्रमाणे राष्ट्रशासनांतही प्रकृति म्हणजे सगळे प्रजाजन अथवा प्रजेकडून निवडून गेलेले प्रतिनिधि, अथवा त्यांचे मंत्री, यांनीच राज्यकारभार चालवावा. संपूर्ण राष्ट्राचा सर्व कारभार प्रजेच्या उन्नतीला आवश्यक त्या पद्धतीनें तिच्याकडू

पुरुष ———————— प्रकृति

काम:
(संकल्प)

प्राज्ञ

तैजस्

हिरण्यगर्भ



पिण्ड
व्यष्टि
व्यक्ति
कार्यशक्ति
|
बुद्धि, प्रज्ञा
|
मन
अहंकार
|
ज्ञानशक्ति

शौर्यशक्ति

भोगशक्ति

कर्मशक्ति
|
शरीर

पिण्डसमूह
समष्टि
संघ
कर्तृत्ववानांचा संघ
|
मंत्रिमण्डळ, बुद्धिमानांचा संघ
|
मननशील–संघ
प्रातिनिधिक सभा
|
ज्ञानी संघ
( Literary Associations )
वीर–संघ
( Army Divisions )
वैश्य-संघ
( Trade Unions )
कर्मचारी संघ
( Labour Unions )
|
राष्ट्र

ब्रह्माण्ड
परमेष्ठी
विश्व
काम संकल्प — माया प्रकृति
आदिशक्ति
|
प्राज्ञ — महत्तत्त्व
आसुरी, मति, ख्याति, प्रज्ञा
|
तैजस् — अहंकार
अभिमान, पृथग्भाव
|
हिरण्यगर्भ — सत्त्वसृष्टि

रजस्+सत्त्व

रजस्+तमस

तमस्
|
विश्व

निवडल्या गेलेल्या प्रतिनिधींनी चालवावा.

आर्यांचें राज्यशासन अशा रीतीनें अध्यात्मशास्त्राच्या पायावर निर्माण केलें गेलें आहे. याचा वाटेल तेवढा विस्तार करतां येईल, किंवा हें विचारान्तीं समजून येऊं शकेल पण या ठिकाणीं याचा विस्तार यापेक्षा अधिक वाढविण्याची आवश्यकता नाहीं. [प्रजेनें राज्यकारभार चालवावा असा जो सिद्धान्त आधुनिक राज्यशासनशास्त्राचें मंथन करून नुकतेंच हातीं लागलेलें सार आहे, असें मानलें जातें, तोच सिद्धान्त अध्यात्मशास्त्रानें हजारों वर्षांपूर्वी सिद्ध केला होता, हें येथें स्पष्टपणें दिसण्यासारखें आहे. आर्यांच्या राज्यकारभारात हा सिद्धान्त अतिप्राचीन कालींही मानला जात असे, हें पुढील वेदमंत्रांवरून आढळून येईल—

**स विशो अनुव्यचलत्। तं सभा च समितिश्च**
**सेना च सुरा च अनुव्यचलत्।** (अथर्व. १५।९।१-२)

'जो (राजा) प्रजेला अनुकूल असा व्यवहार करतो, त्याला सभा, समिति, सेना आणि धनकोश अनुकूल होतात अर्थात् ग्रामसभा, राष्ट्रसमिति, सेना आणि राष्ट्रीय धनकोश प्रजेच्या अधिकारांत असतात, आणि जो राजा प्रजेच्या अनुकूलतेप्रमाणें वागतो, त्याला हीं अंगें अनुकूल होतात. राजाकडून प्रजेवर होणार अत्याचार हे सेना आणि कोश यांच्या बळावरच संभवतात; बळ जर प्रजेच्या स्वाधीन असलें, तर हे अत्याचार होणें शक्यच नाहीं. गीतेनें हीच गोष्ट 'प्रकृतीच (प्रजा) सर्व कांहीं करते. स्वामीनें, आत्म्यानें (राजानें) कसलाही कर्तृत्वाभिमान धारण करूं नये, जो असा अभिमान धारण करतो, तो दुःखाचा वाटेकरी होतो,' (गी० ३।२७) या गूढार्थक वर्णनाच्या द्वारें सांगितली आहे. जर पूर्वोक्त परिभाषा नीट समजली, तर या गूढ वचनाचा अर्थ सहज स्पष्ट होऊं शकेल.]

**विड् वै गर्भो राष्ट्रं पसो, राष्ट्रमेव विशि आ**
**हन्ति, राष्ट्री विशं अत्ति, तस्मात् राष्ट्री विशं**
**घातुकः।** (श. प. ब्रा.)

' प्रजा नाना प्रकारच्या भेदांनीं विघटित असते, राजा अनियंत्रित परन्तु सुसंघटित असतो, म्हणून असा राजा प्रजेवर आघात करतो, जणुं काय अनियंत्रित राजा प्रजेला खाऊनच टाकतो. म्हणून अनियंत्रित राजा प्रजेला घातुक असतो. ''या ठिकाणीं राजशक्ति संघटित असून जनता विघटित असते, असें म्हटलें आहे. म्हणून राजा आपल्या संघटित शक्तीनें प्रजेंतील पक्षोपपक्षांवर आघात करून त्यांस संघटित होऊं देत नाहीं; अशा प्रकारें प्रजेच्या हिताचा नाश करून तो सर्व शक्ति आपल्या हातीं केन्द्रित करतो. म्हणून केन्द्रीभूत शक्ति हेंच दु खाचें मूळ आहे. याप्रमाणें या ठिकाणीं शक्तीच्या विकेन्द्रीकरणाचा गौरव वर्णून शक्तीच्या केन्द्रीकरणाचा निषेध केला आहे.

> सभा च मा समितिश्चावतां प्रजापतेर्दुहितरौ संविदाने। येना संगच्छा उप मा स शिक्षात् चारु वदानि पितरः संगतेषु॥ ( अथर्व. ७।१२।१ )

' ग्रामसभा आणि राष्ट्रसमिति, या दोन प्रजापालन करणाऱ्या राजाच्या जणुं काय कन्याच आहेत. राजा यांचा पिता आहे. या सभांचे सभासद राजाला योग्य तें शिक्षण देवोत. राजाला जेव्हां यांच्याविषयीं कांहीं बोलावयाचें असेल, तेव्हां त्यानें चांगलेंच बोलावें. '

या मंत्रांत राज्यशासन करणाऱ्या सभाच्या संबंधानें अत्यन्त महत्वाचे विचार सांगितले आहेत.

**( १ ) ग्रामसभा—** हिनें गांवाच्या कामाची व्यवस्था पहावी. प्रत्येक गांवाचें काम ग्रामसभेच्या द्वारें व्हावें.

**( २ ) राष्ट्रसमिति—** हिनें संपूर्ण राष्ट्राच्या कामाची व्यवस्था करावी याप्रमाणें प्रत्येक गांवांत कार्य करणारी ग्रामसभा असली म्हणजे त्या राष्ट्रांत असलेल्या अनेक गांवांच्या संख्येइतक्या ग्रामसभा त्या राष्ट्रांत निर्माण होतील. त्यांचे प्रतिनिधि राष्ट्रसमितींत येऊन या मध्यवर्ती सभेच्या द्वारें सर्व राष्ट्राचा शासनप्रबन्ध ते करतील. प्रत्येक गांवांत ग्रामसभा असल्यामुळें अधिकाराचें विभक्तीकरणही झालें, आणि मध्यवर्ती महासमितींत आवश्यक ही शक्तीही

राहिली या दोन्ही सभा प्रजेच्याच आहेत व यांच्या द्वारें प्रजाच आपला राज्य-कारभार करते हें उघड आहे

( ३ ) राजाच्या आज्ञेनें या सभांची निर्मिति होते, म्हणून राजा यांचा जनक म्हटला आहे. पण या नात्यामुळें राजा या प्रजेच्या सभांचा पत्नीवत् भोग घेऊ शकत नाहीं. या सभा ( दुहिता=दूरे हिता ) राजाच्या अधिकारक्षेत्रापासून दूर राहणेंच अधिक हितकारक आहे सभा आणि समिति या स्वतंत्र असून, त्या राजाच्या अधिकारांत नसत; तर स्वतंत्र असत.

( ४ ) राजा हा प्रजापति आहे, म्हणून त्यानें प्रजेच्या पालनाची सभांच्या अनुमतीनें व्यवस्था करावी, सभा आणि समिति यांच्या निर्णयाप्रमाणें कार्य करावें

( ५ ) या राष्ट्रसमितीच्या सभासदांनी निःपक्षपातानें राजास आपलें मत सांगत असावें. या वेळीं त्यांनीं आपण राजाचे ( पितरः ) निर्माते आहोंत असें समजावें

सा उदक्रामत् । सा सभायां न्यक्रामत् ।
सा समितौ न्यक्रामत् । सा आमंत्रणे न्यक्रामत् ॥
( अथर्व )

' ही प्रजेची शक्ति ग्रामसभेंत संक्रान्त झाली ती राष्ट्रसमितींत आणि मंत्रिमण्डलांत संक्रान्त झाली. ' याप्रमाणें गांवांत ग्रामसभा, राष्ट्रांत राष्ट्रीय समिति आणि प्रजेच्या प्रतिनिधींचें मंत्रिमंडळ बनून त्यांच्या द्वारें राज्यकारभार चालावा. सभा, समिति आणि मंत्रिमंडळ या तिन्ही प्रजेच्याच संस्था आहेत म्हणून यांच्या द्वारें चालणारा राज्यकारभार हा प्रजेच्या हितास पोषक असाच होणें शक्य आहे, त्यांत राजाचा हस्तक्षेप होऊं नये, हें वरील वेदमंत्रांनीं दाखवलें आहे. ' प्रकृति सगळा प्रपंच करते, पुरुष केवळ असंग किंवा द्रष्टामात्र आहे, ' असा या संकेताच्या मार्गानें गीतेनेंही हीच गोष्ट प्रतिपादन केली आहे; आणि सांख्यशास्त्रानेंही आध्यात्मिक सिद्धान्ताच्या द्वारें हेंच सांगितलें आहे.

परमेश्वर हा राजाचा राजा आहे. ' त्या परमेश्वराचाही केवळ अकर्ता मात्र

स्वरूपात आम्ही स्वीकार करूं, त्यानें स्वतः कांहींही करतां कामा नये. सर्व कार्य त्याच्या प्रकृतीनें करावें,' असें आग्रहपूर्वक सांगणारे श्रुति या लहानशा पृथ्वीवरील अल्प-शक्ति धारण करणारा राजा तरी अनियंत्रित असावा, असें कसें बरें म्हणतील ? जे राजाच्या राजाला न भितां त्याला अकर्ता राहण्यास सांगतात, ते पृथ्वीवरील अल्पशक्तीच्या राजावर तरी प्रजेच्या नेत्यांचें आवरण घालण्यास कसे भितील ?

अस्तु. याप्रमाणें वेदच मुळीं प्रजातंत्र राज्याचा आदेश देत आहे. अध्यात्म-शास्त्रांतही निराळ्या पद्धतीनें हेंच तत्त्व पुरस्कारलें आहे आणि गीता त्याचाच अनुवाद करीत आहे. हें तत्त्व अध्यात्माच्या सिद्धांतातून दाखविलें असल्यामुळें तें चिरस्थायी झालें आहे; कारण वैदिक तत्त्वज्ञान हें केवळ चर्चा करण्याकरितां नसून प्रत्यक्ष आचरण्याकरितां आहे.

एका मनुष्यास व्यक्ति हें नांव आहे; अशा अनेक व्यक्तींचा समूह विशेष ध्येयानें एकतेनें राहूं लागला, तर त्याला राष्ट्र असें म्हणतात. मनुष्य हा संघ करून राहण्याकरिताच निर्माण झाला आहे. एकटें राहून मनुष्याची उन्नति होणें शक्य नाहीं. म्हणून वेदानें त्यास सामुदायिक जीवन दर्शविणारें '**व्राताः**' असें नांव दिलें आहे. व्यक्तींत स्वभावतः ज्या गुणांचें वास्तव्य असतें, तेच गुण राष्ट्रांतील गुणी पुरुषांत प्रगट झालेले दिसतात. पहा—

| व्यक्ति | राष्ट्र ( व्यक्तिसमूह ) |
|---|---|
| गुण | गुणी जन |
| ज्ञान | ज्ञानी जन |
| कारागिरी | कारागीर |
| बल | बलवान् |

याचप्रमाणें अनेक गुणांविषयीं जाणावें. यावरून स्पष्टपणें असें कळून येईल कीं, व्यक्तिविषयक नियमच विस्तृत बनून राष्ट्रांसही लागू पडतात. आर्यशास्त्र हें व्यक्तींचे नियम सांगणाऱ्या अध्यात्मशास्त्राची महती वर्णन करतें, त्याचप्रमाणें

आधिदैविक शास्त्राचेंही वर्णन करतें. यांच्या अनुसंधानानें मानवी समष्टि अर्थात् राष्ट्राच्या शासनासंबंधींच्या ज्ञानाचा बोध करून घेणें उचित आहे. या ज्ञानालाच तें अशा रीतीनें गुप्तपणें सांगितलें असल्यानें गुह्यज्ञान असें म्हणतात. यावरून हें ज्ञान क्षत्रिय परम्परेंतच कां राहिलें, याचा बोध होऊं शकतो. क्षत्रियांस राज्यशासनात याचा उपयोग असल्यामुळें हें ज्ञान त्यांच्यातच राहिलें होतें.

अध्यात्मविद्येचे सर्व सिद्धान्त याप्रमाणें राज्यशासनात उपयोगी होत असतात. या ठिकाणीं आम्ही मुख्य अध्यात्म सिद्धांतांचें राज्यशासनात परिवर्तन करण्याची रीति स्पष्ट करून दाखविली आहे. यावरून अध्यात्मशास्त्राचे सिद्धान्त राज्यशासनामध्यें कसे बनतात तें समजून येईल. गीतेंतील नवव्या अध्यायात अध्यात्मविद्येच्या वर्णनानेंच राजविद्येचा विचार केला आहे, त्यांतील कांहीं वचनें आता पाहू--

## निःपक्ष राजा

समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ॥२९॥
अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।
साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥३०
मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥
किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।
अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥
(गी० ९।३२,३३)

सर्व मनुष्यांशीं राजा निःपक्ष वर्तणूक करील, राजाला कोणी शत्रु नाहीं, अथवा कोणी मित्रही नाहीं. एखादा दुराचारी मनुष्य जर राष्ट्रसेवा करूं लागेल, तर त्याला साधु (योग्य) मानलें जाईल. (अर्थात् पूर्वीच्या अनाचारामुळेंच त्याला नेहमी करिता त्याज्य समजलें जाणार नाहीं. सुधारणेकरिता सर्वांनाच अवसर मिळेल.) पापयोनि, शूद्र, स्त्रिया आणि वैश्य हेही उच्च योग्यता प्राप्त

करूं शकतात. मग पवित्र ब्राह्मण आणि क्षत्रिय यांची उन्नति होईल, आणि त्यांना योग्य अवसर दिला जाईल हें काय सांगायला पाहिजे ? '

याप्रमाणें हीं वाक्यें जशी अध्यात्मविषयक आहेत. त्याचप्रमाणें हीं राज्य-शासनाची नीतीही प्रकट करतात. आता आणखी कांहीं वचनें पाहूं—

(१) न च मत्स्थानि भूतानि (५)= सर्व भूतें ईश्वराधीन नसून स्वतंत्र आहेत. ( सर्व माणसें सर्वस्वी राजाचे आधीन नाहींत. सर्व प्रजा स्वतंत्र आहे, प्रजेची शक्ति स्वतंत्र आहे ) [प्रजेच्या अस्तित्वावरच राजाचें अस्तित्व अवलंबून आहे. राजाच्या अभावी प्रजा राहूं शकते. राजा सापेक्ष आहे, प्रजा मात्र निरपेक्ष राहूं शकते. ]

(२) भूतग्रामः प्रकृतेर्वशात् अवशः (८)= भूतमात्र प्रकृतीच्या स्वाधीन असल्यानें परतंत्र आहे. (प्रत्येक मनुष्य हा प्रजाकृत नियमांनी बांधला आहे, तो वाटेल तसें वागूं शकत नाहीं. प्रत्येक मनुष्याभोंवती त्याच्या संघाच्या नियमांचें बन्धन आहे ) [ जरी कोणी मनुष्य ' मी लढणार नाहीं, ' असें म्हणेल, तरी प्रजेच्या प्रेरणेनें त्यास लढावेंच लागेल. ( गी० १८।५९) एवढा प्रजेचा अधिकार राष्ट्ररक्षणाच्या वेळीं प्रत्येक मनुष्यावर असतो. ]

(३) जगत् विपरिवर्तते (१०)= जगत परिवर्तनशील आहे. म्हणून या परिवर्तनाप्रमाणें शासनाच्या नियमातही परिवर्तन होणें इष्ट आहे.

(४) "राक्षसी आणि आसुरी कर्म करणारांचें ज्ञान, कर्म आणि आशा व्यर्थ आहेत." (१२)- त्यांचा परिणाम कोणासाठींही लाभदायक होऊं शकत नाही. म्हणून "सर्वांस दैवी प्रकृतीचा आश्रय करणेंच योग्य आहे" (१३) दैवी प्रकृतीचा आचार सत्य, अहिंसा असा असतो असें गीतेंत सांगितलें आहे.

(५) 'अनन्यभावानें जे लोक राजकार्यांत लक्ष घालतील, त्यांचा योगक्षेम राजसंस्थेकडून चालविला जाईल. ' (१२) हें विधान राष्ट्रासाठी कार्य करणाऱ्यांना आपल्या योगक्षेमाविषयीं विश्वास वाटावा यासाठीं आहे. असा राष्ट्रावर विश्वास ठेऊन सर्वांनीं राष्ट्रहितासाठीं स्वतःचें समर्पण करावें

याप्रमाणें हीं नवव्या अध्यायातील वचनें आहेत. मुख्यत. अध्यात्मविद्येचें प्रतिपादन करीत असूनही त्यातून राज्यशासनविषयक अर्थही ध्वनित होतो. शब्दांचा मुख्य उपयोग अध्यात्मज्ञान करून देणें हाच आहे म्हणून राजविद्याविषयक अर्थ पाहतांना वाक्यरचना आणि अर्थाचें विवरण यात अवश्यक तें परिवर्तन करावें लागतें याप्रमाणें पाहिल्यावर गीतेंतील अध्यात्मिक सिद्धान्तावरून उत्तम राज्यशासन सिद्ध होऊं शकतें असें दिसेल, कारण त्यांत कोणाही स्वार्थी मानवाचा स्वार्थी हात नाहीं तें मूळ आत्मिक नियमावर आश्रित झालेलें राज्यशासन असतें आणि हे नियम अटळ असल्यामुळें हें राज्यशासनही सर्व प्रजेस स्थायी सुख देणारें होऊं शकतें

हे असे राज्यशासनपर अर्थ ध्वनित करणारे आध्यात्मिक सिद्धान्त केवळ नवव्या अध्यायातच आहेत असें नव्हे, तर गीतेंतील बहुधा सर्व नियम अशाच प्रकारें मानवी आचरणात आणण्यास योग्य आहेत, हें क्रमश पुढें दाखविलें जाईल.

हा विषय नवीन असल्यामुळें विचार करणारांनीं मोठ्या सावधपणानें याचा विचार करून हा विषय समजून घ्यावा.



# कर्म-योग

## कर्म करणें ही प्राण्याची सहज प्रवृत्तीच आहे

भगवद्गीतेंत कर्मयोगाचें विशेष महत्त्वपूर्ण वर्णन केलें आहे. असें पाहिलें असतां गीतेंत अनेक योग सांगितले आहेत. परन्तु "कर्मयोगो विशिष्यते" (गी. ५।६) कर्मयोगाचें वर्णन विशेष रीतीनें केलें आहे. कारण स्वाभाविक धर्म या रूपानें कर्माचा संबन्ध प्रत्येक मनुष्यप्राण्याशीं आहेच—

न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।
कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ (गी० ३।५)

"कोणीही प्राणी कर्म न करता एक क्षणभरही राहूं शकणार नाहीं. प्रकृतीच्या गुणामुळे अवश होऊन तो कर्म करीतच असतो" अर्थात् कर्म न करता राहणें मनुष्यास अशक्य आहे. जरी त्यानें प्रयत्नतः कर्म करणें टाळलें, तरी शरीरस्वभावामुळें कर्म होईलच.

अशी कल्पना करा कीं, एक सतत चालणारी मोटार आहे. तिची गति केव्हांही थांबवितां येत नाहीं. अशा अवस्थेंत तिला योग्य मार्गावरून चालविणें, हेंच तिच्यांत बसलेल्या माणसाचें कर्तव्य आहे. नाहींतर ती मोटार आपल्या गतीमुळें कुठें तरी खड्ड्यांत जाऊन पडेल, स्वतःही मोडेल, आणि आंत बसणाराचेही प्राण घेईल. मनुष्याचीही अशीच स्थिति आहे. कर्म करणें हा मनुष्यस्वभाव असल्यामुळें त्याजकडून कर्में होतच राहतील, मग तो कोणत्याही का स्थितींत असेना !

पश्यन्, शृण्वन्, स्पृशन्, जिघ्रन्, अश्नन्, गच्छन्,
स्वपन्, श्वसन् । प्रलपन्, विसृजन्, गृह्णन्, उन्मिषन्,
निमिषन् अपि ॥ (गी० ५।८-९)

'पाहणें, ऐकणें, स्पर्श करणें, वास घेणें, खाणें, जाणें, झोंपणें, श्वास घेणें, शब्द बोलणें, देणें, घेणें, पापण्या झाकणें आणि उघडणें' हीं कामें तर माणसाकडून होतच

राहतील शिवाय मनुष्यानें अगदीं काहींच न केलें, तरी त्याचे कडून ' स्वस्थ
बसणें' हें कर्म तर घडेलच। तात्पर्य मनुष्य कर्म न करता राहू शकत नाहीं.
परन्तु या शरीर धर्मांचा उपयोग काय ? मनुष्यास जीं कर्में करणें आवश्यक आहे, ' असेंही
तीं कर्में हीं नव्हेत वेदानें मनुष्याला **'क्रतु, यज्ञ'** हीं नावें दिलीं असून
दर्शविलें आहे कीं मनुष्य 'यज्ञमय आहे अर्थात् मनुष्यानें यज्ञरूप बनावें हा त्याचा
हेतु आहे यज्ञरूप कर्मांशिवाय मनुष्यानें काहींही करू नये कर्मांचे दोन प्रकार
एक **यज्ञरूप** कर्म आणि दुसरा **अयज्ञरूप-कर्म** यापैकीं **अयज्ञरूप कर्मांचा**
त्याग करून केवळ **यज्ञरूप** कर्मच करून मनुष्य आपलें जीवन सफल कसें
करू शकेल, याचा विचार करून आपणास निर्णय घेतला पाहिजे हा विचार
करीत असता तीन प्रकारचीं कर्में आपल्या समोर उभीं राहतात—

## कर्मांचे तीन भेद

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।**
**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १६ ॥**
**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।**
**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥**
**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।**
**स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥**

(गी० ४)

' कर्म काय आणि अकर्म काय, याविषयीं मोठमोठे ज्ञानीही मोहित झाले
आहेत. म्हणून जें जाणलें असतां अशुभापासून मुक्तता होईल, असें कर्म मी तुला
सांगतों मनुष्याला कर्म म्हणजे काय, विकर्म म्हणजे काय आणि अकर्म म्हणजे
काय हें जाणून घेतलें पाहिजे. कर्माचा परिणाम अत्यन्त सूक्ष्म असतो जो
मनुष्य कर्मांत अकर्म पाहतो आणि अकर्म करीत असता कर्म होतें असा अनुभव
करतो, तो मनुष्यांमध्यें अत्यन्त बुद्धिमान् आहे, यांत संदेह नाहीं. तोच कुश-
लतापूर्वक कर्म करणारा आहे, आणि तोच संपूर्ण कर्में यथायोग्य रीतीनें कर-
णाराही आहे. '

या गीतेच्या श्लोकांत अत्यन्त मोठें तत्त्वज्ञान सांगितलें आहे. या ठिकाणी प्रथम कर्मांचे तीन प्रकार सांगितले आहेत. कर्म, अकर्म आणि विकर्म असे हे कर्माचे तीन प्रकार (प्रथम आपणास कर्म शब्दाचा मूळ धात्वर्थ पाहिला पाहिजे ' कृ '= करणें या अर्थाचा हा धातु आहे. कर्म करणें हा याचा अर्थ आहे ' कृ+मन्= कर्मन् ' अशा प्रकारें कर्म शब्द बनला आहे. कांहीं करण्याकडे मन लावणें, आणि तें करणें, अर्थात् कोणतीही गोष्ट मनःपूर्वक करणें, म्हणजेच कर्म होय. जें करण्यांत मनुष्याचें मन गुंतलें नाहीं, अर्थात् जें अगदीं सहज त्याचेकडून झालें, त्यास कर्म म्हणतां येत नाहीं. मन लावून केलेल्या कर्मांचेंच उत्तरदायित्व काय तें मनुष्याकडे असतें.)

केवळ कर्म याचा अर्थ केवळ क्रिया असा आहे. ती केवळ क्रिया कांहीं हत्य होऊं शकत नाहीं. नुसता हात उचलणें, हीही क्रिया आहे. पण तिचा उपयोग काय? असल्या नुसत्या क्रियेचा विचार आपणास करावयाचा नाहीं. जें कर्म केल्यानें मनुष्याचें ' यज्ञ ' नांव सार्थ होईल, त्या कर्माचा विचार आपणास करणें आहे. तें करीत असतां आपल्या समोर कर्म, अकर्म आणि विकर्म हीं तीन प्रकारचीं कर्में उभीं राहतात. आतां आपण यांचा विचार करूं—

' विकर्म' = (विरुद्ध कर्म) अशुद्ध रीतीनें केलेलें कर्म, अन्याय्य कर्म, जें कर्म करणें मनुष्यास योग्य नाहीं, जें निषिद्ध आणि हानिकारक आहे, जें करण्यानें व्यक्तीची आणि समाजाची हानि होते, जें करणें मनुष्याच्या उन्नतीस अहितकारक आहे, असें अपवित्र कुकर्म, त्यास विकर्म म्हणावें; (विविधं कर्म) नाना प्रकारचीं कर्में एकदम करणें, अनेक व्यवहार एकाच वेळीं करणें, यामुळें एकाकडेही धडपणें मन न लागणें व मन एकाग्र न झाल्यामुळें सगळींच कर्में बिघडणें, (विगतं कर्म) प्रारम्भ केलेल्या कर्मास पुरें न करतां तसेंच सोडणें, हे तीन अर्थ विकर्म शब्दापासून निष्पन्न होतात. परन्तु या ठिकाणीं विरुद्ध अथवा निषिद्ध कर्म, हाच पहिला अर्थ घेणें योग्य आहे; कारण इतर अर्थ यांतच समाविष्ट होतात.

विरुद्ध अथवा निषिद्ध कर्म करणें, हें कोणासच उचित नाहीं. जी कर्मे धर्मशास्त्राला अथवा मानवी उन्नतीला विरुद्ध असतील, त्याचा सर्वस्वी त्याग केला पाहिजे. याचप्रमाणें कर्मत्याग करणें, अथवा आपणाकडून न होणारीं अनेक कर्में करणें हेंही उचित नाहीं हीं सगळीं विकर्मे असून हीं मानवतेची हानि करणारीं आहेत. मनुस्मृतींत अनेक विकर्मांचा उल्लेख आहे उदाहरणार्थ—

> कितवान्कुशीलान् क्रूरान्पाषण्डस्थाँश्च मानवान् ।
> विकर्मस्थाञ्छौण्डिकांश्च क्षिप्रं निर्वासयेत् पुरात् ॥
> एते राष्ट्रे वर्तमाना राज्ञः प्रच्छन्नतस्कराः ।
> विकर्मक्रियया नित्यं बाधन्ते भद्रिकाः प्रजाः ॥
> (मनु० ९।२२५-२२६)

" जुगार खेळणारे, धूर्त, क्रूर कर्मे करणारे, पाखण्डी, दारू दुकानदार, अशा हानिकारक कर्मे करणाऱ्या लोकांस राजानें आपल्या राष्ट्रांतून हाकून द्यावें कारण हे राजाच्या राज्यातील प्रच्छन्न चोरच आहेत. सद्वर्तनी प्रजेला हे कष्ट देणारे असल्यामुळें राजानें यांच्यापासून आपल्या प्रजेचें रक्षण करावें. "

या मनुस्मृतींतील वचनांत विकर्मांचीं कांहीं उदाहरणें दिलीं आहेत. यांच्या मननानें विकर्मांची कांहीं कल्पना येऊं शकेल. हीं विकर्में अनेक प्रकारचीं आहेत. हीं विकर्में करून मनुष्य आपली, स्वतःची आणि समाजाची हानि करून घेतो म्हणून हीं निषिद्ध कर्में करू नयेत या विकर्मांविषयीं एवढेंच विवरण पुरे

**अकर्म**= ( न कर्म ) कर्म न करणें, आळशी राहणें, कर्म करण्याची योग्यता नसणें, कर्म करण्यास लागणारी शक्ति अथवा अधिकार नसणें, कर्म करण्याच्या स्थानीं बसण्याचाही अधिकार नसणें, कर्म केलें असताही न केल्याप्रमाणें होणें, अलंग भावामुळें दोषापासून अलिप्त राखणारें कर्म, दोषाचा लेप लागूं न देणारें कर्म, हे अकर्मांचे अर्थ आहेत हे ' अकर्म ' पद गीतेंत दोन वेगवेगळ्या अर्थांनी योजिलें गेलें आहे पहा—

> मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥
> कर्म ज्यायो ह्यकर्मणः । (गी. २।४७)

शरीरयात्राऽपि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ( गी. ३।८ )
न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ॥
( गी. ३।५ )

' आळसाकडे तुझी प्रवृत्ति नसावी, कर्म न करण्यापेक्षा कर्म करणें श्रेयस्कर आहे. कर्म न करतां शरीरच जिवन्त राहूं शकणार नाहीं. कोणीही मनुष्य कर्म न करतां एक क्षणभरही राहूं शकत नाहीं. ' या वाक्यांत ' अकर्म ' चा अर्थ कर्म न करणें किंवा आळस असाच आहे. परन्तु—

कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ॥ ( गी. ४।१८ )
आत्मानं अकर्तारं स पश्यति ॥ ( गी. १३।२९ )
मां विद्धि अकर्तारमव्ययम् ॥ ( गी. ४।१३ )

' जो कर्मांत अकर्म आणि अकर्मांत कर्म पाहतो, आत्म्याला जो अकर्ता असें ओळखतो. ' या ठिकाणचीं अकर्म आणि अकर्ता हीं पदें कर्म न करणें किंवा आळस्य, याचीं द्योतक नसून असंग वृत्तीनें केलेल्या कर्मांचीं बोधक आहेत. हें अकर्म उच्च अवस्थेचें चिन्ह आहे. हें अकर्म दोष उत्पन्न करणारें नसून मनुष्याची उन्नति करणारें आहे. पण आलस्य दर्शविणारें अकर्म हें दोष वाटविणारें आहे. कारण त्यामुळें शरीरच राहणें शक्य नाहीं, मग उन्नति कोठून होणार ? अस्तु. याप्रमाणें गीतेच्या वचनांवरूनच असें सिद्ध झालें की, एक ' अकर्म ' पद आलस्याचें बोधक आहे, आणि दुसरें श्रेष्ठ कर्माचें बोधक आहे. आळस हा माणसाचा शत्रु असल्यामुळें मनुष्यानें त्यापासून दूर रहावें.

कर्म केलें असताही तें न केल्याप्रमाणें निर्लेप राहणें, ही अवस्था अत्यन्त श्रेष्ठ असून हिच्यांत उत्तमोत्तम कर्में संभवतात आणि कर्में होऊनसुद्धा समाज अथवा राष्ट्र यास त्याचा काहीं उपयोग होऊं नये, या प्रकारचें दुसरेंही एक ' अकर्म ' आहे. जसें स्नान, भोजन, चैन किंवा आपल्या अस्तित्वाकरितां ज्याची नितांत आवश्यकता आहे, असें झोंपणें, चालणें इत्यादि कर्मे. मनुष्याचें जीवित यावरच अवलंबून असल्यामुळें मनुष्यास हीं कर्में करणें प्राप्तच आहे. पण हीं केलीं अथवा न केलीं, तरी त्या-

पासून समाज अथवा राष्ट्र याचा कोणताही लाभ होणार नाही म्हणून त्या दृष्टीनें करणेंही न केल्यासारखेंच असल्यामुळें हीं कर्मे असूनसुद्धा अकर्मेच आहेत अशी कल्पना करूं. कोणी एकानें आपल्या स्वास्थ्याकरितां कपडे घातले, स्नान अथवा भोजन केलें, तर त्यापासून समाजास काय लाभ झाला? ज्या कर्मांचा संबंध केवळ वैयक्तिक अस्तित्वाशींच काय तो आहे, तीहीं सर्व अकर्मेच होत सामाजिक दृष्टीनें यांचें मूल्य फारसें नाहीं जें कांहीं मूल्य आहे, तें सामूहिक दृष्टीनें फारसें महत्त्वाचें नाहीं

अशा प्रकारें विकर्म आणि अकर्म याचा विचार केला, त्यावरून असें आढळून आलें कीं, विकर्म तर सर्व दृष्टींनीं त्याज्य आहे आळस हेंच ज्याचें स्वरूप आहे, तें अकर्महीं त्याज्यच आहे आपलें अस्तित्व राखण्याकरिताच केवळ जे कर्म आवश्यक आहे, तें तर केलेंच पाहिजे पण सामाजिक दृष्टीनें तें फारसें महत्त्वाचें नाहीं तिसरें जे श्रेष्ठ अकर्म आहे, तें मात्र केलेंच पाहिजे त्याचें शास्त्रीय नाव 'अकर्म' असलें, तरी तेंच खरोखर 'कर्म' आहे कारण तें मनुष्याची उन्नति करणारें आहे आता आपण कर्माचा विचार करू

## कर्माचें लक्षण

कर्माचे तीन भेद सागून त्यातील दोहोंचीं लक्षणेंही आपण पाहिलीं म्हणून आता कर्मांच्या तिसऱ्या प्रकाराचें लक्षण जाणणें अगदीं सुलभ आहे पूर्वी सांगितलेल्या कर्मांचीं लक्षणें ज्यात नाहीत, तें या कर्माचें लक्षण समजावें अर्थात् जें निषिद्ध अथवा विरुद्ध कर्म नाहीं, जे करणेंही न केल्यानच जमा नसतें, जें केवळ वैयक्तिक अस्तित्वालाच सहायक नसतें, जें केलें असतां विश्वरूपाची सेवा अथवा पूजा होते, त्याला 'कर्म' म्हणावें याविषयीं गीता म्हणते,—

**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥**

(गी १८।४६)

'आपल्या कर्मांनी (विश्वरूपी) परमेश्वराची पूजा केली असतां सिद्धि मिळते,' हें गीतेचें कथन मनन करण्यास योग्य आहे कोणी साधारण मनुष्य घरीं आला, तर त्याच्या स्वागताकरिता मनुष्य फारशी सिद्धता करीत नाही पण जर कोणी मोठा पूजनीय पुरुष घरीं यावयाचा असेल, तर मग मनुष्य त्याचें आतिथ्य करण्याकरितां

विशेष योजना करतो. आणि जर कोणी महात्मा अथवा राजाच यावयाचा असेल तर तो आपलें घरच काय पण घराबाहेरील स्थान आणि येण्याचा मार्गही व्यवस्थित सजवितो, आणि त्याचें होईल तितकें उत्तम स्वागत करतो. मग या ठिकाणीं प्रत्यक्ष परमेश्वराचीच पूजा आणि स्वागत करावयाचें आहे ! या सिद्धतेंत मनुष्य उणे कसाला ठेवील ? म्हणून तो कर्मेंही व्यवस्थित करतो, आणि सिद्धताही उत्कृष्ट ठेवतो.

परमेश्वराची पूजा आपल्या कर्मानें करावयाची आहे. आपलीं कर्में त्याच्याकरिताच समर्पित करावयाचीं आहेत. या हेतूनें जो कर्मे करील, तो त्यांत कोणत्याही प्रकारचें न्यून ठेवणार नाहीं. ईश्वराला आपलीं कर्में अर्पण करण्यासंबंधानें गीतेंत पुढील वचनें आहेत—

यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्।
यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥
(गी. ९।२७)

मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः ।
निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव ॥
( गी. ११।५५)

अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।
मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥
(गी. १२।१०)

युक्त आसीत मत्परः। ( गी. २।६१; ६।१४ )

ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः।
अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥
( गी. १२।६ )

चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः।
बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥
(गी. १८।५७

' जें तूं करशील, जे खाशील, जें हवन करशील, जे देशील, जे तप करशील, तें मला (विश्वरूपाला) अर्पण कर. मज ( विश्वरूपा ) करिता कर्म कर. माझी (विश्वरूपाची) सेवा कर. दुसऱ्या कोणाच्या संगाचा विचारही करू नकोस. ( कारण विश्वरूप ईश्वरास सोडून दुसऱ्या कोणाचेंही येथें अस्तित्व नाहीं.) सर्व प्राण्याशीं निर्वैर व्यवहार कर माझ्या ( विश्वरूपाच्या ) सेवेकरिताच कर्म करण्याचा विचार तूं आपल्या मनाशीं करून ठेव. मज ( विश्वरूपा ) करिता कर्म केल्यानेंच तुला सिद्धि प्राप्त होईल मज-( विश्वरूपा ) करिताच तूं कुशलतेनें कर्म कर. जे सर्व कर्में मज (विश्वरूपा) करिताच अर्पण करितात, आणि अनन्य होऊन माझें ( विश्वरूपाचें ) ध्यान करतात, ते सिद्धि प्राप्त करतात आपली सर्व कर्में मन पूर्वक मला ( विश्वरूपाला ) अर्पण करून माझ्या ( विश्वरूपाच्या ) ठिकाणींच सतत आपलें चित्त स्थिर कर.'

या ठिकाणा आपलीं सर्व कर्में विश्वरूप परमेश्वराला अर्पण करण्याचा स्पष्ट भाव आहे. हा भाव सर्वांस माहीतही आहे पण सध्या लोकांचा असा समज आहे कीं, विश्वरूप हें भ्रमजाळ असून तें त्याज्य आहे, निराकार परमेश्वर याहून भिन्न आहे, आणि त्यालाच आपलीं कर्में समर्पित करावयाचीं आहेत. पण प्रत्यक्षाचा त्याग करून अप्रत्यक्षाच्या मागें लागणें, एवढाच याचा अर्थ आहे याचा परिणाम असा होतो कीं, हातचें जें प्रत्यक्ष आहे, तें सुटतें आणि अप्रत्यक्ष आहे, तें तर कधींच मिळत नाहीं !!

गीतेनें वर्णिलेलें विश्वरूप प्रत्यक्षही आहे आपणास काय पाहिजे आणि काय नको, हें तें विश्वरूप सांगत असताही तिकडे मुळींच लक्ष न देणा' मानवी शरिरानीं अवतीर्ण झालेल्या ईश्वराची निन्दा करणें ' (गी० ९।११) आणि जो कधींच बोलत नाहीं, त्याच्या मागें लागणें, हा मानवी व्यवहार उचित नव्हे पण तो सध्या असाच चालू आहे.

'मला अमुक वस्तु पाहिजे,' असें विश्वरूप परमेश्वर नेहमीं नानाविध मुखानीं प्रकट करीत असतो. उदाहरणार्थ, परमेश्वर शिष्यरूपानें येऊन ' मला विद्या शिकवा, ' असें म्हणतो अशा वेळीं निःपक्षपातानें अध्यापनरूप स्वकर्म करून त्या परमेश्वराची सेवा करणें, हेंच मनुष्यास उचित आहे मानवरूप धारण करून परमेश्वर दुकानावर वस्तु विकत घेण्याकरिता येतो त्या वेळीं त्याला न फसवलें जाईल, इकडे लक्ष द्यावें.

आपल्या या देशात परमेश्वरास योग्य तो नैवेद्य न मिळाल्यामुळें लक्षावधींच्या संख्येनें तो उपाशीपोटी मरू लागला आहे, त्याला औषधही मिळत नाहीं पण तेंच दुसरीकडे मात्र अन्न सडण्याकरितां फेंकून दिलें जात आहे हे अत्याचार काहीं कमी नाहींत! परमेश्वर हा विश्वरूप असल्यामुळें आमचा रात्रंदिवस चाललेला व्यवहार हा परमेश्वराशींच चालला आहे त्या व्यवहाराचें हें स्वरूप मात्र लक्ष देण्याजोगेंच आहे पण तिकडे कोण लक्ष देत आहे बरें ?

आगगाडीच्या डब्यात एक मनुष्य झोंपून दहा माणसांची जागा अडवितो यामुळें होणारे कष्ट विश्वरूपासच होत असतात एखादा व्यापारी आपल्या कोठारात लाखो रुपयांचें धान्य एकत्र करून ठेवतो, आणि मग तें महाग दरानें विकतो हें त्याचें कृत्य विश्वरूपाला कष्टदायकच ठरतें कोणी एक मनुष्य एक 'लिमिटेड कंपनी' निर्माण करतो, आणि व्यापारात अशी काहीं योजना करतो कीं, त्यामुळें लाखों लोकांच कष्ट वाढतात कोणी राज्यव्यवहाराची सूत्रें आपल्या हातीं घेऊन कोट्यवधि मनुष्यांच्या उन्नतीला प्रतिबंध करतात कोणी आपल्या स्वार्थाकरिताच युद्धें निर्माण करतात, आणि त्यात लाखों लोक मरतात आणि जखमी होतात हे सगळे कुव्यवहार परमेश्वराशींच होत असतात यामुळें विश्वरूप परमेश्वर त्रस्त होत आहे जोंपर्यंत त्याचा तो कोप शान्त होत नाहीं, तोंपर्यंत केवळ शस्त्रास्त्रें वाढवून शांति प्रस्थापित होणें कठीण आहे या सर्व लोकांच्या मनात विश्वसेवेचा भाव निर्माण झाला पाहिजे पण विश्वसेवेच्या स्थानीं 'मी विश्वाचा भोग घेईन, आणि अन्य लोकांस त्यापासून वंचित ठेवीन,' हा भाव वाढत आहे आणि वाढविला जात आहे जर या लोकांच्या मनात 'विश्वरूपाची सेवा करणें, हा आपला धर्म आहे,' हा भाव स्थिर होईल, तर ते या विश्वाचेंच स्वर्गांत रूपान्तर करतील पण सध्यातरी त्यांनीं या विश्वाला मृत्यूचें घर बनविलें आहे !!!

या विवेचनामुळें कर्में कशीं असावीं, हें स्पष्ट झालें जीं केवळ व्यक्तीच्या आसक्तीस कारण नाहींत, आणि जीं व्यक्ति आणि समाज यास घातक ठरणार नाहींत, पण ज्यामुळें विश्वरूप परमेश्वराची सेवा होते, त्यानाच कर्में म्हणावें आणि गीतेंत 'कर्म' शब्दानें त्याचाच उल्लेख केलेला आहे यजुर्वेदाच्या प्रारम्भींच म्हटलें आहे कीं-

देवो वः सविता प्रार्पयतु श्रेष्ठतमाय कर्मणे (वा० य० १।१)
आप्यायध्वम्।

'सर्व विश्वाला निर्माण करणारा देव तुम्हा सर्व मानवाना श्रेष्ठतम कर्म करण्याची प्रेरणा करो. आपण सर्व उन्नतिपथावर अग्रेसर व्हा.' या ठिकाणीं 'श्रेष्ठतम कर्म' असा शब्दप्रयोग आहे. हेतु आणि उन्नति याच्या अनुरोधानें कर्माचे कर्म, श्रेष्ठ कर्म, श्रेष्ठतर कर्म आणि श्रेष्ठतम कर्म असे चार भेद होतात. जें कर्म विश्वरूपाच्या सेवेकरितां केलें जातें, तेंच श्रेष्ठतम कर्म होय. म्हणून सर्वदा मानवानीं विश्वरूपाच्या सेवेकरिताच कर्म केलें पाहिजे

आपल्या जीवन–निर्वाहासाठीं आवश्यक असलेलीं कर्में कशा प्रकारें करावीत, असा एक प्रश्न या ठिकाणीं निर्माण होतो याचें उत्तर असें आहे कीं आपलें जीवनही विश्वरूप ईश्वराच्या विश्वरूप जीवनाशीं निगडित झालेलें आहे, हें अनुभविलें पाहिजे. आपण स्वत विश्वरूप ईश्वराशीं अनन्य, अपृथक् आणि म्हणून विश्वरूपातच समाविष्ट आहोत, असा विश्वास अनुभवानें उत्पन्न झाला पाहिजे. असा विचार मनात स्थिर झाला, म्हणजे आपलें अस्तित्वही विश्वरूपाच्या अस्तित्वाशीं एकरूप होऊन जाईल आणि मग स्वत.च्या जीवननिर्वाहाकरिता केलेलीं कर्मेंही विश्वरूपाकरिता केलेलीं कर्मेंच आहेत असें होईल. याचाच अर्थ 'अकर्मात कर्म होणें' (गी० ४।१८) असा आहे

सर्वसाधारणपणें विश्वरूपाला परमेश्वर मानणारा मनुष्य प्रारम्भीं असें समजत असतो कीं, "मी जिवन्त राहून विश्वरूप ईश्वराची सेवा करावी, याकरिता मी जेवतो ही सेवा यथायोग्य व्हावी, म्हणून मी व्यायाम करतों विश्वरूपाच्या सेवेविषयींचा माझा उत्साह वाढावा, याकरिता मी विश्रांति घेतों"

प्रारम्भीं हेच भाव मनुष्याच्या मनात स्वत च्या जीवनासंबंधीच्या कर्माविषयी असतात पण त्याला विशेष योग्यता प्राप्त झाली, म्हणजे तो स्वत.च विश्वरूपाचे अंग होऊन कार्य करतो, आणि विश्वरूप आणि तो स्वत. यांत वेगळेपणा रहात नाहीं. याचेंच नाव 'अनन्यभाव' होय.

तात्पर्य, अखण्ड विश्वरूपाची सेवा करण्याच्या सद्भावनेनें आणि अनन्यभावानें जीं

चीच सेवा करतो, कारण असेंच करणे त्याला शक्य असतें संपूर्ण शरिराची सेवा एकाच वेळीं करता येणें तर त्याला कधीं शक्यच नाहीं एका वेळीं एकाच अवयवाची सेवा होणे शक्य आहे पण तो अवयव आपल्या पित्याच्या अखण्ड शरिराचाच एक अवयव आहे, हें ओळखून जर ती सेवा त्यानें केली, तरच ती निर्दोष ठरेल शक्य जो अवयव दुखानें पीडित असतो, अथवा ज्यात कांहीं कमीपणा असतो, त्याचीच आपण सेवा शुश्रूषा करीत असतों निरोग अथवा निर्दोष शरिराची सेवा करण्याचे काहा कारणच नाहीं याचप्रमाणें विश्वरूपातही ज्या ठिकाणीं सेवेची आवश्यकता असेल, त्याच ठिकाणीं सेवा करणें इष्ट आहे आणि ती विश्व-सेवा विश्व हें अखण्ड एकरस आहे, या भावनेनें केली पाहिजे

खण्डित भावानें केलेल्या सेवेनें अनर्थच निर्माण होतील आता विश्वरूपाची सेवा कशी आणि कोठून सुरु करायची, याचा विचार केला पाहिजे विश्वरूपात ज्या ठिकाणी कष्ट होत असतील, तेथें जाऊन सेवा केली पाहिजे दलित जाती, पददलित देश, ज्या ठिकाणी अजून मानवता प्रकट झाली नाहीं अशीं स्थानें, हीं सेवा करण्यास योग्य अशीं क्षेत्रें होत आपण ही अखण्ड परमात्म्याची सेवा करीत आहात, अशा भावनेनच सेवा करी पाहिजे कारण खण्ड-भावनेनें केलली सेवा ही अनर्थास कारण होते, हें आपण या पूर्वीं पाहिलेच आहे

अशा रीतीनें विचार केला असता असें आढळून येतें कीं, मनुष्याच्या पुढें हें सेवेचें अत्यन्त विस्तीर्ण क्षेत्र आहे कितीही माणसें सेवा करू लागलीं, तरी तें क्षेत्र संपण्यासारखे नाहीं, एवढें हें कार्य प्रचण्ड आहे आजपर्यंत वेद, उपनिषदें आणि गीता यानीं हा विश्वसेवेचा उपदेश केलेला असूनही तो फारसा कोणास ऐकू गेला नाहीं वैदिक ऋषिमुनींनीं हें विश्वसेवेचें कार्य फल दरें, पण पुढें ती प्रथा बन्द पडली गीताकारानें पुन श्रीकृष्णानीं त्या कामाला प्रारम्भ केला होता पण पुढें तें कार्य पुढें चालविणारा कोणी निर्माण झाला नाहीं, म्हणून तें बंद पडलं आता आपणास त्याचा पुनरुद्धार केला पाहिजे

## सनातन धर्म

तसें पाहिलें तर आमचा सनातन धर्म हा विश्वसवेचाच धर्म आहे 'सना-तन'

या शब्दाचा अर्थच " सेवाभावाचा प्रसार करणें ' असा आहे. ' सन् ' धातूचा अर्थ ( सन् संभक्तौ) सम्यक् भक्ति म्हणजे सम्यक् सेवा करणें, असा आहे. " तन " चा अर्थ विस्तार असा होतो. अर्थात् ' सना-तन ' चा अर्थ ' विश्वरूपाची सेवा करण्याच्या कार्याचा विस्तार करणें,' असा आहे. सनातन धर्म हा संपूर्ण विश्वरूपाच्या सेवेनें त्याची प्रसन्नता संपादन करण्याचाच विचार करणारा धर्म आहे. तो लहान लहान भागांचा विचार करीतच नाहीं. याच्यानंतर निर्माण झालेली मतमतांतरें मात्र आपापल्यापुरताच विचार करतात व अखण्ड विश्वरूपाचा विचारही करीत नाहींत. हा भेद ' सनातन धर्म ' व अन्य धर्म यांत आहे, हें येथें लक्षांत ठेवावें. )

परमेश्वराच्या विश्वरूपाची सेवा अनन्यभावानें करण्यानेंच सगळ्यांचें तारण होऊं शकेल, हें सत्य सनातन धर्मानें ओळखलें आणि तें वेदमुखानें प्रकटही केलें. उपनिषदें आणि गीता, यांनीं त्याचाच अनुवाद केला. याप्रमाणें विश्वरूपाची अनन्य आणि अखण्ड सेवा करणें, हाच मनुष्याचा शाश्वत धर्म अनादि कालापासून ठरला आहे.

जेवढें-जेवढें या धर्माचें आचरण होत जाईल, तेवढें-तेवढें मानवतेचें रूप उज्वल होत जाईल. सर्व आर्य शास्त्रांत याच विश्वसेवारूप धर्माचें वेगवेगळ्या पद्धतीनीं विवरण केलें आहे. उदाहरणार्थ—

त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः।
यज्ञदानतपः कर्म न त्याज्यमिति चापरे ॥३॥
यज्ञदानतपः कर्म न त्याज्यं कार्यमेव तत्।
यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥५॥
एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च।
कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥६॥
(गी० १८)

" कर्माचा त्याग हा दोषाची वृद्धि करणारा आहे, म्हणून यज्ञ, दान आणि तपरूप कर्में केलींच पाहिजेत. यांचा त्याग करणें कधींही योग्य नव्हे. हीं कर्में मनुष्यास पवित्र

करणारीं आहेत. फलाचा त्याग करून आणि भोगाचा संग सोडून हीं कर्मे करणेंच योग्य आहे, असें माझें निश्चित आणि उत्तम मत आहे " कर्मविषयीं भगवन्ताचा हा असा आदेश आहे. यावरून यज्ञ–दान–तप हीं कर्मे करणें प्रत्येकास आवश्यक आहे, हें सिद्ध झालें.

## तप

तप हें शीत आणि उष्ण सहन करून आपले सामर्थ्य वाढविण्याचें एक उत्तम साधन आहे गीतेंत केलेले तपाचें वर्णन पुढीलप्रमाणें आहे–

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम्।
ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥१४॥
अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत्।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥१५॥
मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः।
भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥१६॥
श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः।
अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥१७॥
सत्कारमानपूजार्थं तपो दम्भेन चैव यत्।
क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥१८॥
मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः।
परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥१९॥
अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः।
दम्भाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥५॥
कर्षयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः।
मां चैवान्तःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ॥६॥
(गी० १७)

या ठिकाणीं तपाचें जें विस्तारपूर्वक वर्णन केलें आहे, तें विचारपूर्वक पाहणें योग्य आहे. येथें कांहीं उदाहरणें देऊन शारीरिक वाचिक आणि मानसिक तपाचें स्पष्टीकरण करीत आहों.

**१. शारीरिक तप—** देव, ब्राह्मण, गुरु आणि विद्वान् यांचा सत्कार करणें पवित्रतेची वृद्धि करणें, व्यवहारांत सरळपणा ठेवणें, ब्रह्मचर्याचें पालन करणें, आणि अहिंसेचें आचरण करणें, हीं शारीरिक तपें होत.

अहिंसायुक्त वर्तनानें निर्वैर भाव वाढतो व त्यायोगानें सर्व सामाजिक संघर्ष दूर होऊं शकतात, हें या ठिकाणीं विचारांत घेण्याजोगें आहे. ब्रह्मचर्य पाळल्यानें वीर्य स्थिर होऊन त्यायोगें आरोग्य, बल आणि दीर्घ आयुष्य प्राप्त होऊं शकतें. एवढेंच नव्हे तर गृहस्थाश्रमातही ब्रह्मचर्याच्या पालनानें व्यभिचार वगैरे अनेक सामाजिक दोष दूर होतात. ( आर्जव ) सरळ व्यवहारानें लबाडी, कपट, इत्यादि सर्व कुटिल व्यवहार दूर होतात. ( शौच ) शुद्धता आणि पवित्रता यांमुळें वैयक्तिक, ग्रामीण आणि राष्ट्रीय आरोग्य वाढतें. विद्वानाचा गौरव होत असल्यामुळें इतरांस विद्वान् होण्याविषयीं उत्तेजन मिळतें. याप्रमाणें या तपाचें राष्ट्रीय महत्त्व फार आहे, तें वाचकानीं जाणावें.

**२. वाचिक तप—** जेणेंकरून दुसऱ्याचें मन न दुखेल असें बोलणें, सत्य भाषण करणें, त्यातही खरेपणा आणि हितकारित्व आणि स्वाध्याय, हें वाचिक तपाचें लक्षण आहे. सर्वदा उत्तम ग्रन्थांचें अध्ययन करून आपलें ज्ञान वाढवीत असणें, सत्य, प्रिय आणि हितकारक तेंच बोलणें, कधींही असत्य, अप्रिय आणि अहितकारक भाषण न करणें, तसेंच फोणाम टोचेल असेंही न बोलणें, हें वाचिक तप होय. या तपानें वाचिक कर्माचें स्वरूप समजून येईल.

**३. मानसिक तप—** मन प्रसन्न ठेवणें, सौम्यता धारण करणें, मौन पाळणें अर्थात् अधिक न बोलणें, आत्मसंयम अथवा मनोनिग्रह पाळणें आणि मनोभावनांना शुद्ध आणि पवित्र करणें, हें मानसिक तप होय. अर्थात् हीं मानसिक कर्में होत. हीं कर्में आचरल्यानें केवळ वैयक्तिकच नव्हे, तर सामाजिक आणि राष्ट्रीय स्वास्थ्याचाही लाभ होतो.

**४. सात्त्विक तप—** फलाची आशा न धरतां योगयुक्त होऊन अर्थात् यम पाळून जें पूर्वोक्त तप केलें जातें, त्यास सात्त्विक तप असें म्हणतात. याचे शारीरिक, वाचिक आणि मानसिक असे तीन भेद होतात.

५ **राजस तप**— आपला सन्मान व्हावा, आपली कीर्ति वाढावी, या हेतूने आन्तरिक इच्छा नसताही केवळ देखावा निर्माण करण्याकरिता जें दांभिक तप आचरले जाते, त्या क्षणिक फल देणाऱ्या तपास राजस तप असे म्हणतात हेंही शारीरिक, वाचिक आणि मानसिक असें तीन प्रकारचें असू शकते

याचीं कितीतरी उदाहरणे देता येतील एखाद्या पाठशाळेला दान दिले, तर तेथें आपला पुतळा ठेवण्याची अट घालणें, हें आणि यात प्रकारची कृत्यें राजस तपाचीं समजावी यामुळेंही राष्ट्रास थोडासा लाभ होतच असतो

६ **तामस तप**— मूर्खपणानें, अनात्मतेपणामुळें, आपल्या शरीरास पीडा देऊन दुसऱ्याचें अनिष्ट करण्याकरिता केलेल्या तपाला तामस तप असें म्हणतात हेंही वर सांगितलेल्या तीन प्रकारानीं युक्त असतें यामुळें क्लेश वाजत असल्यामुळें हें टाळावें हेंच बरें

अशास्त्रीय पद्धतीनें, दम्भ आणि अहङ्कारानें युक्त, काम, राग आणि बल यानीं प्रेरित होऊन, स्व शरीरास अत्यंत कष्ट देऊन आणि आत्म्यासही दु ख देऊन जें तप आचरिलें जातें, तें आसुरी तप होय हें स्वत करणाऱ्यास आणि अन्य लोकास कष्ट देणारें आहे म्हणून हें आसुरी तप करणें योग्य नव्हे

तपानें किती प्रकारच्या कार्यांचा अन्तर्भाव होतो, त्याचें या ठिकाणीं संक्षेपानें वर्णन केलें आहे याचा विचार केला असता असें कळून येईल कीं, यापैकीं सात्त्विक आणि राजस या जातींचीं शारीरिक, वाचिक आणि मानसिक तपें आचरणें योग्य आहे पण तामस तपानें सर्वांसच क्लेश होत असल्यामुळें त्यापासून दूर राहणेंच योग्य ठरेल

## दान

आता दानाचा विचार करूं दानातही सात्त्विक, राजस व तामस असे तीन भेद आहेत ज्याना आवश्यकता असेल, त्यानाच दान दिलें जावें, ती आवश्यकता पूर्ण करण्याकरिता मिळेल दान हें व्यक्तीकडून किंवा समाजाकडून होणारें अत्यन्त महत्त्वाचें सामाजिक कार्य आहे याविषयीं गीता म्हणते—

दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे।
देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥२०॥

यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ।
दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥२१॥
अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।
असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥२२॥ (गी. १७)

**१. सात्त्विक दान—** दान देणें योग्य आहे, आणि दान देणें आपलें कर्तव्य आहे, असें ओळखून प्रत्युपकाराची इच्छा न धरता, योग्य स्थानीं, योग्य कालीं आणि योग्य मनुष्यास जें दान दिलें जातें, त्यास सात्त्विक दान असें म्हणतात. हें सात्त्विक दान सगळ्यांचें कल्याण करणारें आहे. दान घेणाऱ्यास देणाऱ्याची आणि दान देणाऱ्यास घेणाऱ्याची माहिती नसावी, असें गुप्त दान व्हावें; पण योग्य वेळीं योग्य मनुष्यास दान दिलें जावें. अशा दानास सात्त्विक दान असें म्हणतात.

**२. राजस दान—** जें परतफेडीच्या इच्छेनें दिलें जातें, ज्यात फलाची इच्छा केली जाते, आणि जें अति कष्टानें दिलें जातें, तें राजस दान समजावें. थोड्या प्रमाणात या दानानेंही लाभ होतोच. पण घेणारा आणि देणारा, दोघांसही क्लेश होत असल्यामुळें हें दान मध्यम प्रतीचें आहे.

**३ तामस दान-** देश, काल आणि पात्र याचा विचार न करतां, सत्कार करण्याचा विचार सोडून, दुसऱ्याचा अपमान करण्याकरिता जें दान दिलें जातें, तें तामस दान समजावें. या तामस दानानें दानाचें फल तर मिळत नाहींच, पण सर्वांसच क्लेश मात्र होतात, म्हणून अशा रीतीनें दान करणें योग्य नव्हे.

या ठिकाणीं गीतेनें सात्त्विक, राजस आणि तामस दानाचा विचार करून जनतेला दान-विषय अगदीं स्पष्टपणें समजाविला आहे. दान हें धर्माचें जीवनच आहे. जे सामर्थ्यवान् आहेत, त्यांनीं असमर्थांस आपल्या सामर्थ्याचें दान करणें अत्यंत आवश्यक आहे. हें दान करण्यासंबंधीं गीतेनें केलेले निर्देश बहुमोल आहेत. याचा योग्य विचार करून सर्वांनीं आपली दातृत्वभावना सुधारली पाहिजे. या दानानें विश्वरूप ईश्वराची सेवा घडत आहे कीं विश्वरूपाचे क्लेश वाढत आहेत, तें पाहिलें पाहिजे.

## यज्ञ

मनुष्याचें जीवन यज्ञमयच झालें पाहिजे. 'क्रतुमयोऽयं पुरुषः' असें उपनिषद्वाक्य

आहे, तें विचारणीय आहे. गीतेनें या यज्ञाचे तीन विभाग करून यज्ञ कसा करावा आणि कसा करू नये तें समजाविलें आहे पहा—

> अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।
> यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥११॥
> अभिसंधाय तु फलं दम्भार्थमपि चैव यत् ।
> इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥१२॥
> विधिहीनमसृष्टान्नं मन्त्रहीनमदक्षिणम् ।
> श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥१३॥
> (गी १७)

**१. सात्त्विक यज्ञ**– फल–भोगाची इच्छा न करता विधियुक्त आणि कर्तव्य-बुद्धीनें जो यज्ञ केला जातो, त्यास सात्त्विक यज्ञ म्हणतात.

**२. राजस यज्ञ**– फलभोगाच्या इच्छेनें, दंभानें, आपलें महत्त्व वाढविण्याच्या हेतूनें केलेल्या यज्ञास राजस यज्ञ म्हणतात.

**३. तामस यज्ञ**– विधीस सोडून, मन्त्र न म्हणता, अन्नदान आणि दक्षिणा न देता श्रद्धारहित अन्त करणानें केलेल्या यज्ञास तामस यज्ञ म्हणतात.

याप्रमाणें गीतेनें यज्ञाचें वर्णन केलें आहे. गीतेनें केलेला हा यज्ञाचा व्यापक अर्थ साधकानी लक्षात आणावा. द्रव्ययज्ञ, स्वाध्याययज्ञ, तपोयज्ञ, योगयज्ञ असे अनेक वैयक्तिक, सामाजिक आणि राष्ट्रीय यज्ञ गीतेतील चवथ्या अध्यायात सांगितले आहेत. मनुष्याचें जीवन यज्ञमय बनविण्याच्या दृष्टीनेंच गीता या सर्व यज्ञाचा विचार करते, हें उघड आहे केवळ हवनसामग्रीचा यज्ञ, हें यज्ञाचें प्रतीकमात्र आहे गीतेच्या दृष्टीनें बुद्धि, मन, प्राण, इंद्रियें, शरीर, समाज आणि राष्ट्राचे संपूर्ण व्यापार हे यज्ञातच अन्तर्भूत होतात. एवढ्या व्यापक दृष्टिकोणातून गीतेनें यज्ञाचा विचार केला आहे. हे सगळे यज्ञ सात्त्विक, राजस आणि तामस असे तीन प्रकारचे होत असल्यामुळे, कोणतें कर्म कोणत्या विभागांत बसतें, हे प्रत्येकानें विचार करून ठरवावें. येथें या विषयाचा अधिक विस्तार करण्याची आवश्यकता नाहीं.

येथे यज्ञ, दान आणि तप यांचें स्वरूपच पाहणें होतें, तें आतापर्यंत पाहिलें आहे

करिता आपल्या सहज कर्मांचा त्याग करणें योग्य नव्हे

यज्ञामध्यें ' देवपूजा + संगतिकरण + दान ' हीं तीन कर्में मुख्य असतात सत्कार करण्यास योग्य अशा सज्जनाचा सत्कार, जनतेचें संघटन आणि हीन-दीनास त्याची सहायता करण्याकरिता दान, याचेंच नाव यज्ञ यानेंच संपूर्ण राष्ट्राचें धारण होतें या यज्ञात दुसऱ्याही अनेक सत्कर्मांचा अन्तर्भाव होतो, त्याचा सुज्ञानी विचार करून तो जाणावें आम्हाला येथें यज्ञाचें लक्षण सांगावयाचें आहे, तें हें कीं, ज्या ठिकाणीं श्रेष्ठ पुरुषाचा सत्कार होतो, समाजाचें संघटन होतें आणि पतितोद्धाराचें कार्य होतें, तो यज्ञ होय प्रत्येक कर्म या कसोटीवर पारखून तें यज्ञ ठरतें कीं नाहीं, तें पाहिलें पाहिजे

## कर्में कशीं करावींत ?

कर्में करताना तीं कशीं करावींत, याचाही विचार करणें अथ आवश्यक आहे याविषयीं गीतेचे निर्देश अगदीं स्पष्ट आहेत—

**योगस्थः कुरु कर्माणि॥ (गी० २।४८)**

"योगात स्थिर होऊन कर्म करा ' अशी कर्मविषयीं गीतेची आज्ञा आहे. योगाचा अर्थ काय, असा प्रश्न या ठिकाणीं निर्माण होणें अगदीं स्वाभाविक आहे. याविषयीं गीता म्हणते—

**योग. कर्मसु कौशलम् ।** (गी २।५०)
**समत्वं योग उच्यते ।** (गी २।४८)
**समाधौ अचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ।** (गी २।५३)
**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त. ।** (गी १२।६)

यावरून हें स्पष्ट झालें कीं, (१) कर्मांतील कुशलता, (२) समभाव, (३) चाचल्य-रहित बुद्धि आणि (४) अनन्यभाव यांचें नांव योग असें आहे अशा चतुर्विध योगा-नेंच कर्में केलीं पाहिजेत (१) कौशल्य (Skill in action), (२) समवृत्ति (equanimity), (३) चचलतारहित बुद्धि ( immovable resolute mind ) आणि (४) अनन्यभाव (identity) या चार कसोट्यानीं हें कर्म योगास अनुसरून झालें कीं नाहीं, हें सिद्ध होऊं शकतें आप्रमाणें या चार प्रकारानीं परीक्षा करूनच कर्में केलीं पाहिजेत याविषयीं गीतेच मागील निर्देश पाहणें योग्य आहे—

असेच कर्माविषयीं निर्देश गीतेंत सांगितले आहेत 'ईश्वर विश्वरूप आहे, मीही त्या विश्वरूप ईश्वराहून भिन्न नाहीं, आणि म्हणून मी जें कर्म करीत आहे, तें ईश्वरासींच करीत आहे' अशा भावनेनें प्रत्येकानें कर्म केलें पाहिजे. हेंच कर्म मनुष्याची उन्नति करणारें असल्यामुळें मनुष्यानें याचें आचरण अवश्य करावें

आपलीं सर्व कर्मे ईश्वरासीच होत आहेत, तीं ईश्वरालाच समर्पित होत आहेत, या भावनेनें मनुष्य कर्म करीत असल्यास त्याच्याकडून विपरीत कर्म होणें शक्यच नाहीं

त्या वेळीं आपणास कोण्या सत्पुरुषाकरिता एखादें कर्म करावयाचें असतें, त्या वेळीं आपण तें कर्म किती व्यवस्थित करतो, हें सर्व जाणत असतातच मग तेंच कर्म जर विश्वात्म्याकरिता करणें असेल, तर आपण तें विशेषच काळजीपूर्वक करू, हें काय निराळें सांगितलें पाहिजे? सध्या विश्वरूप ईश्वराचीच कल्पना लुप्त झाल्यामुळें मनुष्य आपल्या कर्माविषयीं फारशी काळजी घेत नाहीं, म्हणूनच भगवद्गीतेनें विश्वरूप ईश्वराचें दर्शन करवून मनुष्यास सावध केलें आहे या विश्वरूप ईश्वरसेवेच्या भावनेनें मनुष्या-कडून कधींही दोषयुक्त कर्म होणार नाहीं या योगानें प्रतिक्षणीं कर्मांची शुद्धता वाढतच जाईल, आणि त्याबरोबर मनुष्याची उन्नतीही होत जाईल असा हा कर्मयोग सर्वांकरिता असून प्रत्येकास त्याचा अधिकार आहे

## चार वर्णांचीं कर्मे

या कर्मयोगात ब्राह्मण ज्ञानप्रसाराच्या द्वारें, क्षत्रिय जनतेचें रक्षण करून, वैश्य कृषि आणि व्यापाराच्या द्वारें आणि नानाप्रकारच्या कला कौशल्याचीं कर्मे करून शूद्र, असे हे चार वर्ण राष्ट्रकार्य करीतच असतात हेंच कार्य जर अनन्यभावानें होईल व ईश्वर विश्व-रूप आहे व त्याची सेवा करावयाची आहे या भावनेनें होईल, तर केवढा मोठा कार्यभाग होईल, याची प्रत्येकानें कल्पना करावी. अर्थात् कर्मयोग हा केवळ चर्चेचा विषय नसून जनतेच्या समोर ठेवलेला तो एक राष्ट्रीय किंवा सर्वोपयोगी सार्वजनिक कार्यक्रम आहे. राष्ट्रकार्य करणारांनी याचें ज्ञान करून घेतलें पाहिजे आणि याचें आचरण तर अवश्यमेव केलेंच पाहिजे

# कर्मफलत्यागानें व्यवहार होऊं शकतो काय ?

गीतेनें कर्म-फल-त्यागाचें फार मोठें महत्त्व वर्णन केलें आहे असेंही म्हणतां येईल कीं, **कर्म-फल-त्यागाचा** सिद्धांत, हेंच गीतेचें वैशिष्ट्य आहे म्हणून याचा विशेष विचार करणें आवश्यक आहे. प्रथम आपण गीता '**कर्म-फल-त्याग**' या शब्दाचा अर्थ काय करतें तें पाहूं आणि नंतर व्यवहारांत त्याचा उपयोग होऊं शकतो कीं नाहीं, होऊं शकत असेल तर कोणत्या पद्धतीनें, तो लाभदायक होईल कीं नाहीं, याचा विचार करूं.

## कर्म-फल-त्यागाचा अर्थ व कर्माचें स्वरूप

प्रथम "**कर्म-फल-त्याग**" या शब्दाच्या अर्थाचा विचार करूं. "**कर्म**" म्हणजे काय, "**कर्माचें-फल**" कोणतें, त्या "**कर्म-फलाचा त्याग**" म्हणजे काय, असे तीन प्रश्न येथें निर्माण होतात.

"**कर्म**" या शब्दाचा अर्थ आपण "कर्मयोग" या लेखांत पाहिला आहे. जें निषिद्ध अथवा हानिकारक नाहीं, जें केवळ व्यक्तीच्याच अस्तित्वाकरितां उपयोगी पडणार नाहीं, आणि जें विश्वरूप ईश्वराची सेवा व पूजा करण्याकरितांच केलें जातें, त्याचें नांव कर्म होय. आपल्या कर्मानेंच विश्वरूपाची म्हणजे ईश्वराची पूजा केली पाहिजे. या पूजेसाठीं केलेल्या वृत्तीस कर्म असें नांव आहे—

> शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च ।
> ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥४२॥
> शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।
> दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥४३॥

कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यं कर्म स्वभावजम् ।
परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥४४॥
स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।
( गी० १८)

**ब्राह्मणाचीं कर्में**— इन्द्रियांचें शमन, आत्मसंयम, शीतोष्ण सहन करण्याचें तप, शुद्धता, क्षमा, सरळपणा, ज्ञान–विज्ञान, आणि आस्तिक्य हीं ब्राह्मणाचीं स्वभावज कर्में आहेत ज्ञान हें ब्राह्मणांचें कार्य-क्षेत्र आहे.

**क्षत्रियाचीं कर्में**— शौर्य, तेजस्वीपणा, धैर्य, दक्षता, युद्धापासून परावृत्त न होणें, दान देणें, प्रभुत्व ( अधिकार चालविणें) हीं क्षत्रियाचीं स्वभावज कर्में आहेत राष्ट्रचें संरक्षण, हें क्षत्रियांचें कार्यक्षेत्र आहे

**वैश्याचीं कर्में**—शेती, पशूंचें संरक्षण आणि व्यापार, हें वैश्यांचें कार्यक्षेत्र आहे

**शूद्राचीं कर्में**- इतर तीन वर्णांची सेवा,(आणि अन्य स्मृतींत सांगितल्याप्रमाणें विविध शिल्पकला,) हें शूद्रांचें कार्यक्षेत्र आहे

**सूचना**— प्रत्येक मनुष्यानें आपलें नियत कर्म करावें या नियत कर्मांच्या द्वारेंच त्याला उच्च पद प्राप्त होऊं शकतें एखाद्या क्षत्रात प्राविण्य मिळविलेल्या मनुष्यानें आपलें कर्म सोडून दुसऱ्याचे कर्म करण्यास प्रवृत्त होऊं नये यामुळें करणारास संरक्षण ( protection ) मिळतें, आणि स्पर्धाही कमी होते म्हणून कोणीही मनुष्यानें स्वकर्म सोडूं नये, हा नियम नि:संशय राष्ट्रीय महत्त्वाचा आहे

ज्या देशांत मनास वाटतील तीं कर्में करण्याची मनुष्यास मुभा असेल, त्या ठिकाणीं स्पर्धा आणि अशान्तता वाढणें हें अगदीं स्वाभाविकच आहे म्हणूनच म्हटलें आहे—

श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात् स्वनुष्ठितात् ।
स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥४७॥
सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत् ।
( गी १८ )

" आपलें कर्म गुणहीन अथवा कष्टदायी असलें, आणि दुसऱ्याचें जरी अगदीं महज होणारें असलें तरी आपलें कर्म सोडूं नये. आपलेंच कर्म करणें श्रेयस्कर आहे "

वरील वचनांचा विचार केला असतां हें कोणासही कळून येण्याजोगें आहे कीं, ज्ञान-क्षेत्र, शौर्यक्षेत्र, वणिक्-क्षेत्र, आणि कलाक्षेत्र हीं इतर सर्व देशांत असणारीं चार क्षेत्रेंच *या ठिकाणीं सांगितलीं आहेत. या चार क्षेत्राच्या विचारानें सर्व राष्ट्रांतील कार्य-*क्षेत्रांचा विचार होत आहे

ब्राह्मणाच्या ज्ञानक्षेत्रांत सर्व प्रकारचें ज्ञान आणि विज्ञान यांची उन्नति आणि ज्ञान-प्रचाराचीं कार्ये येतात उपदेश करणारे, अध्यापक, सभांचीं कार्ये, नाना प्रकारचीं विज्ञानाचीं कार्ये या सर्वांचा अन्तर्भाव या क्षेत्रांत होतो

क्षत्रियाच्या राष्ट्र-संरक्षणाच्या क्षेत्रांत राष्ट्राची अन्तर्गत आणि बाह्य संरक्षणाची व्यवस्था, सेना-विभाग, निरनिराळे दुर्ग, वैमानिक विभाग इत्यादींचा अन्तर्भाव होतो

वैश्याच्या क्षेत्रांत सर्व प्रकारची शेती, धान्यें, फळें, फुलें, यांची उपज करण्याची व्यवस्था, त्यांची विक्री, त्यासंबंधीचा व्यापार, गाई, घोडे इत्यादि पशूंचें पालन, पशूंच्या गुणाचें संवर्धन, इत्यादि कार्यांचा समावेश होतो.

शूद्राच्या कार्यक्षेत्रांत नाना प्रकारच्या कला-कौशल्याचीं कामें इत्यादि अन्तर्भूत होतात

राष्ट्राच्या ज्या ज्या म्हणून आवश्यकता असतात, आणि ज्या नवीन आवश्यकता परिस्थितीप्रमाणें निर्माण होतात, त्या सर्व या चारही कार्य-क्षेत्रांत सामावल्या जातात कोणतीही आवश्यकता पूर्ण न होईल असा संभव या व्यवस्थेत नाहीं. सर्व राष्ट्रीय कर्मांचें हें स्वरूप येथें स्पष्ट झालें आहे

## कर्म केलेंच पाहिजे !

प्रत्येक मनुष्यानें आपापलें कर्म केलेंच पाहिजे कोणासही स्वकर्म सोडण्याचा अधिकार नाहीं. पहा—

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।
मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥

(गी. २।४७)

"मनुष्यास कर्म करण्याचा अधिकार आहे. फलावर त्यांचा अधिकार नाहीं. कोणीही फलाच्या इच्छेनें कर्म करूं नये, आणि कर्मत्यागही कोणी करूं नये." अर्थात् प्रत्येकानें आपलें नियत कर्म केलेंच पाहिजे, आणि तें कर्तव्य समजून केलें पाहिजे. "मला या कर्माचें फल मिळावें," या इच्छेनें तें करू नये आणि 'मला फल मिळत नाहीं,' म्हणून त्या कर्माचा त्यागही करूं नये. राष्ट्रांतील सर्व मानवसमाज अशा प्रकारें कर्मांनीं बांधला गेला आहे.

सर्व राष्ट्रांतील समाज अशा रीतीनें ब्राह्मण–क्षत्रिय-वैश्य शूद्र या चार वर्णांत वांटला केला आहे. या वर्ण–व्यवस्थेच्या बाहेर कोणीही राहूं शकत नाहीं. जे लोक जंगली आहेत, तेही शूद्रांतच अन्तर्भूत होतात, त्याना असच्छूद्र असें म्हणतात. हे चारही वर्ण आपापल्या कर्मांनीं बांधले गेले आहेत. यांनीं आपापलें नियत कर्म करीत राहिलें पाहिजे, फल मिळो अथवा न मिळो, कोणालाही कोणत्याही अवस्थेंत स्वतःचें कर्म सोडण्याचा अधिकार नाहीं इतकेंच नव्हे, तर आपलें कर्म सोडून दुसऱ्याचें कर्म करणेंही योग्य नाहीं.

प्रत्येक वर्णाच्या मनुष्याकरिता गीता हाच आदेश देत आहे कीं, राष्ट्रांतील सर्व मनुष्यांनीं आपापल्या नियत कर्मांत दक्ष व प्रवीण असावें हीं कर्में कौशल्यानें करणेंच आवश्यक आहे ' कर्माचें फल न मिळाल्यामुळें मी आपलें कर्म कसें तरी करून टाकीन,' हें चालणार नाहीं. शक्य तेवढ्या दक्षतेनें व कौशल्यानें सर्व कर्में केलीं पाहिजेत. म्हणून म्हटलें आहे—

**योगस्थः कुरु कर्माणि।** ( गी. २।४८ )

जें आपलें करावयाचें कर्तव्य कर्म असेल, तें अत्यन्त कौशल्यानें केलें पाहिजे, कसें तरी करणें योग्य नव्हे. आणि हें करूनसुद्धा—

**मा कर्मफलहेतुर्भूः।** ( गी. २।४७ )

' आपल्या कर्माच्या फलाची आशा करूं नये.' अर्थात् कर्माचें फल मिळो अथवा न मिळो, या दोन्ही अवस्थांत आपलें कर्म उत्तमांत उत्तम रीतीनें केलें पाहिजे. भगवान् स्वतः आपल्याविषयीं म्हणतात—

**न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा।** (गी ४।१४)

'माझी कर्मफलांवर इच्छा नसल्यामुळें मला कर्मांमुळें निर्माण होणारा दोष लागत नाहीं.' आणखी पुढें ते म्हणतात—

न मे पार्थाऽस्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।
नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥
यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः ।
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥
उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।
संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥२४॥

(गी. ३)

" अर्जुना ! मला कोणतेंही कर्म करण्याची आवश्यकता आहे असें नाहीं, मला मिळवावयाचें असेंही कांहीं नाहीं, ज्यासाठीं मला कर्मे करण्याची आवश्यकता भासूं शकेल असें असूनसुद्धा मी कर्मे करीतच असतो. जर मी कर्मे केलें नाहीं तर लोकही कर्मे करणार नाहींत आणि जनतेमध्यें संकर होऊन मोठा अनर्थ होईल." हें स्वतः भगवन्तांनीच म्हटलें आहे. भगवान् श्रीकृष्णाला सर्व प्रकारचीं सुखें प्राप्त होतीं. अप्राप्त असें कांहीं नव्हतें. फळाची अपेक्षा नसतांदेखील ते सतत कर्मे करीत असत. हेंच सर्वांनी घेण्याजोगें उत्तम उदाहरण आहे. किंबहुना हाच मानवांपुढें उत्कृष्ट आदर्श आहे.

जर असलेल्या स्थितींतच सन्तुष्ट राहून ब्राह्मणांनीं आपलें अध्यापन आणि ज्ञानप्रसाराचें कार्य सोडून दिलें; जर क्षत्रियांनीं आपल्याच भोगसुखांत निमग्न राहून जनतेच्या संरक्षणाच्या कार्याकडे दुर्लक्ष केलें, जर भरपूर पैसा मिळाल्यावर वैश्यांनीं पशुपालन, व्यापार आणि शेती यांचा त्याग केला आणि जर शूद्रांनीं आपल्या कला-कौशल्याची उन्नति केली नाहीं व ते आळशी झाले तर राष्ट्राचा नाशच झाला, असें समजावें. आणि राष्ट्राचा नाश म्हणजे सर्वस्वाचाच नाश होय. म्हणून कितीही सुखसंपत्ति वाढली असली, तरी स्वकर्माचा त्याग करणें कोणासही योग्य नाहीं.

"कर्मत्याग करूं नये !" या आदेशांतच गीतेचें वैशिष्ट्य आहे राष्ट्राच्या सुस्थितीचा कर्माशीं संबन्ध आहे आणि मानवसमाजाची सुस्थिति कर्मावरच अवलंबून

आहे म्हणून कर्म सोडणें योग्य नव्हे याच हेतूनें श्रेष्ठ पुरुष सतत कर्मे करीत असतात यावरुन कर्माचें स्वरुप वाचकाच्या लक्षात आलें असेलच प्रत्येकानें आपलें नियत कर्म केलेंच पाहिजे, कोणीही कर्म-त्याग करू नये आणि त्याचप्रमाणें कर्मफलाचीही इच्छा करू नये आता कर्म-फलाचा अर्थ पाहू या.

## कर्माचें फल

कर्म म्हणजे काय याचा विचार आपण केला, आता कर्माच्या फलाचें स्वरुप पाहणें आहे विद्या शिकविणें, हें ब्राह्मणाचें कर्तव्य कर्म आहे विद्या शिकविणाऱ्या अध्यापकास आपल्या अध्यापनरूपी कर्माच काय बरे फल मिळतें ? क्षत्रियाचें काम राष्ट्राचें संरक्षण करणें हें आहे तो नगराचें संरक्षण करता अथवा सैन्यात भरती होऊन युद्धात रहून राष्ट्राचें रक्षण करतो त्याबद्दल त्याला काय बरे मिळतें ? पशूंचे पालन, शेती आणि व्यापार यांनी वैश्यास काय बरें लाभ होतो ? आणि परिचर्येपासून किंवा कलाकौशल्यापासून शूद्रास कशाची बरे प्राप्ति होते ? अध्यापकास मासिक वेतन मिळतें, नगररक्षक आणि सैनिक यानाही वेतन मिळतें, वैश्याना व्यापारात द्रव्यलाभ होतो, आणि कलावानास धन मिळतें, हें सर्वांसच माहीत आहे हा लाभ अथवा वेतन अनेक प्रकारानीं मिळू शकतें. एखाद्या राज्यात मासिक वेतन रुपयाच्या स्वरुपात मिळेल, तर दुसऱ्या ठिकाणीं जमिनीच्या स्वरुपात मिळेल, तर आणखी एखाद्या ठिकाणीं दक्षिणा, पारितोषिक, पदवी किंवा आभूषणाच्या स्वरुपात मिळेल कर्मफल कोणत्याही स्वरुपात का मिळेना, नें मिळेल तें इतकें असेल कीं, त्यामुळें कार्यकर्त्यांचा जीवननिर्वाह चालू शकेल आणि तो त्याच्या आधारावर आपलें कार्य पुढें सतत चालवू शकेल

जें काहीं मिळेल, त्याचीं नावें दक्षिणा, वेतन, पारितोषिक अशीं भिन्न भिन्न असेनात का, त्या सगळ्याचें तात्पर्य एकच आहे राष्ट्राच्या अथवा विश्वरुप ईश्वराच्या सेवेकरिता त्या मनुष्यानें जें काय कर्म केलें, त्याच्यासाठीं त्याला त्याचा चरितार्थ चालेल, इतकें जीवनाचें साधन मिळणें, हेंच त्याच्या कर्माचें फल आहे तें फल कदाचित् सन्मानप्रदर्शक अशा एखाद्या पदवीपासून तों थेट अनेक प्रकारच्या धन-संचयापर्यंत असू शकेल पण तें असें असाव कीं त्यामुळें कार्यकर्त्यास आपल्या कामाचे

एक कारण नाही, हें यावरून स्पष्ट झालें. याप्रमाणें गीतेनें वेतन न घेतां सेवा करणाऱ्याचा योगक्षेम चालविण्याची व्यवस्था शासनसंस्थेकडून व्हावी, अशी योजना केली आहे. म्हणून कार्यकर्त्यांनी निश्चिन्त होऊन आपापलीं कर्में करीत असावें. त्यांचा प्रपंच प्रजापति-संस्थेकडून चालविला जाईल.

## कर्मफल-त्यागाचे अनेक भेद

कर्मफल-त्यागाचे अनेक भेद आहेत, त्यांचा आतां विचार करणें आहे. पहा—

(१) अनाश्रित· कर्मफलं कार्यं कर्म करोति यः।

(गी. ६।१)

"जो आपल्या कर्मांच्या फलाचा ( अर्थात् आपल्या वेतनाचा आपल्या जीवननिर्वाहाकरितां ) आश्रय करीत नाहीं, परन्तु आपलें कर्तव्य कर्म योग्य रीतीनें करीत असतो" तो श्रेष्ठ कार्य करतो.

(२) सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान्।

(गी. १२।११)

ध्यानात् कर्मफलत्याग त्यागाच्छान्तिरन्तरम्।

(गी. १२।१२)

सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः।

(गी १८।२)

यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते।

(गी १८।११)

' सर्व कर्मांच्या फलांचा त्याग करा आणि आपल्या शक्तीप्रमाणें प्रयत्न करीत असा, ( कर्म करीत जा. ) ध्यानापेक्षां आपण केलेल्या कर्मांच्या फलाचा त्याग अधिक श्रेष्ठ आहे. त्यामुळें उत्तम शान्तीचा लाभ होतो. आपल्या कर्मांच्या (वेतनरूप) फलाचा त्याग करणें, यासच त्याग असें म्हणतात. जो आपल्या कर्मांच्या फलाचा त्याग करतो, त्यासच त्यागी असें म्हणतात.' आपण या ठिकाणीं कर्मफलाचा अर्थ 'वेतन' असा गृहीत धरला आहे. जो मनुष्य कर्म करतो, पण त्याचा मोबदला म्हणून वेतन अथवा पारितोषिक रूपानें कांहीं न घेतां त्याचें अर्पण करतो, त्यासच येथें श्रेष्ठ मानलें आहे.

## कर्म-फल-त्याग

या ठिकाणीं पुढील तत्त्वें वाचकांच्या लक्षांत येतील—

(१) जीवननिर्वाहाकरितां कर्मफलाचा आश्रय न करणें आणि—

(२) कर्मांच्या फलाचा त्याग करणें.

यांत अवश्य भेद आहे. एखादा मनुष्य आपल्या वेतनाच्या आधारावरच जिवन्त रहात नाहीं, याचाच अर्थ असा कीं, त्याच्या आजीविकेचा आधार त्याच्या वेतनाहून वेगळा असा आहे. आणि दुसरा कोणी आपल्या वेतनाचा त्याग करतो, याचा अर्थ तो वेतन घेतो, आणि मग त्याचा त्याग करतो. अर्थात् "कर्मफलाचा अनाश्रय" आणि "कर्मफलाचा त्याग" या दोहोंचा अभिप्राय वेगवेगळा आहे. आणखी पहा—

(३) त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः। (गी. ४।२०)

'कर्मांच्या फ़लाच्या उपभोगाचा त्याग करून त्या फलाचा आश्रय न करतां तो (योगी) सर्वदा नित्यतृप्त असतो.' या ठिकाणीं वेतनाचा उपभोग स्वतः न करतां आपल्या जीवननिर्वाहाकरिता त्याचा आश्रयही करूं नये, असें सांगितलें आहे. वेतन घेऊं नये, असा येथें उपदेश नसून त्याचा संग करावा कीं करूं नये, याचेंच विवरण येथें केलें आहे. संग याचा अर्थ विषयभोगेच्छा, यासंबंधीं कांहीं वचनें पाहण्यासारखीं आहत —

योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय। (गी. २।४८)

ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते।
संगात् संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते॥ (गी. २।६२)

ब्रह्मण्याधाय कर्माणि सङ्गं त्यक्त्वा करोति यः।
लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा॥ (गी. ५।१०)

कायेन मनसा बुद्धया केवलैरिन्द्रियैरपि ।
योगिनः कर्म कुर्वन्ति संगं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये ॥
(गी. ५।११)

एतान्यपि तु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च ।
कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥
(गी. १८।६)

कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।
सङ्गं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ॥
(गी० १८।९)

नियतं संगरहितं अरागद्वेषतः कृतम् ।
अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥
(गी० १८।२३)

मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः ।
(गी०११।५५)

शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः ।
(गी. १२।१८)

' संग सोडून कौशल्यानें कर्में कर. विषयांच्या ध्यानानें विषयांशीं संग करण्याची बुद्धि उत्पन्न होते. संगामुळें काम उत्पन्न होतो व कामाची तृप्ति झाली नाहीं तर क्रोध निर्माण होतो. ब्रह्मासाठीं आपलीं सर्व कृत्यें अर्पण करून जो संगभाव सोडून कर्में करतो, तो दोषापासून अलिप्त राहतो. योगी लोक संगाचा त्याग करून शरीर, मन, बुद्धि आणि केवळ इन्द्रियें, यांनीं कर्मे करीत असतात. संग आणि फलाचा त्याग करून कर्में करावीत. संग आणि फलाचा त्याग करून, रागद्वेष न धरतां, जें नियत कर्म केलें जातें, तें सात्त्विक कर्म होय. संगवर्जित होऊन मज विश्वरूप प्रभूकरितां कर्मे कर. मनुष्यानें शीत-उष्ण, सुख-दुःख, हीं समान मानून, संगरहित होऊन कर्मे करावींत. '

या वचनांत संग आणि फल या दोहोंचा त्याग करण्याविषयीं सांगितलें आहे.

## कर्म-फल-त्याग

यावरून संग आणि फल हीं दोन्हीं वेगवेगळी आहेत, असें सिद्ध होतें. संगाचा अर्थ विषयाचा संग अर्थात् विषयभोगाची इच्छा होय आणि फलाचा अर्थ वेतन, हें पूर्वी सांगितलेंच आहे.

धर्माचें फल वेतन आहे. वेतनापासून विषयोपभोग प्राप्त होतात आणि त्याची प्राप्ति झाल्यावर त्यांचा भोग घेतला जातो. ही भोगप्रवृत्ति म्हणजेच संग होय. संग सोडणें याचा अर्थ भोगप्रवृत्तीचा त्याग करणें असा आहे. कर्मफलत्यागाहून हा अर्थ अगदीं वेगळा आहे. कर्माचें फल घेऊनसुद्धां भोगाचा त्याग करतां येतो. उदाहरणार्थ, कोणी एक मनुष्य आपल्या कर्माचें वेतन म्हणून प्रतिमास एक सहस्र रुपये घेतो. पण भोगेच्छा-विरहित राहून निर्धन विद्यार्थ्यांकरितां त्या सर्व द्रव्याचें दान करितो. येथें त्यानें आपल्या कर्माच्या फलाचा स्वीकार तर केला, पण त्याचा उपभोगमात्र घेतला नाहीं. म्हणून 'कर्मफलत्याग' आणि 'फलसंगत्याग' हीं दोन्हीं अगदीं भिन्न आहेत. त्याचप्रमाणें 'कर्मफलाचा अनाश्रय' ही अगदीं वेगळा आहे. तसेंच आणखी पहा—

**मा कर्मफलहेतुर्भूः ।** (गी. २।४७)

'कर्माचें फल मिळविण्याचा हेतु मनात धारण करूं नकोस.'

**असङ्गन फलाकांक्षी ।** (गी. १८।३४)

'असङ्गयुक्त होऊन फलाची इच्छा करणाऱ्यास राजस कर्ता म्हणतात.'

**रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।** (गी. १८।२७)

'भोगी, आपल्या कर्माच्या फलाची इच्छा धरणारा, लोभी, हिंसा करणारा आणि अपवित्र, अशा कर्त्यास तामस कर्ता असें म्हणतात.'

**त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तः ।** (गी. ४।२०)

'कर्मफलाचा संग धरण्याचा भाव टाकून देऊन नित्यतृप्त राहणारा.'

**फले सक्तो निबध्यते ।** (गी. ५।१२)

'फलावर आसक्त होणारा बंधनात पडतो.'

**अभिसंधाय तु फलम् ।** (गी. १७।१२)

'फलाच्या इच्छेनें केलें जाणारें कर्म राजस समजावें.'

**फलमुद्दिश्य वा पुनः।** (गी. १७।२१)

'फलाच्या उद्देशानें केलें जाणारें कर्म' राजस होय.

**अनभिसंधाय फलम्।** (गी. १७।२५)

'फल हें ध्येय न ठेवतां' योगी यज्ञ-दान-तप करतात.

**सुखसंगेन बध्नाति।** (गी. १४।६)

'सत्त्व-गुण सुखाशीं संगानें बांधून टाकतो.'

कर्मफलाच्या त्यागाचा विचार करतांना हीं वचनें ध्यानांत घेणें अवश्य आहे. या वचनांपैकीं खालीं दिलेलीं पदें विशेष महत्त्वाचीं आहेत—

**कर्म-फल-हेतु.** (२।४७) = कर्मफलाची इच्छा मनांत बाळगून कर्म करणारा. वेतनावर दृष्टि ठेऊन काम करणाराची उन्नति कधींच होऊं शकत नाहीं.

**फलाकांक्षी** (१८।३४) = कर्मफलरूपी वेतनाची आकांक्षा धारण करणारा. कर्माचें कांहीं का होईना, आपलें वेतन मिळालें कीं पुरे, अशी भावना ठेवणारा.

**कर्मफलप्रेप्सुः** (१८।२७) = कर्मफलाची इच्छा करणारा. हाही वेतनावर दृष्टि ठेऊनच काम करतो.

**फले सक्तः** (५।१२), **फलं अभिसंधाय** (१७।१२), **फलं उद्दिश्य** (१७।२१) = हे सगळे आपापल्या कर्मांच्या फलाशीं बांधले गेलेले असतात. यांची केवळ वेतनावरच दृष्टि असल्यामुळें (**फले सक्तो निबध्यते।** ५।१२) हे बांधले जाऊन बंधनांत पडतात. ज्या ठिकाणीं वेतन मिळेल, त्याच ठिकाणीं हे काम करतील. यांच्यासमोर ध्येयरूप असा एखादा सिद्धान्त असतच नाहीं. मग त्या वेतनाकरितां वेळप्रसंगीं वाटेल तसलें हीन कर्म करण्यासही हे तयार होतील

तात्पर्य, कर्मफलाचें आम कीं बाळगणें, हा अधःपाताचा मार्ग आहे. म्हणून—

**तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपःक्रियाः।**<br>
**दानक्रियाश्च विविधाः क्रियन्ते मोक्षकांक्षिभिः॥**

(गी. १७।२५)

'फलाची इच्छा न करता बंधनापासून मुक्त होण्याची इच्छा करणारे यज्ञ, दान, तप इत्यादि कर्मे करतात.'

या ठिकाणी 'बंधनांतून सुटण्याची इच्छा करणारे फलाची इच्छा न करता कर्म करतात,' असें म्हटलें आहे. कारण जर त्यांचें लक्ष कर्माच्या फलावर असेल, तर बंधनापासून सुटण्याची आशाच करायला नको. अर्थात् कर्माचें फल भोगण्याच्या इच्छेनें बंधन आणि त्या फलाचा त्याग करण्यानें त्या बंधनाची निवृत्ति होते.

कर्माचें फल भोगण्यानें बन्धन कसें निर्माण होतें, तें आतां पहूं या. कोणा एक मनुष्य आपल्या वेतनावरच उपजीविका करतो वेतन न मिळाल्यास तो उपाशी मरेल या वेतनाच्या लोभानें तो वाटेल तें वाईट कृत्य करील यालाच नांव बन्धन. पण जो मनुष्य वेतनाची अभिलाषा धरीत नाहीं, त्याला अर्थातच हें बन्धन बाधू शकणार नाहीं. हें व्यवहारांत स्पष्ट दिसत असल्यानें कोणाच्याही उमजूं शकेल वेतनाच्या लोभानें वाटेल तें काम करणारा आणि वेतनाचा अभिलाषा न करणारा, असे दोन प्रकारचे कर्म करणारे लोक असतात, त्यामध्यें वेतनाची अभिलाषा न करणारे हे अधिक श्रेष्ठ होत

पण वेतनाची अभिलाषा करणें अथवा न करणें, हीं दोन्ही गौण आहेत कर्माच्या फलाचा त्याग अथवा अवैतनिक सेवा ही वेतन घेऊन होत असलेल्या सेवेपेक्षा निःसंशय कितीतरी पटीनीं अधिक श्रेष्ठ आहे

आपण येथपर्यंत 'कर्मफलाचा आश्रय न करणें,' "कर्मफलाचा त्याग करणें" आणि " कर्मफलाचा संग न करणें " हे फलत्यागाचे तीन भेद पाहिले आतां आणखी काहीं भेद असतील तर ते पाहूं या

(४) मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम्॥ (गी० ८।७)
यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्।
यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम्॥ (गी० ९।२७)

'मज (विश्वरूपा) मध्यें आपलें मन आणि बुद्धि अर्पण करून तूं मलाच निःसन्देह प्राप्त होशील तू जें करशील, जें खाशील, जें हवन करशील, जें देशील,

जें तप करशील तें सर्व कर्म मज (विश्वरूपाचे) ठिकाणीं समर्पण कर ' या ठिकाणीं शरीर, वाणी, मन आणि बुद्धि यांचेकडून जें जें कर्म होईल, तें विश्वरूप ईश्वरास समर्पित करण्यास सांगितलें आहे यामध्यें समर्पण न होण्याजोगें असें कोणतेंही कर्म अवशिष्ट रहात नाहीं कर्माचे समर्पणात त्याचें फलही समर्पित होतेंच कारण कर्मच समर्पण झाल्यावर कर्त्याला त्याचें फल मिळण्याची शक्यता नाहीं या ठिकाणीं संपूर्ण जीवनाचें समर्पण करावें, असा भाव स्पष्ट आहे कारण शरीर, वाणी, मन आणि बुद्धि यांच्या समर्पणांत जीवन-समर्पण सहजच होतें.

हाच भाव खालील गीतावचनावरून प्रकट होत आहे—

> मत्कर्मकृन्मत्परमः मद्भक्तः सङ्गवर्जितः (गी ११।५५)
> मत्कर्मपरमो भव । (गी. १२।१०)

' माझ्याकरितां कर्म करणारा आणि स्वतः त्याचा भोग न करणारा. ' या वचनांवरून कर्म आणि कर्माचें फल विश्वरूप ईश्वरालाच समर्पण केलें पाहिजे, हें स्पष्ट होतें. कर्म करणारानें त्या कर्मफलाच्या भोगापासूनही दूर रहावें, हा भाव 'सङ्गवर्जित' पदावरून कळून येतो हाच कर्मांच्या समर्पणाचा आशय आहे 'संगवर्जित,' 'मत्कर्मकृत्' हीं पदें असें दर्शवीत आहेत कीं, साधकानें विश्वरूप ईश्वराकरितां कर्में करावींत आणि त्यांच्या फलांचा भोग (सङ्ग) स्वत करूं नये अर्थात् फलही त्याच विश्वरूपाला अर्पण करावें. शिवाय —

> (५) अनाश्रित कर्मफलं कार्यं कर्म करोति यः।
> स सन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥ ( गी ६।१ )
> काम्यानां कर्मणां न्यासं सन्यासं कवयो विदुः । (गी, १८।२)
> मयि सर्वाणि कर्माणि सन्यस्याध्यात्मचेतसा ।
> निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वर ॥ ( गी० ३।३० )
> सर्वकर्माणि मनसा सन्यस्यास्ते सुखं वशी। (गी० ५।१३ )
> ये तु सर्वाणि कर्माणि मयि सन्यस्य मत्परा ।
> अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥ ( गी० १२।६

चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः।
बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ (गी० १८।५७)

'कर्मांच्या फलाचा आश्रय न करता कर्म करणें, हाच संन्यास आणि हाच योग होय. भोगाच्या कामनेचा त्याग म्हणजेच संन्यास. अध्यात्मबुद्धीनें मज विश्वरूप ईश्वरांत सर्व कर्मांचा न्यास करून आणि भोगाची आशा सोडून ममत्वरहित होऊन तूं हें युद्धरूप कर्म कर. सर्व कर्मांचा मनानें संन्यास करून इंद्रियांस स्वाधीन ठेवणारा योगी सुखानें राहतो. सर्व कर्में मज ईश्वराच्या ठिकाणी अर्पण करून अनन्य-योगानें जे माझें (विश्वरूप ईश्वराचेंच) ध्यान करतात, (त्यांचा मी उद्धार करतों). मनानें सर्व कर्मे मला (विश्वरूप ईश्वराला) अर्पण करून साम्यबुद्धिरूपी योगाचा आश्रय करून चित्त सतत माझे ठिकाणीं लावून रहा.'

या ठिकाणीं संन्यासाचें तत्त्व स्पष्ट केलें आहे. सर्व कर्तव्य कर्में तर अवश्य केलीच पाहिजेत. कोणींही आपलें कर्म सोडतां उपयोगी नाहीं. पण त्याबरोबरच स्वतः त्या कर्मांच्या फलाचा भोगही करता नये. हा कर्माचा संन्यास नसून कर्मफलाचा संन्यास आहे. त्यागाविषयीं गीतेंत पुढील वचनें आहेत—

कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा । (गी० २।४८)
त्यक्त्वा कर्मफलासंगं । (गी० ४।२०)
कर्माणि संगं त्यक्त्वा करोति । (गी० ५।१०)
कर्म कुर्वन्ति संगं त्यक्त्वा । (गी०५।११)
कर्मफलं त्यक्त्वा । (गी० ५।१२)
त्याज्यं दोषवत् कर्म । (गी०१८।३)
कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च कर्तव्यानि ।
(गी० १८।६)
सहजं कर्म न त्यजेत् । (गी० १८।४८)
सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं । (गी. १८।२)
यस्तु कर्मफलत्यागी स त्यागी । (गी०(१८।११)

*

'आपल्या सहज प्रवृत्तीनें प्राप्त झालेलें कर्तव्य त्यागणें उचित नव्हे. कर्तव्य कर्माचा त्याग हा दोष वाढविणारा आहे. म्हणून कर्मांचा त्याग न करतां कर्मफलाचा त्याग करावा. जे कर्मफलाचा त्याग करतात, त्यांसच त्यागी म्हणावें.'

याप्रमाणें कर्मफलत्यागाविषयीं गीतेंत अनेक आदेश आहेत. यांतील शब्दप्रयोग हे जरी एकाच तात्पर्यांचे बोधक असले तरी व्यवहारांत त्यांमध्यें अनेक भेद होणें संभवनीय आहे; म्हणून त्यांचाही विचार केला पाहिजे.

## संकलन

| फलत्याग | फलभोग |
|---|---|
| १. फलेषु ते अधिकारः मा%स्तु (गी. २।४७) | १ फलेषु अधिकारः अस्ति |
| २. कर्मफलहेतुः मा भूः (२।४७) | २ कर्मफलहेतुः भूः |
| ३. कर्मफले मे स्पृहा न (४।१४) | ३ कर्मफले स्पृहा |
| ४. अफलप्रेप्सुः (१८।२३) | ४ फलप्रेप्सुः |
| ५. संगं त्यक्त्वा आत्मशुद्धि (५।११) | ५ रागी कर्मफलप्रेप्सुः लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः (१८।२७) |
| ६. फलं अनभिसंधाय (१७।२५) | ६ फलं अभिसंधाय (१७।१२) |
| ७. मदर्पणं कुरु (९।२७) | ७ फलं उद्दिश्य (१७।२१) |
| ८. संगवर्जितःमत्कर्मकृत् (११।५५)<br>कर्मफलं त्यक्त्वा शान्तिः (५।१२)<br>त्यागाच्छान्तिः (१२।१२) | ८ फलाकांक्षी (१८।३४)<br>फलभोगेन अशान्तिः |
| ९. कर्मणा त्यागं (१८।२)<br>कर्माणि संन्यस्य (३।३०)<br>कर्मफलं अनाश्रितः कार्यं करोति (६।१)<br>सर्व-कर्म-फल-त्यागं कुरु (१२।११) | ९ फले सक्तः निबध्यते (५।१२)<br>कर्मफलं आश्रितः<br>कर्मफलभोगः |
| १० कर्मफलासंगं त्यक्त्वा नित्यतृप्तः (४।२०) | १० फलभोगादतृप्तः |
| ११ मदर्पणं कुरुष्व (९।२७) | ११ स्वभोगाय करोति |

## कर्म-फल-त्याग

पण वेतन न घेणारे स्वयंसेवक या राज्यशासन–व्यवस्थेंत आपलें कर्तव्य-कर्म
करीत असतात. वेतनाकडे यांची दृष्टि नसून विश्वसेवा हीं जीविताचें साफल्य
करणारी आहे, आणि तीच ईश्वरपूजा आहे, असा यांचा विश्वास असतो. राज्य-
प्रबंध करणाऱ्या संस्थेकडून यांचा योगक्षेम चालत असतो आणि हे उत्तमांत
उत्तम कार्य करीत असल्यामुळें यांच्या कर्मांत कोणत्याही प्रकारचा दोष निर्माण
होत नाहीं.

जरी हे सगळे कर्मफलाचा त्याग करणारे आहेत, तरी यांच्या कर्मफलत्यागांत
अनेक भेद असल्यामुळें यांच्यांतही अनेक भेद आहेत. पूर्वोक्त श्लोकांत **त्याग**,
**दान, अनाश्रय, न्यास, संन्यास, समर्पण, संगवर्जन** हीं पदें आहेत.
यांचें तात्पर्य एकच असलें तरी हीं पदें एका अर्थाचीं नाहींत—

१. कोणत्याही पदार्थावर आपला अधिकार निर्माण झाल्यावर मगच त्या वस्तूचें
'**दान**' होऊं शकतें. म्हणून जे सेवक आपल्या वेतनाचें दान करतात, ते
वेतन घेतातच तें घेतल्यावर मात्र ते स्वत त्याचा भोग न करतां त्याचा विनि-
योग आपल्य इच्छेप्रमाणें दानाकडे करतात. त्याग आणि दान यांत हा

२. '**त्याग**' करणारे प्रथमच वेतन घेत नाहींत, ते वेतनाचा '**अनाश्रय**'
भेद आहे. वेतनावर ज्यांनी आजीविका अवलंबून नाहीं,
करतील. यांचा जीवननिर्वाह दुसऱ्या कोणत्या प्रकारें अथवा यांच्या स्वत त्या
धनानें होत असेल. 'समर्पण' हेंही स्वीकारानंतरच शक्य आहे

३. '**न्यास**' आणि '**संन्यास**' हे शब्द एखाद्या ठिकाणीं ठेवल्या
गेलेल्या ठेवीच्या अर्थाचे द्योतक आहेत, या ठेवीपासून एखाद्या निश्चित योजने-
प्रमाणें एखाद्या कार्याकरितां तिच्या व्याजाचें अथवा मूळ रकमेचें दान होऊं
शकतें. एवढें मात्र निश्चित आहे कीं, हीं सगळीं पदें एकच अर्थ प्रकट करणारीं
नाहींत. व्यवहार करतेवेळीं प्रत्येक दाता आपापल्या वेतनाच्या दानाचें स्वरूप
वेगवेगळें ठेऊं शकतो. अन्य कोणी आपलें वेतन घेणें आणि न घेणें याविषयीं
उदासीनही असूं शकेल.

ज्या वेळीं कर्मफलत्यागाचा नियम राज्यव्यवहारांत आणला जाईल, त्या वेळीं

याचाही विचार करतां येईल. आज तरी केवळ याची कल्पनाच करणें शक्य आहे; पण भागवत राज्यशासनांतील हें मुख्य तत्त्व आहे, हें विसरतां उपयोगी नाहीं.

जे संपूर्ण विश्वाला ईश्वराचें स्वरूप मानतील आणि आपल्या कर्मानें त्याची पूजा करणें हें आपलें कर्तव्य आहे, असें समजतील, त्यांच्याविषयीं तर वेतनाचा प्रश्नच निर्माण होत नाहीं. कारण ईश्वराची पूजा करण्याबद्दल कोणी वेतन मागतही नाहीं, आणि कोणी तें देतही नाहीं. तें प्रत्येकाचें कर्तव्यच असल्यामुळें प्रत्येकानें तें केलेंच पाहिजे.

## प्राचीन कालची व्यवस्था

प्राचीन काळीं हीच व्यवस्था चालू होती. राष्ट्रांत मोठमोठीं गुरुकुलें असत आणि त्या ठिकाणी सहस्रावधि राजपुत्र अध्ययन करीत असत. गुरु प्रत्येक महिन्याला पगार मागत नसत व शिष्य ती देतही नसत. गुरुकुलांत येणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला शिकविणें, हें गुरुजनें आपलें कर्तव्य समजत असत. मुलें ही राष्ट्राची नवी पिढी आहे, तें ईश्वराचें प्रत्यक्ष स्वरूप आहे, विद्यादानाच्या द्वारें त्या ईश्वराच्या स्वरूपाची पूजा करणें, हें गुरुजनांचें कर्तव्य आहे, असें मानलें जात असे, आणि त्या पूजेबद्दल वेतन घेण्याची कल्पनाही त्यांच्या मनांत उत्पन्न होत नसे. कारण सरस्वतीचा प्रवाह अखण्ड चालू राहिला पाहिजे. विद्या ही दानानेंच प्रसन्न होते. राष्ट्र-कुमाररूपी ईश्वरस्वरूपाची सेवा करून गुरुजन आपणास कृतकृत्य समजत असत ! या देशांत एक काळ असा होता कीं, त्या काळीं विद्येची विक्री करणें हा अपराध अथवा निंद्य कृत्य मानलें जात असे.

आणि आज फी दिल्याशिवाय शिक्षण मिळणें कठीण होऊन बसलें आहे !

या गुरुकुलांत श्रीमन्त, गरीब आणि राजे या सर्वांच्या मुलांशीं समान भावानेंच व्यवहार होत असे; कारण त्या सर्वांसच ईश्वराचें रूप मानलें जात असे. आज याच भावनेचा अभाव झालेला आहे.

गुरुकुलांत गुरुजन कर्तव्यबुद्धीनें शिकवीत असत. विद्येची विक्री करणें निंद्य मानलें जात असे. शिक्षण पूर्ण झाल्यावर शिष्य आपल्या शक्तीची पराकाष्ठा करून शुल्क गुरुदक्षिणा देत असे. एवढेंच नव्हे तर क्षत्रिय आणि वैश्य देही गुरुकुलांस

मुक्तहस्तानें मोठमोठीं दानें देत असत त्यामुळें ऋषींच्या या आश्रमांची सांपत्तिक
स्थिति अत्यंत उत्तम असे, हे आश्रम इतके समृद्ध असत कीं, आपल्या सेनेसह
आलेल्या मोठमोठ्या राजांचेंही त्या आश्रमांत थाटाचें स्वागत होत असे आणि
एखादे वेळीं जर एखाद्या स्वार्थी राजानें आश्रमांची लूट केली, तर त्यांना
त्याबद्दल योग्य तें प्रायश्चित्तही मिळत असे।

या आश्रमांत इतकी समृद्धता असूनही तेथील आचार्य, ब्रह्मचारी अथवा
इतर कामें करणारे, हे अत्यंत त्याग-भावनेनें राहणें, हें आपलें कर्तव्य समजत
असत म्हणून आश्रमाची सांपत्तिक स्थिति एवढी उत्तम असूनही ते उन्मत्त
होत नसत संपत्तीचा खरा उपयोग कसा करावा, याचें हे आश्रम म्हणजे एक
उदाहरणच होतें. तात्पर्य, या ठिकाणीं असा कर्मफलाचा त्याग केला जात असे

सर्वच व्यवहार अशा प्रकारें होत असत बहुधा सर्व श्रीमन्त सर्वमेध यज्ञ
करून आपली संपत्ति जनतेच्या कल्याणाकरिता देऊन टाकीत असत राजा अशा
प्रकारें आपल्या सर्वस्वाचें दान केल्यावर मातीच्या भांड्यांचा उपयोग करण्यां
तही आपला गौरव समजत असे आपण मिळविलेल्या द्रव्याचा त्याग, दान,
न्यास अथवा अर्पण करावें, हीच रीति या वेळीं प्रचलित होती स्वतः च त्याचा
भोग घेऊन इतरांस त्यापासून वंचित ठेवावें, ही कल्पनाच त्यावेळीं अस्तित्वांत
नव्हती कर्मफलत्यागांत हीच भावना मुख्य आहे

सध्या कर्म करणारा समजत असतो कीं, या कर्मामुळें मिळालेल्या संपत्तीचा
उपभोग घेणें, हा माझा अधिकारच आहे कर्ता हाच फलभोगाचा अधिकारी
आहे, हें सध्याच्या सर्व कायद्यांनीं मानलेलें असें शिष्टसंमत तत्त्व आहे कोणी
एक वैश्य व्यापारव्यवहारांत पुष्कळशी संपत्ति मिळवितो, आणि त्या धनानें विपुल
धान्य खरेदी करून दुसऱ्या लोकांना त्या धान्यापासून वंचित ठेवतो असे व्यवहार
सध्या होत असल्यानें सध्या गरिबांचीं दुःखें प्रति दिवशीं वाढत आहेत
आज अनेक प्रकारचे कर वसूल करून त्याचें द्रव्य राजकीय भांडारांत एकत्र
केलें जात आहे जी क्रिया कर्मफलत्यागाच्या सिद्धान्तानें गीता पूर्वी करू पहात
होती, तीच सुपरटॅक्स-या द्वारें जबरदस्तीनें सध्या केली जात आहे राष्ट्रहिता-

करितां कर्माचें फलस्वरूप द्रव्य एका ठिकाणीं गोळा होणें योग्य नव्हे. पण हें आपण होऊन व्हावें कीं कायद्याच्या दडपणामुळें व्हावें, एवढाच प्रश्न आहे. गीतेनें कर्मफलत्यागाचा सिद्धान्त मांडून हें स्वयंस्फूर्तीनें करविण्याचा यत्न केला आहे. मनुष्यानें आपापलीं कर्में करावींत; परन्तु त्या कर्मांबद्दल धनरूप अथवा वेतनरूप फल मात्र स्वतः घेऊं नये, तर तें फल विश्वरूप ईश्वराच्या सेवेकरितां अर्पण करावें, असें सांगितलें आहे. जर प्रत्येक कार्यकर्ता या स्वभावाचा बनेल आणि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे कर्मफलत्यागी होतील, तर एके ठिकाणीं धनाचा संचय झाल्यामुळें जी दुःखाची वाढ होत आहे, ती होणार नाहीं आणि हें सगळें स्वेच्छेनेंच झाल्यामुळें आज सुपरटॅक्सच्या वसुलींत ज्या लबाड्या होत आहेत, त्याही होणार नाहींत.

अशा प्रकारें ' कर्मफलत्यागा ' चा सिद्धान्त राष्ट्रीय महत्त्वाचा आहे. ही सामाजिक आणि आर्थिक सुव्यवस्थेची वैशिष्ट्यपूर्ण पद्धति आहे आणि आर्थिक विषमतेमुळें निर्माण होणाऱ्या अनेकविध दुःखांना दूर करण्याचें हें एक उत्कृष्ट साधन आहे. समाजांत समता स्थापन करण्याची ही एक उच्च पद्धति आहे.

' कर्म-फल-त्यागा ' नें शान्ति आणि सुख प्राप्त होतें आणि फलाविषयीं आसक्ति वाढल्यानें मनुष्य बन्धनांत पडतो, असें गीतेचें कथन आहे. आतां याचा विचार करूं या. अशी कल्पना करा कीं कोणी एक मनुष्य मोठा बुद्धिमान् आणि चतुर आहे. तो राष्ट्रशासनामध्यें कांहीं काम करतो आणि त्या कर्माचें फल म्हणून दोन चार हजार रुपये वेतन मिळवितो. तें वेतन तो आपल्या घरींच स्वतःजवळ ठेवतो. एक तिजोरी विकत घेणें, तिच्या किल्ल्या सुरक्षित ठेवणें, चोर येऊं नये म्हणून बन्दोबस्त करणें, अधिक द्रव्य एकत्र झाल्यावर त्याची राखण करण्याकरितां कोणी पहारेकरी ठेवणें, इत्यादि चिन्ता त्या मनुष्यास आणि प्रत्येक श्रीमन्तास लागून राहतात. जर तें द्रव्य बँकेंत ठेवलें, तर ती बँक बुडेल कीं काय, ही चिन्ता रात्रंदिवस मनास जाळीत असते. गीतेंत हेंच सांगितलें आहे—

## कर्म-फल-त्याग

**कामकारेण फले सक्तो निबध्यते।** (गी. ५।१२)

'स्वार्थवश होऊन फलभोगाविषयीं आसक्त झालेला मनुष्य बंधनांत पडतो.'

न्यायालयांत नव्या नव्या फिर्यादी दाखल होत आहेत. धनी आणि मजूर यांजकडून नवे नवे ठराव पुढें येत आहेत. फलभोगामुळें हीं कशकशीं बंधनें निर्माण होत आहेत, तें पहावें.

कल्पना करा कीं, प्रतिमास चार हजार रुपये वेतन मिळविणारा मनुष्य तें वेतन घरीं न आणता आपलें नांव फलत्यागी लोकांचे यादींत दाखल करील, आणि प्रजापतीच्या शासनव्यवस्थेच्या राष्ट्रीय महाकोशांत तें वेतन जमा करील, तर त्याच शासनव्यवस्थेकडून त्याचा योगक्षेम उत्तम रीतीनें चालून तो उत्तम शान्तीचा अनुभव करील. त्याला घरीं तिजोरीची आवश्यकता उरणार नाहीं, कीं त्याला चोराचें भय राहणार नाहीं. त्याच्या घरीं लग्न, मुंज अथवा दुसरें कांहीं कार्य असलें, तर त्याच्या योग्यतेप्रमाणें राज्यव्यवस्थेकडून योग्य ती व्यवस्था होईल; उत्सव यथासांग पार पडेल आणि त्याला कशाचीही चिन्ता करण्याचें कारण राहणार नाहीं.

ही व्यवस्था शान्ति आणि समाधान देणारी नाहीं काय? आपलें कर्तव्य कर्म कुशलतेनें करण्याची जबाबदारीच फक्त कर्त्यावर असते, बाकी सर्व व्यवस्था राज्यव्यवस्थेकडून होत असल्यामुळें कर्त्याला कोणत्याही प्रकारचे कष्ट करण्याचें कारण उरत नाहीं. जर भविष्यकाळांत राज्यव्यवस्थेची ही अशी पद्धति प्रचलित होईल, तर जनता किती तरी सुखी होईल, याचा विचार सुज्ञांनीं करावा. या ठिकाणीं व्यय-रहित व्यवस्था कशी होऊं शकते, हें या विवरणात दाखविलें आहे. कालाच्या अनुकूलतेप्रमाणें आणि साधनांच्या कमी-अधिकपणाप्रमाणें या शासनव्यवस्थेंत कमीजास्त करणें हें योग्यच होईल. पण '**कर्मफलत्यागा**'त जो मूल सिद्धान्त सांगितला आहे, तो उत्तम आहे, हें निःसंशय आहे. हा सिद्धान्त केवळ कल्पनेंतच ठेवावयाचा नसून हा व्यवहारांत आणण्यासाठींच आहे. एवढेंच नव्हे, तर त्यामुळें उत्तम राज्यव्यवस्थाही होऊं शकते आणि कमी खर्चामुळें जनतेंत अधिक शान्तीही नांदूं शकते.

आजपर्यन्त या कर्मफलत्यागाच्या सिद्धान्ताला सर्वच काल्पनिक मानीत असत, कर्मफलही त्यांच्या कल्पनेप्रमाणें असून, अपूर्व व अदृश्य होतें आणि तें ईश्वराचे ठिकाणीं अर्पण करणें, इतकी त्यांनीं केवळ मानसिक व्यवहार मानला होता! पण ती विचारसरणी चुकीची होती. आतां या सिद्धान्तास व्यवहारांत आणणें अगदीं शक्य आणि योग्य आहे, असें सिद्ध करून येथें आम्ही त्याचें हें इतकें विवरण केलें आहे. हा प्रयोग व्यवहारांत आणणें सूज्ञांच्या आणि अधिकारी श्रेष्ठ पुरुषांच्या हातीं आहे, तें त्यांनीं करावें.

जों जों कर्मफलत्यागाच्या सिद्धान्ताचा अधिकाधिक विचार केला जाईल, तों तों असें आढळून येईल कीं,'कर्म-फल-त्यागा'च्या मुळाशीं धनसंपत्ति वैयक्तिक स्वामित्वाची असूं नये, हा सिद्धान्त जागृत आहे परमेश्वर विश्वरूप असल्यामुळें सर्व संपत्ति त्या विश्वरूप ईश्वराचीच आहे, कोणाही एका व्यक्तीची नाहीं. गीतेनें जनतेस ( अ-निकेत) गृहरहित आणि (अ-परिग्रह) अ-संग्रही बनविण्याचा सिद्धान्त प्रतिपादिला आहे. सर्व संपत्ति जर विश्वरूपाची मानली गेली, तर व्यक्तींचें तिजवरील स्वामित्व सहजच दूर झालें आणि मग 'अपरिग्रह,' 'अनिकेत' आणि 'कर्म-फल-त्याग' हे सिद्धान्त सहजच सिद्ध होतील.

कर्मफलत्यागाचा विचार त्याला व्यवहारांत आणण्याच्या दृष्टीनें करण्याकडे जेव्हां जनतेची प्रवृत्ति वाढत जाईल, त्यानंतरच गीतेचें तत्त्वज्ञान व्यवहारांत आणण्याचा विचार मूर्त रूप धारण करील. त्या वेळीं कदाचित् आजचे धनपति गीतेचा विरोधसुद्धां करतांना दिसतील; पण गीता व्यवहारांत आणली जाण्याचा तो पहिला दिवस ठरेल' आणि आम्ही त्याचें स्वागतच करूं.

---

कर्मयोग—

कर्मयोगेन योगिनाम् । (गी० ३।३)
कर्मेन्द्रियैः कर्मयोगं असक्तः स विशिष्यते (गी० ३।७)
संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।
तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ (गी० ५।२)
कर्मयोगेन चापरे । (गी० १३।२४)

हे कर्मयोगाचे उल्लेख गीतेंत आढळतात. या ठिकाणीं कर्मत्यागापेक्षा कर्मयोग अधिक श्रेष्ठ आहे, असें म्हटलें आहे. याचप्रमाणें–

ज्ञानयोग—

ज्ञानयोगेन सांख्यानाम् (गीता ३।३)
श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परन्तप । (गी० ४।३३)
ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते । (गी० ९।१५)
ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः । (गी० १८।७०)

या वचनांत ज्ञानयोगाचा स्पष्ट आणि ध्वनित उल्लेख आहे. याचप्रमाणें 'बुद्धियोग' शब्दाचे उपयोग पहा—

बुद्धियोग—

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगात् ॥ (गी० २।४९)
ददामि बुद्धियोगं तं येन मां उपयान्ति ते । (गी० १०।१०)
बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ (गी० १८।५७)
तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् । (गी० ६।४३)
बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते । (गी० २।५०)
कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।
(गी० २।५१)

इत्यादि वचनांत 'बुद्धियोगा'चा उपयोग आढळतो. आतां भक्तियोगाचे उपयोग पहा—

भक्तियोग—
मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते। (गी० १४।२६)
या ठिकाणीं भक्तियोग पद आलें आहे. खालीं दिलेल्या वचनांत 'ब्रह्मयोग'
पद पहा—

ब्रह्मयोग—
स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते। (गी० ५।२१)
खालील वचनांत 'संन्यासयोग' पद योजिलें आहे—

संन्यासयोग—
संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि। (गी. ९।२८)
खालील वचनांत 'अभ्यासयोग' पद योजिलें आहे—

अभ्यासयोग—
अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना। (गी. ८।८)
अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय। (गी. १२।९),
खालील वचनांत 'अनन्ययोगा' चा उल्लेख आहे—

अनन्ययोग—
मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी। (गी. १३।१०)
अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते। (गी. १२।६)
खालील वचनांत 'साम्ययोग' पद आहे—

साम्ययोग—
योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन। (गी. ६।३३)
इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः। (गी. ५।१९)
पुढील वचनांत 'आत्मयोग' पद आहे—

आत्मयोग—
मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात्।
(गी० ११।४७)

पुढील वचनांत 'आत्मसंयमयोग' हें पद आहे—

आत्मसंयमयोग—

आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते। (गी. ४।२७)

पुढील वचनात 'ध्यानयोग' हे पद आहे—

ध्यानयोग—

ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः। (गी. १८।५२)

पुढील वचनांत 'वियोग' पद आहे—

वियोग—

तं विद्याद् दु:खसंयोगवियोगं योगसंज्ञितम्। (गी. ६।२३)
रागद्वेषवियुक्तैः इन्द्रियैः। (गी. २।६४)

पुढील वचनात 'संयोग' पदाचा उपयोग केला आहे—

संयोग—

दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम्। (गी ६।२३)
क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात् तद्विद्धि। (गी. १३।२६)
विषयेन्द्रियसंयोगात्। (गी. १८।३८)
दम्भाहंकारसंयुक्ताः (गी. १७।५)

याशिवाय खालील पदांचा गीतेंत उपयोग केला गेला आहे—

'योग, योगक्षेम (९।२२), योगधारणा (८।१२), योगबल (८।१०), योगभ्रष्ट (६।४१), योगमाया (७।२५), योगयज्ञ (४।२८), योगयुक्त (५।६,७; ८।२७), योगयुक्तात्मा (६।२९), योगवित्तम (१२।१), योगसंसिद्ध (४।३८), योगसंसिद्धि (६।३७), योगसंज्ञित (६।२३), योगसंन्यस्तकर्मा (४।४१), योगसेवा (६।२०), योगस्थ (२।४८), योगारूढ (६।३-४), योगी (३।३ इ०), योगेश्वर (११।४;१८।७५,७८), महायोगेश्वर (११।९),

याशिवाय अध्यायांच्या नावांत पुढील योगाचीं नावें आहेत—

(१) विषादयोग, (२) सांख्ययोग, (३) कर्मयोग, (४) ज्ञानकर्म-

संन्यासयोग, (५) संन्यासयोग, (६) ध्यानयोग, (७) ज्ञानविज्ञानयोग,
(८) अक्षराक्षरयोग, (९) राजविद्याराजगुह्ययोग, (१०) विभूतियोग,
(११) विश्वरूपदर्शनयोग, (१२) भक्तियोग, (१३) प्रकृतिपुरुषयोग,
(१४) गुणत्रयविभागयोग, (१५) पुरुषोत्तमयोग, (१६) दैवासुरसंप-
द्विभागयोग, (१७) श्रद्धात्रयविभागयोग, (१८) मोक्षसंन्यासयोग. याच
अध्यायांचीं दुसरींही नांवें सापडतात, तीं अशीं, (४) आत्मसंयमयोग, (६)
अध्यात्मयोग, (७) ज्ञानयोग, (८) महापुरुषयोग, (१८) मोक्षयोग.
आणखीही कांहीं नांवें उपलब्ध आहेत, पण त्यांत हीं मुख्य आहेत, म्हणून येथें
इतकींच पुरेत.

एकाच गीतेंत या इतक्या योगांचा उल्लेख आहे. अप्रत्यक्ष रूपानें आणखीही
योग शब्दाचे निर्देश गीतेंत आढळतील, पण त्यांचा विचार आपण बाजूला
ठेऊं. योग शब्दाचा इतक्या विविध ठिकाणीं उपयोग करून गीतेनें जणूं काय
गीतेंत योगाचें माहात्म्यच वर्णन केलें आहे. यामुळें योगाचें महत्त्वच सिद्ध होत
आहे. म्हणून योगाचा विचार करणें आवश्यक आहे.

## योगाचा अर्थ

योग शब्दात युज् (समाधौ, ४ आत्मने॰), युज् (योगे, ७ उभय॰),
युज् (संयमने, १ परस्मै, १० उभय॰) हा धातु असून 'चित्ताच्या वृत्तींचा
निरोध करणें, जोडणें, संयम करणें,' हे याचे अर्थ आहेत, आणि ते येथें
योग्यही आहेत. चित्ताच्या स्वैर वृत्तींचा निरोध करणें, आत्मसंयम करणें, मन
स्वाधीन करणें, इन्द्रियें स्वाधीन ठेवणें, शरीर स्वाधीन ठेवणें, असे योगाचे
अर्थ आहेत. शिवाय जोडणें। हाही एक अर्थ आहे. ईश्वराशीं आपला संबन्ध
जोडणें, हा अर्थच योगाचें ध्येय आणि साध्य स्पष्ट करीत आहे. इन्द्रियनिग्रह
इत्यादि त्याचीं साधनें आहेत.

योग म्हणजे आपली स्वतःची शुद्धि करणें, परमेश्वराशीं एकरूप होणें,
आणि सामाजिक संबन्ध पवित्र ठेवणें होय. म्हणूनच हा धातु परस्मैपदी आणि
आत्मनेपदी, अथवा उभयपदी आहे. उभयपदी धातु दोन्हींचा संबन्ध जोडीत

दर्शनात. आत्मनेपद हें स्वतःची शुद्धि करण्याकरितां अनुष्ठान केलें पाहिजे, असें दर्शवितें, आणि परस्मैपद, दुसरीं माणसें अथवा पदार्थ यांशीं चांगले संबन्ध असले पाहिजेत, असें ध्वनित करतें. साधकानीं या तीनही प्रयोगांकडे विशेष लक्ष पुरविणें आवश्यक आहे.

## योगाचा गीतेंतील अर्थ

गीतेनें आपल्या परिभाषिप्रमाणें योग पदाचा अर्थ स्वतंत्र केला आहे—

योगः कर्मसु कौशलम्। (गी० २।५०)
समत्वं योग उच्यते। (गी० २।४८)
योगस्त्वया प्रोक्तः साम्येन। (गी० ६।३३)
अचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि। (गी० २।५३)

'(१) कर्मांत कुशलता, (२) सर्वत्र समवृत्ती (३) बुद्धीची स्थिरता' हे योगाचे अर्थ आहेत. कुशलतेनें उत्तम कर्मे होतात, सर्वत्र समवृत्तीनें कोणाशींही पक्षपात होत नाहीं, आणि बुद्धीच्या स्थिरतेमुळें कहं घातलेल्या कार्यांत बुद्धी स्थिर होऊन काम करते, आणि तें कार्य निर्दोष होण्याला सहाय्य करते. हे तीन्ही अर्थ योगाचा सामाजिक म्हणजे जनतेशीं असलेला सम्बन्ध स्पष्टपणें दाखवीत आहेत. मनुष्याकडून समाज, राष्ट्र अथवा जनतेकरितां जीं कर्मे व्हावयाचीं आहेत, तीं अत्यन्त कौशल्यानें, समभावनें, चित्त स्थिर ठेऊन अर्थात् चित्त ला चंचल होऊ न देतां झालीं पाहिजेत, हाच भाव या अर्थांतून ध्वनित होतो.

## अष्टांग योग

जरी गीतेंत अष्टांग योगाचें संपूर्ण वर्णन एक ठिकाणीं असें नाहीं, तरी गीतेनें अष्टांग योगाचा स्वीकार केला आहे. आणि त्या विषयीं गीतेंत जागोजाग निर्देशही आढळतात. म्हणून या योगाच्या आठ अंगांचा विचार करणें येथें योग्य ठरेल—

यम-नियम-आसन-प्राणायाम-प्रत्याहार-धारणा-ध्यान-समाधयोऽष्टावङ्गानि ॥२९॥

अहिंसा-सत्य-अस्तेय-ब्रह्मचर्य-अपरिग्रहा यमाः ॥३०॥
शौच-सन्तोष-तप-स्वाध्याय-ईश्वरप्रणिधानानि नियमाः॥३२॥

स्थिरसुखमासनम् ॥४६॥
श्वासप्रश्वासयोर्गतिविच्छेदः प्राणायाम ॥४९॥
धारणासु योग्यता मनसः ॥५३॥
स्वस्वविषयासंप्रयोगे चित्तस्य स्वरूपानुकार इव इन्द्रियाणां
प्रत्याहारः ॥५४॥ (यो. पा. २)
देशबन्धः चित्तस्य धारणा ॥१॥
तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम् ॥२॥
तदेव अर्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधिः ॥३॥
त्रयमेकत्र संयमः ॥४॥ (यो. पा. ३)

(१) यम, (२) नियम, (३) आसन, (४) प्राणायाम, (५) प्रत्याहार, (६) धारणा, (७) ध्यान, (८) समाधि, हा अष्टांग योग होय. गीतेंत याचा थोडक्यांत विचार केला आहे. आपणासही योगाच्या या आठ अंगांचा विचार गीतेच्या अनुसंधानानें करणें आहे. त्यावरोबरच आपण या अंगाचा व्यक्ति आणि समाज यांच्याशीं किती घनिष्ट संबन्ध आहे याचीही चर्चा करूं.

## यम आणि नियम

योगसाधनाची तयारी करण्याकरितां हीं प्रारम्भिक साधनें आहेत. व्यक्तीच्या हितावरोबरच हीं समाजाचेंही हित करतात. एवढेंच नव्हे तर समाज आणि राष्ट्र यांच्या हिताकरितां हीं अत्यन्त आवश्यक आहेत. नियमांची किती आवश्यकता आहे, तें पहा—

### नियम

१. शौच—शुचिता= पवित्रता, शुद्धता. शारीरिक, मानसिक आणि वाचिक पवित्रता ही व्यक्तीचें आरोग्य आणि मानसिक स्वास्थ्य यांच्या रक्षणाकरितां अत्यंत आवश्यक आहे. शारीरिक पवित्रतेनें शरीर निरोगी राहतें, वाचिक

पवित्रतेनें वाणी अपवित्र होत नाही, भांडणें टळतात, आणि मानसिक पवित्रतेनें मनांत सद्विचारांचा प्रवाह सुरू असतो. समाजांत शान्ति निर्माण करण्याकरितां ही पवित्रता अत्यंत आवश्यक आहे. शरिराच्या पवित्रतेमुळें रोगाचा संसर्ग होणार नाही, वाचिक आणि मानसिक पवित्रतेमुळें आपापसांत भांडणतंटे होणार नाहींत. याशिवाय गांवांत आणि राष्ट्रांत वरील पवित्रतेची जेवढी अधिक वाढ होईल, तितकें सुख आणि शान्ति व निरोगीपण समाजांत नांदेल यांत शंका नाही. गीतेंत याविषयीं पुढील उल्लेख आहेत—

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ॥ (गी० ६।११)
शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ (गी० ६।४१)
अनपेक्षः शुचिर्दक्षः। (गी० १२।१६)
शौचं...एतज्ज्ञानम्। (गी० १३।८,११)
शौचं... संपदं दैवीमभिजातस्य। (गी० १६।३)
शौचं...शारीरं तप उच्यते। (गी० १७।१४)
शौचं...ब्रह्मकर्म स्वभावजम्। (गी० १८।४२)
न शौचं.. तेषु (असुरेषु) विद्यते। (गी० १६।७)

' आसनाचा अभ्यास शुद्ध ठिकाणीं बसून करा. योगाभ्यास करणारा पवित्र आणि श्रीमन्त घरीं जन्म घेतो. (हें वर्णन शारीरिक, वाचिक आणि मानसिक दृष्टीनें पवित्र कुलाचें आहे.) भोगाची अपेक्षा न करणारा पवित्र असतो. पवित्रता ज्ञानानें प्राप्त होते. दैवी संपत्तीनें युक्त असणारे शुद्ध असतात. शुद्धता हें शारीरिक तप आहे. शुद्ध राहणें हें ब्राह्मणाचें स्वाभाविक कर्म आहे. जे आसुरी आणि राक्षसी प्रवृत्तीनें युक्त असतात, त्यांचा आचार पवित्र असत नाही.' या वर्णनात शुद्धता आणि पवित्रता यांचें अत्यंत महत्त्व वर्णिलें आहे. आसुरी वृत्तीच्या लोकांत पवित्रता असत नाही, तर दैवी वृत्तीच्या पुरुषांचा तो स्वाभाविक गुणच आहे. शरीर, वाणी, मन, देश यांच्या संबंधाचे कुलाचार हे सर्व पवित्र असले पाहिजेत.

२. सन्तोष— मनाची सन्तुष्टता, शान्तता आणि प्रसन्नता. जें काय

प्राप्त होईल, त्यांत समाधान मानण्यानें सन्तोष होतो. यानें स्वार्थ कमी होतो. या संतोष-वृत्तीमुळें स्वार्थापासून निर्माण होणारे कलह कमी होतात, म्हणून हा संतोषही व्यक्ति आणि समाज यांचें हित करणारा आहे. याविषयीं गीता म्हणते—

**आत्मन्येव च सन्तुष्टः तस्य कार्यं न विद्यते॥** (गी. ३।१७)

**सन्तुष्टः सततं योगी यतात्मा।** (गी. १२।१४)

**सन्तुष्टो येन केनचित्।** (गी. १२।१९)

'जो आपल्या आपणातच संतुष्ट असतो, त्याच्याकरिता कोणतेंही कर्तव्य शेष रहात नाहीं. आत्मसंयम करणारा योगी संतुष्ट असतो. जें कांहीं मिळतें त्यानेंच हा संतुष्ट असतो.' या ठिकाणीं संतोषाचें महत्त्व वर्णिलें आहे. संतोषानें स्पर्धा, संघर्ष आणि भाडणें कमी होतात, म्हणून या गुणामुळें समाजात शांतता नांदण्यास मदत होते.

**३. तप—** शीत, उष्ण इत्यादि सहन करण्याचें सामर्थ्य, द्वंद्व सहन करण्याची शक्ति धर्मकार्य करीत असता जे कष्ट होतील, ते सहन करण्याचें सामर्थ्य. कोणतेंही कार्य करताना कष्ट होतातच, ते सहन केले गेले, तरच कार्य पार पडतें. कष्ट सहन केल्याशिवाय कोणतेंही कार्य होऊं शकत नाहीं, म्हणूनच 'तपाविना साध्य नाहीं,' अशी म्हण पडली आहे. आणि यावरूनच ईश्वरानें तपाच्या सहाय्यानें हें विश्व निर्माण केलें, असें म्हणतात. तात्पर्य प्रत्येक कार्यांत तपाची आवश्यकता आहे.

**तपः।** (गी० १०।५, १६।१; १७।७)

**शारीरं तपः।** (१७।१४) **वाङ्मयं तपः।** (१७।१५)

**तप।** (१७।१६, १८; १९, २४, २७, २८; १८।३, ५)

गीतेंत तपाचें वर्णन विशेष विस्तारानें केलें आहे, इतकें तपाचें महत्त्व आहे. या तपामुळें व्यक्ति आणि समाज यांची उन्नतीच होते.

**४. स्वाध्याय—** चांगल्या ग्रन्थाच्या अध्ययनानें खरें ज्ञान प्राप्त करणें. गीतेंत १६।१; १७।१५ आणि ४।२८ या तीन ठिकाणीं स्वाध्यायाचें वर्णन केलें

आहे ज्ञान प्राप्त करणें, त्याचें दान करणें, अध्ययन करणें आणि शिकविणें हें सर्व वाचिक तप आहे खरा मनुष्यपणा हा ज्ञानावरच अवलम्बून आहे. ज्ञाना-शिवाय मनुष्याचा विकास होणें शक्य नाहीं. म्हणून व्यक्ति आणि समाज यांसाठीं स्वाध्यायाचें महत्त्व फार आहे.

५. **ईश्वरप्रणिधान**— ईश्वराची भक्ति, ईश्वरास आपलीं कर्मे समर्पण करणें, त्याचेकरितां आपलें सर्वस्व अर्पण करणें, विश्वरूप ईश्वराच्या सेवेंत आपल्या जीवनाचा व्यय करणें.

> 'तस्मात् प्रणम्य प्रणिधाय कायं
> प्रसादये त्वां अहं ईशं ईड्यम्। (गी. ११।४४)

'ईश्वरासमक्ष त्याच्या सेवेकरितां आपला देह समर्पित करून मी ईश्वराचा सेवा करतों.' याप्रमाणें गीतेंत ईश्वराची भक्तिपूर्वक आराधना करण्याविषयींचे निर्देश आहेत.

योगसाधनाच्या सिद्धतेसाठीं हे पांच नियम आहेत. यांच्या पालनानें व्यक्तीची योग्यता आणि तिचें सामर्थ्य वाढतें, समाजांतील संघर्ष थांबून शांतता वाढते यांच्या पालनानें मनुष्यात ईश्वराची सेवा, भक्ति आणि आराधना करण्याच योग्यता वाढते. आतां आपण यापुढच्या पाच यमांचें मनन करूं—

६. **अहिंसा**— अहिंसा हा एक मोठा सामाजिक शुभ गुण आहे मनुष्यानें एकमेकांशीं आचरण हें अहिंसेनें युक्त असेच झालें पाहिजे अहिंसाभाव हे मानवी आचरणाचें उत्तम सूत्र आहे. मनुष्यांच्या आचरणांत कायिक, वाचिक आणि मानसिक अहिंसा स्पष्टपणें दिसली पाहिजे. कठोर शब्दांचा उच्चार हा वाणीची हिंसा होय. घातकी विचार करणें ही मानसिक हिंसा, आणि प्रत्यक्ष शस्त्रानें कोणास ठार मारणें, ही शारीरिक हिंसा होय. यांपैकीं एकहा हिंसा मनुष्याच्या आचरणांत असतां कामा नये. गीतेंत १०।५, १३।७, १६।२, १७।१४, या श्लोकांत अहिंसेचें वर्णन करून तिची गणना दैवी संपत्तींत केली आहे. 'संपूर्ण विश्व हें ईश्वराचें रूप आहे, यातच मी आणि ज्याला मी मारणार तो, असे दोघे सामावलों आहोंत हें विश्व एकच जीवन आहे जर मी कोणा दुसऱ्याच्या

हिंसेचा विचार करील, तर तें स्वतःच्या घाताचा विचार केल्यासारखें होईल. स्वतःचा घात करणें कोणासही उचित नाहीं, म्हणून हिंसावृत्ति धारण करणें हेंही अनुचित ठरतें.' अशी विश्वरूप ईश्वराच्या उपासकांची विचारसरणी असते. म्हणून त्याच्या आचरणात हिंसा असणें शक्य नाहीं. कोणावरही केलेला आघात हा ईश्वरावरच होतो, किंवा तो स्वतःवरच होतो, असें ते जाणत असतात.

५. सत्य— सत्याचें पालन करणें, सत्य भाषण करणें. उच्च आणि सरळ व्यवहाराचें सूत्र सत्य हें आहे. गीतेंत १०१४, १६१२, १६१७, १८११५, १८१६५ इतक्या ठिकाणीं सत्याचें महत्त्व वर्णन केलें आहे. हें संपूर्ण विश्व सत्यावरच आधारलेलें आहे. मनुष्याचे संपूर्ण व्यवहार सत्यानेंच सुव्यवस्थित रीतीनें चालतात. संपूर्ण विश्व हें एका सत्य अखण्ड परमेश्वराचें रूप असल्यामुळें सत्याचेंच पालन केलें पाहिजे. ज्याच्याशीं आपण असत्याचा व्यापार करूं, तें ईश्वराचेंच रूप असल्यामुळें ईश्वराशीं असत्य व्यवहार करण्याच्या दोषापासून आपण मुक्त होऊं शकत नाहीं. कोणाशींही असत्य आचरण करणें, हें स्वतःशीच असत्य आचरण केल्याप्रमाणें निन्दनीय होईल. विश्वरूपाला ईश्वरस्वरूप मानणारे कोणाशीं असत्य वर्तन कसें बरें करूं शकतील ?

८. अस्तेय— चोरी न करणें. याचेही अनेक प्रकार आहेत यज्ञ न करणारास गीतेनें चोर म्हटलें आहे (३।१२). विश्वरूप ईश्वराचा उपासक कोणाचीही चोरी कशी करूं शकेल ? कारण ज्याची चोरी करण्याकरिता त्याचा हात पुढें सरसावेल, तें ईश्वराचेंच स्वरूप आहे. म्हणून कोणाचीही चोरी केली, तरी ती ईश्वराचीच चोरी होईल. मग ती त्याच्या हातून कशी घडेल ? म्हणून विश्वरूप ईश्वर मानण्यानें हिंसा, असत्य आणि चोरी हीं अवश्य दूर होतील

९. ब्रह्मचर्य— विवाहाचे पूर्वी ब्रह्मचर्याश्रमाचें पालन करणें आणि विवाहाचे नंतर नियमांप्रमाणें वागणें, याचें नाव ब्रह्मचर्य ब्रह्माशीं आवश्यक केल्याप्रमाणें पवित्र आचरण करणें याचें नाव ब्रह्मचर्य. गीतेंत ८।११, १७।१४, आणि ६।१४ इतक्या ठिकाणीं ब्रह्मचर्याचें वर्णन आहे विश्वरूप ईश्वर आहे,

अथवा हें सर्वंरश: सर्व विश्व ब्रह्मच आहे, ( सर्वं खलु इदं ब्रह्म । ) हें ध्यानीं आल्यावर साधक ईश्वराशी व्यवहार केल्याप्रमाणेंच सर्वांशीं व्यवहार करील, अर्थात् सर्वांशीं आदरानेंच वागेल व हेंच आदर्श आचरण होय.

१०. अपरिग्रह— आपल्याजवळ अधिक संचय न करणें. आपल्याजवळ आवश्यकतेपेक्षा अधिक धान्य सांठवून ठेवल्यास दुसऱ्यास फांके पडतात आणि दुसऱ्यांस त्रास होणें, म्हणजेच ईश्वरास त्रास होणें आहे, कारण ईश्वर विश्वरूप आहे विश्वांतील प्रत्येक वस्तु ईश्वररूपच आहे, त्यापैकीं आपणास खरोखर आवश्यक असेल, आपण जें पचवूं शकूं, तेवढच आपलें आहे. त्याहून अधिका-चा आपण संग्रह केला, तर तें आपल्याच डोक्यावर चढून आपणास खाऊं लागतें, म्हणूण हा आवश्यकतेपेक्षां अधिकाचा संग्रह करणें पाप होय. आज विश्वात चहूकडे परिग्रहवृत्ति वाढत असलेली दिसून येत आहे, म्हणून भाडणें वाढतात. जे स्वतःजवळ आवश्यकतेपेक्षां अधिक सांठवून ठेवतात, त्यांचा द्वेष भुकेल्यानीं करणें हें अगदीं स्वाभाविकच आहे. अधिक संग्रह करणें याचाच अर्थ विश्वरूप ईश्वरास फसविणें असा आहे. आपल्या अधिक संग्रहामुळें ज्याला उपाशीं मरावें लागतें, तो विश्वरूपी ईश्वरच होय म्हणूनच तो उपाशी मरणारा आपणा-शीं भाडण करण्यास उभा राहतो. सध्यांचे सगळेच कायदे आणि विधिनियम मनुष्याचा परिग्रह करण्याचा अधिकार मान्य करतात. जेव्हां समाज अपरिग्रहाच्य सिद्धान्ताप्रमाणें चालूं लागेल, तेव्हां आजच्या कायद्यांपैकीं अनेक कायदे निरुपयोगी ठरतील. गीता १८।५३ मध्यें म्हणते," परिग्रहाचा त्याग केल्यानें मनुष्य ब्रह्मरूप होतो. " हें गीतेचें म्हणणें योग्यच आहे. संपूर्ण विश्व हा परमेश्वर आहे, असें ज्ञान त्याला झाल्यामुळे विश्वांतील सर्व भोग त्या ईश्वराकरिताच आहेत, हें त्याला कळूं लागतें. मग तो आपणाजवळ भोगाचा संग्रह कसा करील ? म्हणून ब्रह्मरूप होणें, विश्वरूप ईश्वराचा स्वीकार करणें आणि अपरिग्रह व्रताचें पूर्ण पालन करणें, या सर्व गोष्टी एका वेळींच साध्य होणाऱ्या आहेत.

यतचित्तात्मा निराशीः अपरिग्रहः। ( गी. ६।१० )

* आपलें संयमन करणारा, आपल्या भोगांच्या वाढीची इच्छा न करणारा, आप-

त्याजवळ अधिक संग्रह करीत नाही.' आपल्याजवळ भोगवस्तूंचा संग्रह कर- ण्याच्या वृत्तीमुळेंच जगात भीषण युद्धें होत आहेत. गीता आणि योग यानीं अपरिग्रहाचा उपदेश करून या सर्व संघर्षाचें मूळच नष्ट केलें आहे.

अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह हे पांच यम विश्वरूप ईश्वराचा स्वीकार केल्यानेंच सिद्ध होऊं शकतील, आणि विश्वरूप ईश्वराच्या कल्पनेवरच या यमाची कल्पना आधारलेली आहे. जर समाज आणि राष्ट्र यात शान्तता स्थापन करणें असेल, तर या पाच यमाचें पालन होणें अत्यन्त आवश्यक आहे. यावरून समाजाच्या सुस्थितीकरिता योगाचें आचरण अत्यन्त इष्ट आहे, हेंच सिद्ध होत आहे. योग्यांचे समोर नेहमीं आदर्श समाज निर्माण करणें, हेंच ध्येय असतें.

## स्वराट्

भागवत राज्यशासनात जसे नागरिक निर्माण करण्याची इच्छा असते, त्या प्रतीचे हे नागरिक होत. हे स्वयंशासक आहेत, म्हणजे याचें स्वत वर शासन चालतें. यांनाच स्वराट् म्हणतात. हे स्वतःचें आचरण पारखून तें शुद्ध करीत असतात. ज्याच्या आचरणात अहिंसा दृष्टीस पडते, सत्याचें पालन करणें हा ज्याचा स्वभाव झालेला असतो, चोरी करण्याची कल्पनाही ज्याच्या मनात निर्माण होत नाहीं, जे ब्रह्मचर्याचें पालन करतात, अर्थात् ज्याच्या मनात व्यभिचाराचा भाव निर्माण होत नाहीं, जे आपल्याजवळ आवश्यकतेपेक्षा अधिक साठा करीत नाहींत, जे काया-वाचा-मनानें पवित्र असतात, जे सर्वदा सन्तुष्ट असतात, जे कष्ट झाले असताही धर्माचरणाचा त्याग करीत नाहींत, जे नेहमीं ज्ञानप्राप्तीसाठीं खटपट करीत असतात, ज्याना आपलें आराध्य दैवत विश्वरूप ईश्वर आहे, हें माहीत आहे, आणि जे त्याच्याच सेवेकरिता सर्व कर्मे करीत असतात, ते " स्वराट् " होत तेच स्वतःचें शासन करू शकतात आणि तेच भागवत राज्य- शासनातील सुयोग्य नागरिक होत.

ज्या ठिकाणीं हे असे नागरिक असतील, तेथील राज्यकारभार चालविण्यास कमी व्यय लागेल, हें अगदीं उघड आहे. कारण याच्या हातून अपराध होणारच नाहींत.

अपराधाच्या अभावामुळें नगररक्षक, न्यायालयें किंवा दुसरी काहीं संरक्षणाची व्यवस्था करण्याचें कारण नाहीं. म्हणून हें राज्यशासन आपोआप अल्प व्यय उ होईल, हें अगदीं स्पष्टच आहे.

येथपर्यंत योगाच्या यम आणि नियम या दोन अंगाचाच विचार केला. योगाचीं हींच दोन प्राथमिक अंगें आहेत. भागवत राज्य-शासनाच्या पाठशाळांतून, प्रत्येक गृहस्थाच्या घरीं, गुरुकुलात आणि ऋषिकुलात यांचें शिक्षण दिलें जात असे या शिक्षणानें सुशिक्षित झालेले नागरिक भागवत राज्यशासन चालवत असत शिक्षणातील हा एक अत्यंत आवश्यक असा विषय होता. ज्ञिज्ञासु लोकांनीं याचा अधिक विचार करावा. प्रत्येक विद्येच्या शिक्षणाकरिता अहिंसा, सत्य, अस्तेय आणि अपरिग्रह हीं अंगें शिकणें आवश्यक असे सध्या विज्ञानाचा वृद्धि करून विज्ञानाचे तज्ज्ञ हिंसक शस्त्रें आणि अस्त्रें यांची वाढ करीत आहेत जर यांना अहिंसा, सत्य, अस्तेय आणि अपरिग्रहाचें शिक्षण मिळेल, तर हेच शास्त्रज्ञ उपकारक रीतीनें शास्त्रांची प्रगति करून लोकांचें हित साधण्याविषयीं तत्पर होतील पण सध्या अगदीं याच्या उलट होत आहे शिक्षणांत वरील नियमांचें शिक्षण दिलें जात नाहीं, हेंच या अव्यवस्थेचें एकमेव कारण आहे.

आतां योगाच्या दुसऱ्या अंगाचा विचार करूं या

## आसन

'आसन' हा एक स्नायूंच्या आकुंचन-प्रसरणाचा व्यायाम आहे हा केल्याने शरीरातील रक्ताचें अभिसरण व्यवस्थित रीतीनें चालतें, आरोग्य प्राप्त होतें, शरीरात स्थिरता आणि सुख याचा अनुभव येऊं लागतो आसनांनीं शरीर पुष्ट होत नाहीं पण शरीरांतील नाड्या शुद्ध होऊन आरोग्य वाढतें बल वाढण्या-करितां दुसरे व्यायाम केले पाहिजेत मोकळ्या हवेंतील खेळ आणि बलवर्धक व्यायाम यांचा जोड मिळाली, तर आसनामुळें अत्यन्त लाभ होतो केवळ आसनांनीं शरीराची शुद्धि होऊन जें एके ठिकाणीं स्थिर बसण्याचा अभ्यास होतो, तो ध्यानधारणेंत अतिशय उपयोगी पडतो आसन या व्यायामा सुगमन याचकरितां आहे गीतेंत आसनाविषयीं असें म्हटलें आहे—

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः।
उपविश्यासने युञ्ज्यात् योगमात्मविशुद्धये।
समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः।
संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन्॥
(गी० ६।११,१३)

" शुद्ध आणि पवित्र ठिकाणीं आपलें आसन असावें त्या आसनावर बसून आत्मशुद्धीकरितां योगाचा अभ्यास करावा शरीर, मस्तक आणि मान सम रेषेंत ठेऊन इकडे तिकडे न पाहता आपल्या नाकाच्या अग्रभागावर अचल दृष्टि लावावी "

हें ध्यानयोगाचें वर्णन आहे. यामुळें मनाची स्थिरता आणि इतर अनेक लाभ होतात याचा प्रारंभ आसनानें होतो. शरीर, मस्तक आणि मान हीं सम रेषेंत ठेवल्यानें मस्तकातून पाठीच्या कण्यात उत्तम रीतीनें मज्जाप्रवाह चालू होतो कण्यात वाकडेपणा आल्यानें मनाची शक्ति आणि बुद्धीचा प्रभाव कमी होतो. म्हणून आसनात शरीर-मस्तक-मान सम रेषेंत ठेवण्याचा हा उपदेश अतिशय महत्त्वाचा आहे बसताना आणि चालता फिरतानाही या नियमाचें पालन करणें अवश्य आहे

## प्राणायाम

आसन हा शरिराचा व्यायाम असून प्राणायाम हा प्राणाचा व्यायाम आहे. शरिरांत स्नायुमय्यानाशिवाय (१) मज्जा संस्थान, (२) प्राणसंस्थान, (३) रुधिराभिसरण-संस्थान आणि (४) पाचनसंस्थान अशीं चार मुख्य संस्थानें आहेत. हीं सर्वच महत्त्वाचीं असून यांत प्राणसंस्थानाचें महत्त्व सर्वांत अधिक आहे; कारण या स्थानीं रुधिराची शुद्धि होऊन शरिरास नवजीवन प्राप्त होतें. स्वाभाविक रीतीनें होणाऱ्या श्वासोच्छ्वासानें प्राणाचें आत घेणें आणि बाहेर सोडणें, या दोन्ही क्रिया व्यवस्थित होत नाहींत आणि या श्वासोच्छ्वासानें फुप्फुसांचा तिसरा भागच कामीं लागून बाकी उरलेले दोन भाग हे रिकामे राहतात. पूर्ण प्राणायाम केल्यानेंच संपूर्ण फुप्फुस काम करूं शकतें

फुप्फुसांत रक्ताचें शुद्धीकरण होत असल्यामुळें हें कार्य संपूर्ण फुप्फुसाकडून करविणें अत्यन्त आवश्यक आहे. म्हणून पूर्ण प्राणायाम केल्यानें संपूर्ण फुप्फुस कामीं लागतें आणि तिप्पट रक्तशुद्धि अधिक होते. शुद्ध रक्ताच्या पुरवठ्यानें सर्व शरीर निरोगी होतें.

पूर्ण प्राणायाम झाल्यानें मस्तक आणि मज्जेचीं केन्द्रेंही व्यवस्थित कार्य करूं लागतात, म्हणून प्राणायामानें मनावरही अनुकूल परिणाम होतो.

त्याचप्रमाणें आंत श्वास ओढल्यानें पोट फुगतें आणि श्वास बाहेर सोडून दिल्यानें पोट आंत ओढलें जातें. जर श्वास पूर्णपणें बाहेर सोडून दिला, तर बेम्बीच्या खालच्या भागापर्यंत ओढ पोंचते. यामुळें मलशुद्धि होण्यास सहाय्य होतें. अर्थात् प्राणायामामुळें मज्जा, रक्त, पचनक्रिया आणि प्राण या चारही स्थानांवर इष्ट आणि शुभ परिणाम घडून येतो, म्हणूनच योगग्रन्थांत प्राणायामाचें महत्त्व वर्णिलें आहे.

आसनें आणि प्राणायाम यांचे अनेक प्रकार आहेत. त्याचा परिणाम संपूर्ण शरिरावर होतो, रोग नष्ट होऊन आरोग्यप्राप्ति होते. या सर्व आसनांचें आणि प्राणायामांचें महत्त्व या ठिकाणीं वर्णन करण्याची आवश्यकता नाहीं, म्हणून हें थोडेसें केलेलें विवेचन येथें पुरे आहे. प्राण स्थिर झाल्यानें मन स्थिर होऊं लागतें. ही हठयोगाची क्रिया आहे. हींत आसनानें शरीर आणि प्राणानें श्वसनक्रिया स्थिर करून मन शान्त करण्याची पद्धति मुख्य आहे.

राजयोगांत सुविचारांच्या सहाय्यानें बुद्धि पवित्र करून तिच्यांत सद्विचारांच्याच सहाय्यानें मनाला एकाच विचारामध्यें स्थिर केलें जातें. एकदां मन स्थिर होऊं लागलें की मग प्राण आणि शरीर हीं सहजच स्वाधीन होतात. ही राजयोगाची प्रक्रिया आहे.

याप्रमाणें हे दोन्ही योग मनाला स्थिर करण्याचा प्रयत्न करीत असतात. गीतेनें या दोन्ही मार्गांचें वर्णन केलें आहे. पहा—

सर्वाणि प्राणकर्माणि आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति (गी० ४।२७)
अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे।
प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥२९॥
अपरे नियताहाराः प्राणान् प्राणेषु जुह्वति ॥३०॥ (गी. ४)
स्पर्शान् कृत्वा बहिर्बाह्यान् चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः।
प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ ॥२७॥ (गी ५)
भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् (गी ८।१०)
स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥
मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥ (गी. ८।१२)
प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधं ॥ (गी. १५।१४)
धृत्या यया धारयते मनःप्राणेन्द्रियक्रियाः।
योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्विकी ॥ (गी १८)

"(ते) सर्व प्राणकर्मे आत्मसंयमात समर्पण करतात. प्राण आणि अपान याची गति बन्द करून अपानांत प्राण आणि प्राणात अपान लावून प्राणायाम करतात, आहार नियमित करून प्राण आणि अपान यांना समान करतात. भ्रूमध्यांत प्राण आणून परम पुरुषाला प्राप्त होतात. मूर्धस्थानांत प्राण स्थिर करून योगधारणेंत मग्न असतात." या सर्व प्राणायामाच्या विभिन्न क्रिया आहेत. यातलें मुख्य गुज असें आहे कीं, प्राणाची गति बन्द केल्यानें शरीरान्तील सर्व मज्जाकेन्द्रें उद्दीपित होतात, शरिराचीं सर्व छिद्रें मोकळीं होतात, आणि चारी बाजूंनीं प्राणाचा शरिरान्त्या गात्रागात्रांतून अग्नि नसानसांतून प्रवेश होऊं लागतो. प्राणायामानें शरिराचीं सर्वच केन्द्रें उत्तेजित होतात. घाम येऊन प्रत्येक रोमरन्ध्र शुद्ध होतें.

## प्रत्याहार

अ संयमाच्या सहाय्यानें इंद्रियांचा विषयांपासून हळू हळू उपरम करून त्यांना विषयांपासून निवृत्त करणें याचें नांव प्रत्याहार. यान्या अभ्यासानें थोडीं कालानन्तर विषयाकडे इन्द्रियांची प्रवृत्तीच होत नाहीं या ठिकाणीं इन्द्रियांस

पूर्णपणें निवृत्त करणें हा भाव असून इन्द्रियांची प्रवृत्ति संयमित व्हावी, मर्यादेपेक्षा अधिक वाढूं नये, हेंच येथें तात्पर्य आहे. गीतेंत प्रत्याहार हें पद नाहीं, पण हा आशय मात्र खालील वचनात आलेला आहे—

यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ।
इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ (गी. २।५८)

' ज्याप्रमाणें कांसव आपल्या अवयवास आकुंचित करून घेतो, त्याप्रमाणें इन्द्रियांच्या विषयांपासून जो त्यांना मागें ओढतो, त्याची बुद्धि स्थिर झाली, असें म्हणतात. '

सबंध गीतेंत जागोजाग अनेक रीतींनीं संयमाचाच उपदेश केलेला आहे. या प्रत्याहारामुळें समाज आणि राष्ट्र यांचा अतिशय मोठा लाभ होऊं शकतो. इन्द्रियांच्या भोगलालसेमुळें समाजामध्यें ज्या अनन्त आपत्ति निर्माण होतात, त्यांपासून मुक्तता करून जर समाजामध्यें शान्ति प्रस्थापित करणें असेल, तर तें काम प्रत्याहाराच्या साहाय्यानेंच होऊं शकेल.

## धारणा, ध्यान व समाधि

एखाद्या ठिकाणीं चित्ताचें स्थिर राहणें, यास ' धारणा ' म्हणतात. धारणा अधिक स्थिर झाली, म्हणजे तिला ' ध्यान ' म्हणतात. यात ध्येयाशीं तद्रूप झाल्याचा अनुभव येतो. याच ध्यानाच्या स्थितीची उन्नति होऊन जेव्हां साधक स्वतःला विसरून जातो, तेव्हा त्या अवस्थेला समाधि म्हणतात आणि धारणा, ध्यान व समाधि यांचें एकीकरण म्हणजेच संयम होय. अर्थात् धारणा, ध्यान, समाधि व संयम हे चित्ताच्या एकाग्रतेचेच भेद आहेत. अन्तःकरण अथवा मन-बुद्धि-चित्त-अहंकार यांचें बल वाढविण्याकडे यांचा उपयोग होतो. एकाग्र झालेलें मन अत्यन्त सामर्थ्यवान होतें.

आस्थितो योगधारणाम् । (गी. ८।१२)
ज्ञानात् ध्यानं विशिष्यते ।
ध्यानात् कर्मफलत्यागः ॥ (१२।१२)
ध्यानेनात्मनि पश्यन्ति । (१३।२४)

(गी. १८।५२)

ध्यानयोगपरो नित्यम्।

अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते। (१२।६)

'(साधक) धारणेवर स्थिर राहतो. केवळ ज्ञानापेक्षा ध्यानाचें महत्त्व अधिक आहे. साधक ध्यानानें स्वतःमध्यें आत्म्याचें दर्शन करतो व अनन्ययोगानें ईश्वराचें ध्यान आणि त्याची उपासना करतो.'

याप्रमाणें गीतेंत धारणा आणि ध्यान यांचें वर्णन आहे. समाधीचें वर्णन गीता पुढीलप्रमाणें करते-

समाधौ अचला बुद्धिः तदा योगमवाप्स्यसि॥ (गी. २।५३)

'समाधींत बुद्धि स्थिर झाल्यावरच योग साध्य होतो.' येथपर्यंत आपण अष्टांग योगाचें पातञ्जल-योगदर्शन आणि गीता यानीं केलेलें वर्णन पाहिलें. गीतेंत अष्टांग योगाचें वर्णन आहे, हेंही आपण पाहिलें. योगाच्या अंगोपांगाचें वर्णन सबंध गीतेंत इतस्ततः विखुरलेलें आहे. हें सगळें वर्णन एके ठिकाणी नसल्यामुळें गीता अष्टांग योगाचें वर्णन करीत नाहीं, असा लोकांचा समज झाला आहे. पण गीतेच्या अनेक स्थानांतील वर्णनें पाहिलीं असतां असें आढळून येतें कीं, गीतेनें अष्टांग योगाचें एकही अंग सोडलें नसून या सर्व अंगांचा आपल्या एक विश्वरूप जीवनाच्या सेवेकरितां उपयोग करून घेतला आहे. हेंच गीतेच्या उपदेशाचें वैशिष्ट्य आहे. अस्तु.

एवढ्या विवरणावरून अष्टांग योग हा वैयक्तिक आणि सामाजिक उन्नतीस अत्यन्त उपयोगी आहे, हें सिद्ध झालें. याचीं अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह, शुद्धता, सन्तोष, तप, स्वाध्याय, ईश्वरपूजा हीं उपांगें सामाजिक आणि राष्ट्रीय व्यवहारास पवित्र करणारीं आहेत, म्हणून तीं राष्ट्रीय महत्त्वाचीं आहेत.

याचप्रमाणें आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधि हीं अंगें मनुष्याची वैयक्तिक उन्नति करणारीं आहेत. पूर्वी सांगितलेलीं उपांगेंही वैयक्तिक उन्नतीस साधक आहेत. व्यक्तीला योग्य बनवून, शक्तिसंपन्न करून, समाजाचें उत्तरदायित्व पाळण्यास समर्थ करून त्यास राष्ट्राच्या व्यवहारांत

यथास्थानीं स्थापन करणें हें योगानेंच साध्य होणार आहे.

परमेश्वर विश्वरूप असून सर्व मानव त्याच्या विश्वरूपांत सामावले आहेत. म्हणून त्यांच्यावर एक दायित्व आहे. तें पार पाडण्यास त्यांना योग्य बनविणें, हें योगानेंच साध्य होतें. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांना आपापलीं कर्तव्यें उत्तम रीतीनें करण्यास समर्थ बनविणें हें योगाचें कार्य आहे. विश्वरूप ईश्वराची सेवा, हें मनुष्याचें कर्तव्य आहे. तें कर्तव्य व्यवस्थित रीतीनें पार पाडण्यास मनुष्याचे ठिकाणीं कांहीं विशेष योग्यता पाहिजे. केवळ अशिक्षित आणि असंस्कृत मनुष्य तें कार्य योग्य रीतीनें करूं शकणार नाहीं. त्याला संस्कार आणि विद्या यांनीं युक्त करणें आवश्यक आहे आणि हें कार्य योगसाधनानें होतें. चारही वर्णांचीं कार्यें राष्ट्रसेवेकरितां अत्यावश्यक आहेत, तीं करण्याकरितां प्रत्येक वर्णाच्या घटकांत एक विशेष योग्यता पाहिजे. ती योग्यता योगाच्या द्वारेंच प्राप्त होईल. योगसाधनानें होणारें कार्य संस्काररूप आहे. शास्त्रीय शिक्षण हें गुरुकुलांच्या शिक्षणापद्धतीनें मिळत असतें आणि स्वभावाला नियमांनीं सुसंबद्ध करणें, हें योगसाधनानें होतें.

अष्टांग योगासंबंधीं इतकें विवेचन पुरे आहे. आतां उत्तम नागरिक बनविण्याकरितां गीतेच्या ज्या वेगवेगळ्या सूचना आहेत, त्यांचा विचार करूं.

## दैवी आणि आसुरी वृत्ति

गीतेच्या सोळाव्या अध्यायांत मानवाच्या दैवी आणि आसुरी प्रवृत्तींचा विचार केला आहे. त्या ठिकाणीं दैवी प्रवृत्ति आणि आसुरी प्रवृत्ति यांचे काय परिणाम होतात, याचा विचार केलेला आहे. मनुष्यांत दैवी प्रवृत्तींचा उत्कर्ष होऊन आसुरी गुण कमी व्हावेत, हेंच शिक्षणाचें ध्येय आहे. पहा—

### दैवी वृत्ति

अभयं सत्त्वसंशुद्धिः ज्ञानयोगव्यवस्थितिः ।
दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥१॥
अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शान्तिरपैशुनम् ।
दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥२॥

तेज. क्षमा धृति. शौचमद्रोहो नातिमानिता।
भवन्ति सपद दैवीमभिजातस्य भारत ॥३॥
दैवी सपद्विमोक्षाय मता ॥५॥ ( गी० १६ )

"(१) निर्भयता, (२) जीवनाची शुद्धता, (३) स्वाधानतेचें ज्ञान प्राप्त करण्याची इच्छा, (४) योगसाधनानें आपल्या उन्नतीचा यत्न करण्याची आतुरता, (५) दान देणें, (६) आत्मसंयम, (७) यज्ञ करणें, ( श्रेष्ठाचें पूजन, समानाचें सघग्न आणि दीनाना साहाय्य करणें ) (८) स्वाध्यायाच्या द्वारें ज्ञानाची उन्नति, (९) तप म्हणजे सत्कर्मांत होणारे कष्ट सहन करण्याची शक्ति, (१०) सरळ व्यवहार करणें ( व्यवहारात कपट, लाहालबाडा, वाकडेपणा न ठेवणें), (११) अहिंसा, (१२) सत्य, (१३) क्रोध न करणें (१४) त्यागभाव, (१५) शान्ति, (१६) चहाडी न करणें, (१७) प्राण्यावर दया करणें, (१८) लोभ न धरणें, (१९) स्वभावातील मार्दव, (२०) वाईट काम करण्याचा लाज, (२१) स्वभावांत चचलता नसणें (२२) तेजस्विता, (२३) सहनशक्ति, (२४) धैर्य, (२५) शुद्धता, (२६) द्रोह न करणें, (२७) गर्व न धरणें, हे २७ गुण दैवी सपत्तीच्या मनुष्यात आढळून येतात " हीं उत्तम नागरिकाचीं लक्षणें आहेत.

यापैकीं जीवनातील शुद्धता, ज्ञान आणि योग सिद्ध करण्याची इच्छा, दान, आत्मसंयम, यज्ञ, स्वाध्याय, तप, अहिंसा, सत्य, त्याग हे गुण योगाच्या यमनियमामध्यें येऊन गेलेच आहेत तसेंच यापैकीं काहीं कर्मफलत्यागातही आले आहेत याचें पालन केलें असता पुढील गुणही सहज आपलेसे होतात— 'निर्भयता ( सत्कर्म करताना कोणालाहा न भिणें ), सरळ आचरण, क्रोध न करणें, शान्तता-पालन, चहाडा न करणें, सर्वांवर दया करणें, लोभ न धरणें, स्वभावांत मृदुता, वाईट कर्माम भिणें, चंचलतेचा त्याग करणें, तेजस्विता, सत्कर्म करीत असता होणारी निन्दास्तुति सहन करणें, धैर्य, द्रोह न करणें, गर्व न करणें, ' हे गुण या ठिकाणीं अधिक मागितल आहेत हे सर्व गुण विश्वरूप ईश्वर मानण्यानेंच सिद्ध होणारे आहेत , उदाहरणार्थ, सरळ व्यवहार हा गुण पहा विश्वरूप ईश्वर मानल्यावर कोणाशींही होणारा व्यवहार हा ईश्वराशींच

होणार असल्यामुळें तो सरळ होणें हें अनिवार्यच आहे. विश्वरूप ईश्वर असल्यामुळें कोण कोणावर रागावेल आणि कोण कोणाची चहाडी करील ? ईश्वराशी वागतांना कोण आणि कसा गर्व करील ? याप्रमाणें हे सगळे दैवी गुण विश्वरूप ईश्वर मानल्यानेंच अंगी बाणणारे आहेत. ज्या शिक्षण पद्धतीमुळें हे गुण अंगी उतरतील, तीच शिक्षणपद्धति देशांत रूढ झाली पाहिजे; तरच खरी शान्ति स्थायी होईल.

आपण आज असें पाहतों की किलेक राष्ट्रें विशिष्ट शिक्षण पद्धतीनें आपल्या लोकांत शौर्यवीर्यादि गुणाची वाढ करीत आहेत. तर मग आपणही पुढील पिढींत दैवी शिक्षणाची वृद्धि करून या दैवी शुभ गुणाची वाढ कां करूं शकणार नाहीं ? शिक्षणानें सर्व कांहीं साध्य होऊं शकेल.

## आसुरी वृत्तीचे घोर परिणाम

आतां आपण आसुरी वृत्तीचे परिणाम कसे घोर होतात, याचा विचार करूं. याविषयीं गीता म्हणते–

प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।
न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥७॥
असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।
अपरस्परसम्भूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥
एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।
प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥९॥
काममाश्रित्य दुष्पूरं दम्भमानमदान्विताः ।
मोहाद्गृहीत्वाऽसद्ग्राहान्प्रवर्तन्तेऽशुचिव्रताः॥१०॥
चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः।
कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥११॥
आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः
ईहन्ते कामभोगार्थं अन्यायेनार्थसंचयान् ॥१२॥
इदमद्य मया लब्धं इमं प्राप्स्ये मनोरथम्
इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥ १३ ॥

असौ मया हतः शत्रुः हनिष्ये चापरानपि ।
ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥१४॥
आढ्योऽभिजनवानसि कोऽन्योऽस्ति सदृशो मया
यक्ष्ये दास्यामि मोदिष्ये इत्यज्ञानविमोहिताः ॥१५॥
अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृताः ।
प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ ॥१६॥
आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।
यजन्ते नामयज्ञैस्ते दम्भेनाविधिपूर्वकम् ॥ १७ ॥
दम्भो दर्पोऽतिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।
अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ ४ ॥
अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।
मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥
त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।
कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ।२१।
एतैर्विमुक्तः कौन्तेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।
आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥२२॥ गी० १६

आसुरी प्रवृत्तीच्या लोकांचें गीतेनें हें सविस्तर वर्णन केलें आहे. म्हणून आपण याचा थोडक्यांत विचार करूं.

कोणत्या सत्कर्माकडे प्रवृत्ति असावी आणि कोणत्या असत् कर्मांपासून निवृत्त व्हावें, हें आसुरी प्रवृत्तीच्या लोकास कळत नाहीं. हा विचार नसल्यामुळें ते जें करूं नये तें करतात आणि जें करणें उचित आहे, तें करीत नाहींत. याचा त्यांच्यावर विपरीतच परिणाम होतो. या आसुरी प्रवृत्तीच्या लोकांत पवित्रता, शुद्धता, सदाचार आणि सत्य यांचा मागमूसही नसतो. हे बहुधा नेहमीं अपवित्र असतात, दुराचार करतात आणि असत्य व्यवहारांत मग्न असतात.

ते या जगाला असत्य म्हणतात. या जगताला ईश्वराचा आधार नाहीं, याचा नियामकही कोणी नाहीं, या जगांत ईश्वर या नांवाचा कोणी पदार्थ नाहीं,

असें त्यांचें मत असतें. हें विश्व कोणत्याही क्रमानें उत्पन्न झालें नसून अर्थात् पंचतत्त्वें परस्परांत मिसळल्यानें या सर्वांची उत्पत्ति झाली नसून, हें विश्व आपो- आपच निर्माण होतें आणि नष्टही होतें, यामुळें येथें भोग भोगणें हेंच एकमात्र मानवाचें साध्य असावें, असें ते म्हणतात. जर ते क्रमानें उत्पत्ति मानतील, तर मग आत्म्यापासून आकाश, वायु, अग्नि, जल, पृथ्वी, औषधी, अन्न आणि प्राणी असा क्रम त्यांना मानावा लागेल, आणि शेवटीं आत्मतत्त्वाचा स्वीकार करावा लागेल. म्हणून हे क्रमसृष्टि मानीत नाहींत. पञ्चमहाभूतांचे अणु स्थायी असून एकमेकांपासून उत्पन्न झालेले नाहींत, असें हे मानतात. म्हणून ईश्वराचें अस्तित्व यांस अमान्य आहे. अशा रीतीनें कोणी नियामक नसल्यानें यांच्या मतानें खा, प्या आणि सुख भोगा, हाच परम पुरुषार्थ असतो. म्हणून यांच्या राज्यांत ' बळी तो कान पिळी ' हा न्याय असतो.

जो सगळ्यांत बलवान् असेल, तो राजा असावा, असे यांचे विचार असल्यामुळें हे सर्वांचा एक अखण्ड आत्मा मानीत नाहींत. यांच्या विचारांतून आत्मभावच नष्ट झाल्यामुळें यांची बुद्धि विशाल न होतां अल्प होत जाते, आणि यांना आपल्या हितापुढें दुसऱ्याचें हित दिसतच नाहीं. हे आपली शक्ति वाढवून तिचा उपयोग भयंकर कर्मे करून जगाचा नाश करण्याकडे करतात, आणि तसें करण्यांत यांना मोठा आनंद होत असतो.

ज्या कामांचा कधींही शेवट होत नाहीं, अशीं कर्में करून हे आपले भोग वाढवितात, दम्भ, मान आणि गर्व यांनीं युक्त होऊन अपवित्र कार्ये करवितात, आणि मूर्खपणानें असद्विचारांना चिकटून बसून तसलींच कार्ये करीत असतात.

हे अपरिमित चिन्तेची वाढ करतात, आणि तीमुळें त्यांचाच नाश होतो हें दिसत असूनही हे त्याच चिंतेंत गुरफटून राहतात, आपले कामोपभोग वाढवितात, आणि हेंच परम साध्य आहे, असें मानतात.

अनेक आशाच्या पाशानीं हे बांधलेले असतात, काम-क्रोधानीं युक्त असतात, आणि अशा प्रकारें कामाची वाढ झाल्यामुळें त्या कामाची पूर्ति करण्याकरितां हे अन्यायानें द्रव्य एकत्र करतात. परन्तु यामुळें यांची इच्छा मात्र कधींच तृप्त होत नाहीं.

हे म्हणतात कीं, 'पहा, आज मी हें प्राप्त केलें, उद्यां तो मनोरथ पूर्ण करीन, हें तर माझ्याजवळच राहील, यानंतर मी तें धन प्राप्त करीन, अशा प्रकारें माझें द्रव्य वाढतच जाईल.

आज मी या शत्रूचा नाश केला, उद्यां त्या शत्रूला नष्ट करून टाकीन. मग मला कोणीही शत्रु शिल्लक राहणार नाहीं. त्याच वेळीं मी सर्वांचा राजा होईन, मीच भोग भोगीन, मीच या सर्वांपेक्षां अधिक बलवान् होईन, आणि म्हणूनच मी सर्वांत सुखी होईन.

मी श्रीमंत आहें, मी कुलीन आहें, माझ्या तुलनेचा पुरुष या पृथ्वीवर दुसरा कोण आहे? मी मोठमोठाले यज्ञ करीन, मी मोठमोठाली दानें देईन, त्यामुळें चहूंकडे माझें यश वाढतच जाईल. आणि मग मी एकटाच त्या आनंदाचा उपभोग घेईन" अशा अज्ञानामुळें उत्पन्न झालेल्या विचारांनीं ते मोहित झालेले असतात.

अनेक कुविचारांनीं ते भ्रान्त होतात, अनेक मोहजालांनीं वेढले जातात, नाना प्रकारच्या कामोपभोगांत आसक्त होऊन अन्तीं ते घोर नरकात पडतात.

आपल्या गर्वानें उन्मत्त झालेले, आपलें मत कधींही न बदलणारे, धन, मान आणि घमेंड यांनीं युक्त असे हे लोक मोठ्या दम्भानें विधीला सोडून मोठमोठाले यज्ञ करण्याचें अवडंबर करतात. पण त्यांत श्रद्धा किंवा भक्ति याचा सगळीं अभाव असतो. हें यज्ञ वगैरे सर्व कांहीं स्वतःचा मोठेपणा वाढावा, म्हणूनच असतें.

दम्भ, गर्व, अभिमान, क्रोध, कठोरता, अज्ञान, बलाची घमेंड हीं सर्व आसुरी प्रवृत्तींचीं स्वाभाविक लक्षणें आहेत. हे आपल्या कर्मांच्या योगानें स्वतःच्या आणि दुसऱ्याच्या शरिरांत असणाऱ्या ईश्वराचा द्वेष करतात, आणि त्याची यथेच्छ निन्दाही करतात.

काम, क्रोध आणि लोभ, हें नरकाचें त्रिविध द्वारच आहे. यामुळें आपणाबरोबरच सर्वांचा नाश होत असल्यामुळें यांचा त्याग करणेंच उचित आहे. या तीन दारांतून नरकाचा मार्ग जात असल्यामुळें या कुमार्गांचा त्याग करणारा साधकच आपल्या कल्याणाचा मार्ग चोखाळू शकतो, आणि परम गतीला प्राप्त होतो.

अशा प्रकारें विस्तारपूर्वक आसुरी प्रकृतीच्या लोकांचें वर्णन करून हा मार्ग कल्याणाचा नव्हे, असें गीतेनें सांगितलें आहे. जगांतील नाना देशांत हेच आसुरी प्रकृतीचे लोक मोठमोठ्या अधिकाराच्या जागीं असलेले दिसतात, आणि यांच्याच-मुळें मोठमोठीं भयानक युद्धें पेटतात आणि पुढेंही पेटतील. यांच्याचमुळें जगाचा नाश होतो आणि पुढेंही होईल.

## राष्ट्रीय शिक्षण

म्हणूनच गीता यावर असा उपाय सांगते कीं देशदेशान्तरांत दैवी भावाची वृद्धि आणि आसुरी भावाचा नाश करणारी शिक्षणपद्धतीच रूढ व्हावी ज्यामुळें दैवी भाव अंगीं असलेल्या लोकांच्या हातीं राज्यकारभार येईल, आणि आसुरी प्रवृत्तीचे लोक एकतर कमी तरी होतील किंवा वर तरी उठणार नाहींत अशीच राज्यव्यवस्था निर्माण व्हावी. आसुरी प्रवृत्तीच्या लोकांस मन मानेल तें करण्यास मुभा नसावी. भागवत राज्यपद्धतींत दैवी भावनेला उत्तेजन मिळेल, आसुरी भावनेला कमी केलें जाईल, आणि सर्व लोक स्वत च आपलें नियंत्रण करतील अशी व्यवस्था होईल

यापुढें भगवद्गीतेंत सत्त्व, रज आणि तम प्रवृत्तीच्या लोकांचीं लक्षणें विस्तार-पूर्वक दिलेलीं आहेत, उद्देश हा कीं त्यामुळें प्रत्येक मनुष्याची परीक्षा होऊन त्याचे गुण निश्चित केले जावेत, आणि त्या गुणांप्रमाणें सात्विक, राजस आणि तामस प्रवृत्तीच्या लोकांकडे अनुक्रमें सात्विक, राजस आणि तामस कर्में सोंपविलीं जावींत त्याच्या गुणास अनुकूल अशीं कर्में त्याकडे सोंपविलीं असता ते तीं व्यवस्थितपणें करतील, आणि त्यामुळें विश्वाची यथायोग्य सेवा होईल

हा मानवाच्या गुणाच्या परीक्षेचा विषय अत्यन्त व्यापक आणि महत्त्वाचा आहे. येथें केवळ संक्षेपानें त्याचा उल्लेख केला आहे

व्यवहारांत योगाचा अत्यन्त उपयोग आहे, आणि सर्व मानवांना यामुळें सुख प्राप्त होऊं शकतें हें या विवरणांत स्पष्ट करून सांगितलें आहे.

---

# श्रीमद्भगवद्गीतेचें ध्येय

या लेखात भगवद्गीतेचें ध्येय काय, हा विचार करणें आहे भगवद्गीता युद्धाच्या वेळीं सांगितली व तिचा उद्देश सगळ्या विश्वात चिरन्तन शांति स्थापन करणें, हा होता याविषयीं गीता म्हणते—

मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।
स गुणान्समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ॥२६॥
ब्रह्मणो हि प्रतिष्ठाऽहं अमृतस्याव्ययस्य च ।
शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च ॥२७॥
( गी० १४ )

जो मज विश्वरूपाची अव्यभिचारिणी भक्ति- सेवा -करतो, ता गुणातीत होऊन ब्रह्मभावास प्राप्त होतो ' मी ' विश्वरूप, अव्यय आणि अमृत अशा ब्रह्माचा आधार आहें आणि शाश्वत धर्म व अक्षय सुखाचा आश्रयही आहें' या ठिकाणा शाश्वत धर्म आणि अक्षय सुख यांचा विचार आलेला आहे विश्वरूपाच्या वर्णनातही तें

विश्वरूप—

शाश्वतधर्मगोप्ता। ( ११।१८ )

' शाश्वत धर्माचे संरक्षण करणारें आहे, असें सांगितल आहे यावरून विश्वरूप ईश्वर हा शाश्वतधर्माचे रक्षण करून अक्षय सुख देणारा आहे, हें स्पष्ट होतें या विषय आणखी पहा—

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ।
तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे स शान्तिमाप्नोति न कामकामी ॥
(२।७०)

निर्ममो निरहंकारः स शान्तिमधिगच्छति ॥ ( गी० २।७१ )
ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥ ( ४।३९ )

तत्प्रसादात्परां शान्ति स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥
( १८।६२ )

मत्प्रसादात् अवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ( १८-५६ )

"भरलेल्या समुद्रास नद्या मिळाल्यावरही तो आपली मर्यादा सोडीत नाहीं, त्याप्रमाणें अनेक प्रकारचे विषय प्राप्त झाल्यावरही याच्या वृत्तींत उच्छृंखलता निर्माण होत नाहीं तो शांत असतो ममत्व आणि अहंकार याचा त्याग केल्यानें शांति प्राप्त होते. ज्ञानाच्या प्राप्तीनें श्रेष्ठ अशी शांति मिळते. विश्वरूप ईश्वराच्या प्रसादानें उत्तम शांति आणि शाश्वत स्थान प्राप्त होतें."

[1] या, आणि दुसऱ्याही ठिकाणीं गीतेनें सर्वांच्या पुढें शांति हेंच ध्येय ठेवलें आहे गीतेनें सांगितलेल्या धर्माच्या पालनानें स्थिर स्वरूपाची शांति आणि अखण्ड सुखाचा लाभ होणार असल्यामुळें त्याच धर्माचें पालन करणें सर्वांस इष्ट व योग्य आहे.

गीतेचा सर्व उपदेश पिण्ड-ब्रह्माण्डाची एकता मानूनच केला गेला आहे. व्यक्तीच्या शांतीकरितां जे नियम लागू पडतात, त्याच नियमांचा विस्तृत प्रमाणावर उपयोग केल्यानें ते राष्ट्राच्या शांतीसाठींही उपयोगी पडूं शकतात.

( १ ) कामोपभोगाचा संयम,

( २ ) अहंकार आणि ममत्व सोडणें, 'हें माझें आणि तें दुसऱ्याचें' असे लहानमहान भेद समाजजीवनांत निर्माण न करतां अखण्ड भावानें सर्वांच्या हिताचा विचार करणें,

( ३ ) यथार्थ ज्ञान प्राप्त करणें,

( ४ ) आचरण केलेल्या सेवेनें विश्वरूपाला प्रसन्न करून त्याचा प्रसाद मिळविणें.

अगदीं थोडक्यांत विश्व-शांतीचे हे चार उपाय येथें सांगितले आहेत याचें पालन केलें असतां जशी व्यक्तीला सुख-शांति प्राप्त होऊं शकते, त्याचप्रमाणें राष्ट्रांनाही यांच्याच योगानें शांति आणि सुख प्राप्त होईल. पण राष्ट्र किंवा समाज यांनीं याचें पालन मात्र केलें पाहिजे खरें पाहिलें तर 'गीतेचें ध्येय विश्वशांति हें आहे. कारण गीतेच्या' तत्त्वज्ञानांत एकाच अखण्ड, अविभक्त अशा विश्वरूपाचा उपदेश केला आहे,

आणि त्या विश्वरूपाची प्रसन्नता हेंच गीतेला इष्ट आहे

व्यक्तीच्या समर्पणानें समाजाची शांति आणि समाजाच्या समर्पणानें विश्वाची शांति करणें हें गीतेला अभिप्रेत आहे यावेंच नाव यज्ञ परंतु स्वतःच्या सुखाकरिता व्यक्तीनें समाजाच्या सुखाचा विचार डोळ्याआड करावा, अथवा एकाद राष्ट्राच्या शांतीकरता त्या राष्ट्रानें विश्वरूपाचा विचार त्यागावा, हें गीतेच्या तत्वज्ञानाच्या दृष्टीनें अयोग्य आहे

म्हणून गीतेंत व्यक्तीकरिता सांगितलेल्या सुनियमाच पालनच अत्यन्त मोठ्या प्रमाणावर राष्ट्राच्या जीवनातही झालें पाहिजे राष्ट्रीय जीवनाचें सूत्र म्हणून हा सिद्धांत विसरता उपयोगी नाहीं आणि मगच गीतेचा उपदेश हा केवळ व्यक्ती-करिता नसून समाज आणि राष्ट्र याच्याकरिताही आहे, ही गोष्ट लक्षात येईल व त्यानंतरच गीता व्यवस्थितपणें समजू शकेल आज गीतेच आदेश हे केवळ एकाद व्यक्तीकरिता आहेत असें मानून अनेक व्यक्तींनीं आपल्या धर्मांत सुधारणा केली आणि ते शाश्वत शांतीला प्राप्तही झाले पण त्यामुळें गीतेचें मुख्य ध्येय जें विश्व शांति, तें साध्य होण्याजोगी परिस्थिति मुळींच निर्माण झाली नाहीं म्हणूनच या दृष्टीनें यापुढें या रीतीनें प्रयत्न करणें अवश्य झालें आहे

## विश्वसेवा हेंच ध्येय आहे

भागवतधर्माचें ध्येय विश्वरूपाची अखण्ड सेवा हेंच आहे गीतेंत अनेक ठिकाणीं भगवान् श्रीकृष्ण विश्वरूप-भावनेनेंच बोलत आहेत व त्या त्या ठिकाणीं तोच भाव ग्रहण करणें योग्य आहे परमेश्वर विश्वरूप आहे, तो अखण्ड आहे, त्यांत पन्थ आणि जाति हे भेद नाहींत संपूर्ण विश्व एक, अखण्ड आणि अनन्य आहे त्याची त्याच अनन्य रूपात सेवा करणें योग्य आहे त्याची सेवा करण्याकरिताच सर्व जीव निर्माण झाले आहेत

सूर्य प्रकाश देतो, वायु वाहतो, मेघ वृष्टि करतो, वृक्ष फळें देतात, नद्या वाहतात, अग्नि जळतो, हें सर्व विश्वसेवेकरिताच होत असतें त्याचप्रमाणें मनुष्य पाहतो, एकतो, श्वास घेतो, कर्म करितो आणि विश्रान्त राहतो, हें सर्व विश्वरूपाचा अंश या नात्या नेंच होत असतें तो विश्वरूपाचाच अंश आहे व राहीलही तो ज्या विराट्

स्वरूपाचा अंश आहे, त्याची सेवा करणें आणि आपलें जीवन त्या विराट् स्वरूपाच्या चिरकालीन शांतीकरितां अर्पण करणें, हेंच अंशाचें कर्तव्य आहे. त्या विराट् स्वरूपापासून वेगळें होण्याची त्या अंशानें कधींही इच्छा करूं नये. कारण ती इच्छा सफल होणार नाहीं. तसा यत्न केला तर नाश मात्र होईल.

अंश आणि तो ज्या वस्तूचा अंश आहे ती वस्तु म्हणजे अंशी हे नेहमीं एकत्रच राहणार, अंश अंशीच्या शरीराचा भाग म्हणूनच राहील, अंशाला स्वतंत्र असें अस्तित्व नाहीं, अंश जिवंत राहील तर तो अंशीमध्येंच, आणि मरेल तरीही तो अंशीमध्येंच. अंशीपासून फुटून वेगळें होणें हें अंशास सर्वथा अशक्य आहे आणि असा वेगळें होण्याकरितां केलेल्या प्रयत्न हाही त्याच्या दुःखासच कारण होईल, तसें केल्यानें त्याचा विनाशही होईल.

म्हणून हा अनन्य भाव जाणणें आणि त्या अनन्य भावानें अंशीची सेवा करणें हेंच अंशाचें कर्तव्य होय. गीतेंत अनन्य-योगाचा उल्लेख करून हेंच सांगितलें आहे. हा गीतेचा मुख्य सिद्धांत आहे. अंशी हा विश्वरूप असून विश्वांतला प्रत्येक पदार्थ हा त्याचा अंश आहे. सूर्य, चन्द्र, वृक्ष, वनस्पति, पशु, पक्षी, मनुष्य हे सर्व विश्वरूपाचेच अंश आहेत. ज्या धर्माचा विचार आपण करूं इच्छितों, तो मनुष्यांचा धर्म आहे. बाकीचे प्राणी आणि पदार्थ आपापल्या स्वभावधर्माप्रमाणें वर्तत आहेतच. मनुष्यांत स्वतन्त्र बुद्धि आहे, म्हणून तो तिच्या सहाय्यानें या धर्मांत उलथापालथ करूं इच्छितो आणि त्याचा परिणाम म्हणून सुखदुःखें भोगीत असतो. मनुष्याला दुःखें भोगावीं लागूं नयेत, म्हणून या धर्माचें विवेचन गीतेनें केलें आहे.

मनुष्यानें आपणा स्वतःस विश्वरूपाचा अंश समजावें, पहावें आणि तसा अनुभव घ्यावा. तसेंच अंश हा अंशीच्या सेवेनेंच कृत कृत्य होत असतो, हेंही त्यानें ओळखावें, आणि विश्वसेवा हेंच आपलें नियत कर्तव्य आहे असें समजून घेऊन तें करीत रहावें.

विश्वरूप हेंच ईश्वराचें रूप आहे, असें गीतेनें अकराव्या अध्यायांत स्पष्ट केलें आहे. या विश्वरूपांत सर्व विश्वाचा अन्तर्भाव होतो. त्याचप्रमाणें त्यांत आपलाही अन्तर्भाव होत असून आपण त्या विश्वरूपाचा अंश आहोत, हें ज्ञान प्राप्त करून

घेणें आणि याच मनन करून तें आपलेंसें करून घेणें, हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे. यालाच ज्ञान असें म्हणतात. मनुष्यांकरिता जें कांहीं जाणून घेण्याजोगें आहे, तेंही हेंच आहे यानेंच सर्व मानवी व्यवहाराची परीक्षा होईल सर्व धर्म आणि अधर्म, कर्तव्य आणि अकर्तव्य याचा निर्णय यानेंच होईल. बाकीचें सर्व ज्ञान या ज्ञानाचा विस्तार आहे

मनुष्यानीं अहिंसा कां पाळावी ? सत्याचें पालन कां करावें ? अस्तेय कां आचरावें ? या सगळ्या प्रश्नांचें एकच उत्तर आहे संपूर्ण विश्वरूप ही एकच अखण्ड सत्ता आहे सर्व जीव त्याचेच अंश आहेत, म्हणून परस्पराशीं व्यवहार करताना अहिंसा, सत्य, अस्तेय या नियमाचें पालन करणें अवश्य आहे ' माझें–व्यक्तीचें–वर्तन कसें असावें ? ' या प्रश्नाचें जें उत्तर, तेंच या वरील प्रश्नाचेंही आहे एकच सत्ता मानल्यावर कोण कोणाची हिंसा करील ? याप्रमाणें विश्वरूपाचें व्यवस्थित ज्ञान झाल्यावर या सर्व शंकाच समाधान होऊं शकतें म्हणूनच या ज्ञानाला श्रेष्ठतम ज्ञान असें म्हणतात

मनुष्याला जें समजणें आवश्यक आहे, तें हेंच आहे यामुळेंच मनुष्याचा व्यवहार सुधारेल हेंच ज्ञान होय बाकीच्या सर्व शास्त्रास विज्ञान असें नाव आहे

संपूर्ण विश्वरूप एकच अखण्ड आणि अनन्य अशी सत्ता आहे येथ दुसऱ्या कोणत्याही पदार्थाचें अस्तित्व नाहीं मग विधर्मांचा विचार निर्माणच कसा होतो, असा प्रश्न उत्पन्न होणें स्वाभाविक आहे याचें उत्तर असें– ज्याप्रमाणें महासागराचें पाणी एकच असूनसुद्धा त्यात एक मोठी लाट उसळल्यावरोबर त्या एका पाण्यातच वरचें, खालचें आणि मधलें असे तीन भेद निर्माण होतात, त्याचप्रमाणें अखण्ड विश्वरूप एक असूनसुद्धा त्यात विचार–लहरींमुळें विविध भावना निर्माण होणें सहज शक्य आहे

या विश्वरूपात सगळीकडे एकच मन असूनसुद्धा त्यात सात्त्विक, राजस आणि तामस असे तीन भेद निर्माण होतात हे तीन भेद वस्तूचे नसून स्थितीचे आहेत उदाहरणार्थ, " तमस् " याचा अर्थ गतिरहित स्थिति असा आहे " रजस् " याचा अर्थ गतिमय स्थिति असा आहे आणि " सत्व " याचा अर्थ सम स्थिति असा आहे विचारांतीं असें आढळून येईल की, गतिमय, गतिरहित आणि सम हे

सर्व अवस्थांचे अथवा स्थितीचे भेद आहेत. या वेगवेगळ्या वस्तु नाहींत. एकच वस्तूच्या या तीन स्थिति आहेत. त्रिगुणात्मक विश्वाचा हाच अर्थ आहे.

हाच नियम समाजांत लावून पहावा. समाजामध्यें कित्येक पुरुष सत्त्वगुणी, ज्ञानी आणि सन वृत्तीचे असतात; कित्येक रजोगुणी, प्रयत्नशील, धीरस्ृत्तीनें युक्त असे असतात आणि कांहीं आळसांत मग्न होऊन कांहींच करीत नाहींत. कित्येक चोरी इत्यादि कुकर्मेंही करतात. सध्यांचा समाज चोरी करणारांना कारागृहाची शिक्षा देतो. अर्थात् तो समाज चोरीबद्दल त्या चोरांना उत्तरदारी समजतो आणि त्यांना कारागृहांत बंद केल्यावर त्याचा मुळींच विचार करीत नाहीं. परन्तु विश्वरूपवादी मनुष्य त्यांचा विचार वेगळ्या दृष्टीनें करील. तो म्हणेल कीं, हें विश्वरूप ईश्वराचेंच रूप आहे, सगळी मनुष्यें समान आहेत, मग यामध्यें अपराध करणारे हे निर्माण झाले कसे ? ही जी चोरांची प्रतिक्रिया झाली, ती कोणत्या सामाजिक क्रियेचा परिणाम आहे ? अशा प्रकारें विचार केल्यावर त्याला समजून येईल कीं, समाजामध्यें परिग्रहाचा आश्रय करून जे आपल्याजवळ आवश्यकतेपेक्षा अधिक संग्रह करून ठेवतात, त्याचा परिणाम म्हणजे ही चोरीची प्रवृत्ति होय. हें लक्षांत आल्यावर विश्वरूपवादी मनुष्य समाजातील परिग्रही लोकांना शिक्षा करण्याचा यत्न करील, अथवा त्यांना परिग्रहशून्य करून टाकील.

विश्वरूपवादी राज्यांत कारागृह हें खरोखरच कारा–गृह म्हणजे कारागिरी शिकण्याचें स्थान होईल. आजच्या कारागृहांतील बंदिवासी जनांत मुळींच सुधारणा होत नाहीं; कारण त्यांच्या रोगाचें अनुमानच नीटपणें केलें जात नाहीं. ज्याप्रमाणें औषधालयात शारीरिक रोग्याची आणि मानसिक चिकित्सालयांत मानसिक रोग्यांची परीक्षा केली जाते, त्याचप्रमाणें कारागृहांत त्या आर्थिक रोग्यांची चिकित्सा आर्थिक विषमता दूर करण्याच्या उपायांनी केली पाहिजे.

याचप्रमाणें सध्याचे कायदे आणि इतर सर्व व्यवहार प्रत्येक मनुष्याचें अस्तित्व वेगवेगळें मानूनच होत असतात. हे सर्व व्यवहार सर्व मनुष्याचें एक सामुदिक अस्तित्व आहे, असें समजूनच केले जातील. यामुळें आजच्या कायद्यांत बरेंच परिवर्तन करावें लागेल. पण परिणामीं तें लाभदायकच ठरेल.

या व्यवस्थेंत देश, जात, जन्म, वर्ण इत्यादि कारणांमुळें भेद मानले जाणार नाहींत. संपूर्ण विश्व हें एकच कुटुंब मानलें जाईल. सर्वांना एकाच कुटुंबाचें अंग होण्याचा अधिकार लाभेल. मनुष्याच्या आगच्या गुणांमुळें त्याच्या हातून जसजशीं कर्मे घडतील, तसतसा अधिकार त्याला प्राप्त होईल, " विद्वान् ब्राह्मण, श्वपच चांडाल, स्त्रिया, वैश्य, शूद्र, हत्ती, घोडा, गाय इत्यादि सर्वांवर सम-दृष्टि राहील." (गी० ५।१८) अर्थात् हे यांच्याकडून होणारीं कर्मे उत्तमांत उत्तम करीत राहतील, आणि यांना जीवनाकरितां आवश्यक असलेल्या वस्तु भरपूर मिळतही राहतील. सम दृत्तीचा भाव असा आहे कीं, व्यवहारांत सर्वत्र समता पाळली जाईल.

आज जाति आणि प्रदेश याच्याकरितां जीं भाडणें होत आहेत, तीं त्यावेळी होणार नाहींत, कारण तेव्हा हे सध्याचे प्रतिबंधही राहणार नाहींत.

ईश्वर विश्वरूप असल्यामुळें विश्वातील प्रत्येक अणु आणि परमाणु हा ईश्वर-रूपच आहे. ईश्वर सर्व विश्वात व्याप्त आहे, ही गोष्ट आजही मानली जाते; पण हें मानणें वेगळें आहे. विश्वाला ईश्वराहून वेगळें मानून पुनः त्या विश्वात त्याहून वेगळा असा ईश्वर भरलेला आहे, असा या मानण्याचा आशय असतो. पण विश्वरूप ईश्वर मानणारे असें म्हणत नाहींत. ते असें समजतात कीं, विश्वच ईश्वराचें रूप आहे किंवा विश्वरूपच ईश्वर आहे. यानें असे सिद्ध होतें कीं विश्वात जे अणु, परमाणु, वस्तु किंवा दुसरें कांहीं अस्तित्वात आहे, तें सर्व ईश्वराचेंच रूप आहे.

## " ईश्वर " शब्दाचा अर्थ काय ?

आत्मा, ब्रह्म, ईश्वर इत्यादि शब्द " महासामर्थ्यवान् सत्ता " हा अर्थ प्रकट करितात. ही सत्ता ज्ञानमय, सर्वसामर्थ्यमय, कर्मशक्तिमय आणि स्वयंप्रज्ञ आहे. म्हणून या विश्वातील प्रत्येक अणु आणि परमाणु अनन्त सामर्थ्यानें युक्त आहे. त्यामध्यें कोणत्याही प्रकारचा कमीपणा वा अधिकपणा नाहीं.

या विश्वातील प्रत्येक पदार्थ ईश्वराचें रूप आहे. असें असल्यामुळें तें सर्व सार-ख्याच योग्यतेचें आहे. या सर्वांतील हें समत्व पाहणें आवश्यक आहे. म्हणूनच म्हटलें आहे कीं—

**सर्वत्र समबुद्धयः।** (गी० १२।४)
**सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते।** (गी० २।४८)
**साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते।** (गी० ६।९)
**समः शत्रौ च मित्रे च।** (गी० १२।१८)
**समः सर्वेषु भूतेषु।** (गी० १८।५४)

" सर्वत्र सम बुद्धि ठेवणें योग्य आहे. सिद्धि आणि असिद्धि या द्वंद्वाविषयीं सम भाव ठेवणें उचित आहे या समत्वालाच योग असें म्हणतात. साधु आणि पापी, शत्रु आणि मित्र, इत्यादि सर्व भूताविषयीं सम भाव ठेवणें योग्य होय." सर्व जीव विश्वरुपाचे समान अंश आहेत, हें जो ओळखील, तोच शत्रु आणि मित्र याचेविषयीं सम भाव बाळगूं शकेल हें सम भावानें युक्त असणारें वर्तन विश्वरूप-दर्शनानन्तरच शक्य आहे हा सम भाव आचरणाची योग्य पद्धति दाखवून देतो. सगळ्यांशीं सम-भावानें आचरण होणेंच योग्य आहे. शत्रूविषयींही मनात सम भाव असू द्यावा. मग मित्राविषयी सम भाव असावा, हें वेगळे सांगणें नको.

सर्वांविषयीं सम दृष्टि आणि सम भाव असावा, हाच गीतेचा संदेश आहे. विषम भाव तर सगळेच लोक पाळतात, आणि त्यामुळेंच भाडणें आणि युद्धें ही वाढत आहेत. हें युद्धाचें मूळ नष्ट करुन त्याचे ठिकाणीं सम भाव स्थापवा, असा गीतेचा उपदेश आहे

## ईश्वराची सत्ता

यांतला ईश्वर शब्द कित्येक अभ्यासूंना टोचणाराही होऊं शकेल वेद आणि उपनिषदें यांनीं ईश्वर शब्दाचा उपयोग क्वचितच केला आहे " **ब्रह्म, आत्मा, सत्, एकः, सर्व** " हींच पदें वेद आणि उपनिषदें यांत आढळतात. ईश्वर पद अलिकडेच उपयोगिलें जातें. प्राचीन ऋषि " सत् " या शब्दाचाच उपयोग करीत असत. आणि तोच शब्द युक्तिसंगत व तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें उपयुक्त आहे. ईश्वर शब्दाप्रमाणें सत्, ब्रह्म इत्यादि शब्दाशीं अनेक नव्या कल्पना जोडलेल्या नाहींत. सत् शब्दाचा अर्थ "ज्याचें अस्तित्व आहे तें;" आत्मा शब्दाचा अर्थ " सतत प्रेरणाशील तत्व, " ब्रह्म

शब्दाचा अर्थ "सर्वांहून मोठें, सामर्थ्यवान्." हे शब्द ईश्वर शब्दाहून निःसंशय चांगले आहेत सध्या ईश्वर हा शब्द सर्वांचा आवडता असल्यानें त्याचाच उपयोग आम्हीं येथें केला आहे.

आम्ही ज्या ईश्वर पदाचा या ठिकाणीं उपयोग करतों, त्याचा अर्थ आमच्या मतें **"सगळ्यांकडून आदर व सन्मान मिळविण्यास योग्य अशी सत्ता,"** असा आहे. हाच अर्थ "ब्रह्म, आत्मा, सत्" इत्यादि शब्दांनीं प्राप्त होतो हा अर्थ लक्षात आणला असता असाही बोध घेता येतो कीं, विश्वांतील कोणत्याही पदार्थाशीं जो व्यवहार करावयाचा, तो अधिकात अधिक आदर व सन्मान यानीं युक्त असला पाहिजे. शत्रूबरोबरही आदर आणि सन्मान यानीं युक्त असा व्यवहार करतां येतो. म्हणूनच गीतेनें सांगितलें आहे कीं, " शत्रू, मित्र, पापी आणि साधु याचे बरोबर सम भाव ठेवावा." ( गी० १२।१८,६।९ ) मग जे शत्रू नव्हेत, त्यांच्याशीं आदरयुक्त व्यवहार करावा, हे सांगणेंच नको.

## मुक्तीचें स्वरूप

अलीकडे मुक्तीच्या स्वरूपाविषयीं मोठ्या विलक्षण कल्पना प्रचलित आहेत. इच्छारहित असलेलें मूल हें मुक्त असतें, असें समजलें जातें. पोराप्रमाणें व्यवहार करणारालाही मुक्त असें म्हणतात। या कल्पनेला तर कित्येक आधुनिक उपनिषदांनींही पुष्टि दिली आहे। ज्याला स्वतःची अशी कांहींही इच्छा उरली नाहीं, तो ज्या ठिकाणीं बसला असेल तेथेंच तो बसलेला राहील. म्हणूनच त्याला "परेच्छाप्रवृत्त" असें म्हणतात. "महाराज। आता स्नानाला उठावें।" असें शिष्यांनीं विनंति केल्यावरच जो उठतो आणि इतरही सर्व व्यवहार याचप्रमाणें करतो, त्याला "परेच्छाप्रवृत्त मुक्त," असें म्हणतात सध्या असे मुक्त पुष्कळ आढळतात।

जे स्वतः सरळ बोलत नाहींत, एक प्रश्न केला असता दुसरींच उत्तरें देतात, ज्यांच्या व्यवहारामध्यें शुद्धताही नसते, जे केवळ जिवन्तच असतात, पण व्यवहारांत यत्किंचितही कोणाच्या उपयोगी पडूं शकत नाहींत, ते मुक्त झाले आहेत, असें समजलें जातें. पण गीता मुक्त शब्दाचा अर्थ वेगळाच करते—

शुद्ध होतो, आणि शुद्ध झाल्यावरच मग मुक्त होतो. ज्यावेळीं त्याला विश्वरूप ईश्वराचें यथार्थ ज्ञान होतें, त्यावेळींच मनुष्य शुद्ध होतो, आणि विश्वरूपाच्या सेवेनेंच मुक्तता आणि सुमनता प्राप्त होते.

बीजाचा वृक्ष होतो, तो फळतो आणि फुलतो, हें आपण नेहमी पहात असतों. फळांनी आणि फुलांनी भरलेल्या वृक्षाला पहातांना आम्हांला हें माहीत असतें कीं, हा सर्व विस्तार एका लहानशा बीजाचाच आहे. आतां असा विचार करा कीं, फळांनी आणि फुलांनी बहरलेल्या वृक्षाजवळ जाऊन त्याच्या शीतल छायेंत त्याच्या फुलांच्या सुगंधानें आणि त्याच्या फळांच्या मधुर रसानें आनन्दाची प्राप्ति करून घेणें अधिक योग्य आहे, कीं त्याची मुळें उपटून टाकून त्याच्या मूळ बीजाचा शोध करणें योग्य आहे ?

ईश्वररूपी जगद्बीजापासून हा विश्वरूपी महावृक्ष निर्माण झाला आहे, आणि हा फुलें, फांद्या आणि फळांनीं सुशोभित झाला आहे. याचा त्याग करून याच्या मुळांचा शोध केला पाहिजे, असें ज्या लोकांचें मत आहे, त्यांचा आशय असा दिसतो कीं हें विश्व निर्माण झाल्यानें मूळ वस्तूंत कोठेंतरी बिघाड झाला आहे, म्हणून या वृक्षाचा त्याग करून मूळ बीज शोधून काढलें पाहिजे. पण या बुद्धीच्या सिद्धान्ताचा स्वीकार न करतां गीतेनें असें सांगितलें आहे कीं, बीज शोधण्याचे कष्ट व्यर्थ आहेत. हें विश्वरूपच उपास्य आहे, हें विश्वरूपच मनुष्यानें सेवा करण्यास योग्य आहे. मूळ बीजांत ज्या शक्ति होत्या, त्या सर्व यांत प्रकट झाल्या आहेत आणि त्यांपासूनच आनन्द प्राप्त करून घेतला पाहिजे.

या विश्वरूपाशीं आपला अखण्ड आणि अनन्य सम्बन्ध आहे, हें जाणलें पाहिजे, आणि अनन्य होऊनच या विश्वरूपाची सेवा आणि उपासना केली पाहिजे. हाच गीताधर्म आहे या विश्वाला तुच्छ, हेय, त्याज्य, हीन आणि दीन मानणारीं सर्व मतमतान्तरें गीतेच्या या सिद्धान्तामुळें पराभूत झालीं आहेत.

विश्व हें परमेश्वराचें प्रत्यक्ष रूप आहे, असें सांगून गीतेनें लोकांवर पुष्कळच मोठा उपकार केला आहे गीतेनें आम्हाला आमच्याशीं खेळणारा आणि आमच्यातून

सेवा घेणारा ईश्वर दिला आहे. प्रत्येकानें आपापल्या शक्तीप्रमाणें याची न्यून किंवा
अधिक सेवा करावी, आणि ती प्रत्यक्ष ईश्वरालाच पोंचते, याचा कोणालाही अनुभव
येऊं शकेल. जे लोक घरीं आलेल्या भिकाऱ्याला शिव्या देतात, हाकून देतात आणि
मग देवळांत जाऊन तेथील मूर्तीची षोडशोपचारें पूजा करतात, त्याचें तें कर्म कधींही
ईश्वरसेवेंत समाविष्ट होणार नाहीं, असें गीतेनें स्पष्ट केलें आहे.

विश्वरूप हें ईश्वराचें रूप आहे, याचा स्वीकार केला कीं, दारीं आलेला भिकारीही
ईश्वराचेंच रूप आहे. तो ईश्वर आपली सेवा घेऊन आपणास कृतकृत्य करण्या-
करिताच आला आहे. त्याला शिव्या देऊन आपण त्यास हांकून दिलें, आणि प्रत्यक्ष
ईश्वराचा द्रोह केला, व ज्या ठिकाणीं षोडशोपचाराचा कांहीं उपयोग नाहीं त्या ठिकाणीं
त्याचा वर्षाव करून आपलें पाप धुवूं इच्छिलें पण गीतेच्या सिद्धान्ताप्रमाणें हें साध्य
होणार नाहीं.

मनुष्यानें आपलीं सर्व कृत्यें पारखून पहावीं, आणि आपलें आचरण विश्वरूप
ईश्वरास मानून होत आहे किंवा नाहीं, हेंही पहावें. या कसोटीवर जें कृत्य उतरत
नसेल, तें गीतेच्या सिद्धांताच्या विरुद्ध आहे गीतेवर श्रद्धा ठेवणें ही गोष्ट वेगळी,
आणि तदनुकूल आचरण करणें हें अगदीं वेगळें आहे

## विश्वरूपांत जन्म

जो जीव जन्म घेऊन शरीर धारण करतो, तो विश्वरूप ईश्वराच्या विशाल देहात
कुठेंतरी अंशरूप होऊन येतो. या विश्वरूप देहात आपलें अस्तित्व आहे असें जाणणें,
हें त्या जीवाला मोठें भाग्यच प्राप्त होत असतें म्हणून जन्म हा दुःख भोगण्या-
करिता नसतो, तो पापाचें फळही नाहीं, तो पारतंत्र्यरूपही नाहीं आणि कोणत्याही
दृष्टीनें तिरस्कार करण्यासारखाही नाहीं. देह हा कारागृह, पिंजरा, भ्रमजाल, पापाचें
फळ यांपैकीं एकही नाहीं. ईश्वराच्या पवित्र देहात जीवाचें वास्तव्य असतें. देह हा
ऋषींचा आश्रम आहे किंवा तें देवाचें मंदिर आहे, विश्वरूप महादेवाच्या विशाल
देहाचा तो एक अंश आहे.

देह प्राप्त होणें हें पारतंत्र्यही नाहीं, आणि देहापासून मुक्तता मिळणें ही मुक्तीही

सर्व द्रव्य, सम्पत्ति, घरे हे प्रजापतीचे आहे. त्यांवर कोणाही व्यक्तीचा अधिकार नसून त्या सर्वांवर प्रजापतीचाच अधिकार आहे. प्रजापतीच्या राज्यसंस्थेकडून प्रजाजनांच्या हिताकरितां या द्रव्याचा उपयोग पाहिजे तसा केला जाईल. तात्पर्य, अनिकेत स्थिति ही समाजाचा विकास झाल्यानन्तर अन्तिमांत येणारी स्थिति आहे, हे विसरता नये.

## ' स्व ' ला व्यापक करा

प्रत्येक प्राण्यात ' स्व ' अर्थात् " आपलेपण " असतेंच. या ' स्व ' ला अति व्यापक म्हणजे विश्वाच्या विस्ताराएवढें विस्तृत केलें पाहिजे. हेंच गीतेनें विश्वरूप-वर्णनाच्या द्वारें सांगितलें आहे. जें विश्वरूप आहे, तेंच-

ईश्वराचें रूप आहे,
परमेश्वराचें रूप आहे,
ब्रह्माचें रूप आहे. किंवा
माझें रूप आहे.

या चारींचा अर्थ एकच आहे. ' स्व ' चें व्यापकत्व एका व्यक्तीपुरतेंच मानणें हें दोष उत्पन्न करणारें आहे; परन्तु तोच ' स्व ' विश्वरूपाएवढा व्यापक झाला, तर परम सिद्धि मिळाली असें समजावें. भगवान् श्रीकृष्ण यांचा ' स्व ' विश्वव्यापी होता आणि अर्जुन आपला ' स्व ' देहाएवढाच मानीत होता. गीता हा या दोघांचा संवाद आहे.

विश्वरूप आत्म्याचा अनुभव हा परम उच्च अशा प्रकारच्या उन्नतीचा आदर्श आहे, आणि व्यक्तिरूप आत्म्याचा अनुभव हा अज्ञानाचा दर्शक आहे.

म्हणूनच आपल्या वेदादि धर्मग्रन्थांत स्वार्थत्याग हें पद आढळून येत नाहीं. ही कल्पना विदेशी आहे. आपल्या धर्मांत स्वार्थाला विश्वव्यापक करण्याचा उपदेश आहे. आपल्या धर्मग्रन्थांत आत्मयज्ञ ही कल्पना आढळते, आत्मत्याग नाहीं.

आमच्यामध्यें किती विदेशी आणि विजातीय कल्पना शिरल्या आहेत, यांचा शोध करणें आज इष्ट ठरेल. यज्ञात आपण " देवपूजा—संगतिकरण—दान " करतों; पण स्वार्थत्यागांत मनुष्याला स्वतःलाच घालवून बसावें लागतें. आमच्या

मुळींत आत्मत्यागाची कल्पना नाहीं. जे अनन्त आणि वेगवेगळाले आत्मे मानतात, तेच एक आत्मा दुसऱ्यावर उपकार करूं शकतो, असें म्हणतात. पण सगळ्यांचा एकच आत्मा असून तो सत् आहे, दुसरी कोणतीही वस्तु येथें नाहीं, असा ज्यांचा सिद्धान्त आहे, त्यांच्या मतांत परोपकार शब्दाला अर्थ काय असूं शकेल बरें ? ज्या ठिकाणीं कोणी परच नाहीं, त्या ठिकाणीं परोपकार तरी कसा होऊं शकेल ? गीतेनें नानात्मवादाचें खण्डन केलें आहे. म्हणून गीतेच्या या सिद्धान्ता-प्रमाणें जें सयुक्तिक असेल, तेंच मानणें योग्य ठरेल.

## आत्मज्ञानानंतर संतानोत्पत्ति

सध्या असें मानलें जातें कीं, आत्मज्ञान्याला कांहींही कर्तव्य उरत नाहीं, इच्छाही निर्माण होत नाहीं. मग स्त्रीशीं त्याचा सम्बन्ध कसा होईल ? परन्तु या मताचें प्रतिपादन करणारे लोक हें विसरतात कीं, बृहदारण्यक उपनिषदांत ब्रह्मज्ञान प्राप्त झाल्यावर इष्ट असेल तितकी सन्तानोत्पत्ति करण्याचा विधि सांगितला आहे, आणि रैक्व नावाच्या आत्मज्ञान्याची कथा सांगितली आहे. रैक्व ब्रह्मज्ञानाचा उपदेश करण्याकरितां दक्षिणा घेतो; कांहीं गांवेंही इनाम म्हणून घेतो; राजपुत्रीशीं विवाह करतो; रथ, घोडे, इत्यादिही घेतो; आणि नंतर ब्रह्मज्ञानाचा उपदेशही करतो. यावरून ब्रह्मज्ञान ही मरतेवेळीं प्राप्त करून घेण्याची वस्तु आहे, असा जो समज आहे, तो चुकीचा ठरतो. ब्रह्मज्ञान हें ज्ञान विश्वांतील दैवी सम्पत्तीचा विकास करणारें आहे. गलितगात्र माणसांचा तो काथ्याकूट करण्याचा विषय नव्हे. वेदांमध्येंही—

> यो वै तां ब्रह्मणो वेद अमृतेनावृतां पुरीम् ।
> तस्मै ब्रह्म च ब्राह्माश्च आयुः प्राणं प्रजां ददुः ॥
> (अथर्व. १०।२।२९)

" जो ब्रह्मज्ञान जाणतो त्याला त्या ब्रह्माच्या कृपेनें दीर्घायुष्य, बलवान प्राण अर्थात् जीवन आणि उत्तम सन्तती प्राप्त होते. "

ब्रह्माच्या कृपेनें जी सन्तती प्राप्त व्हावयाची ती दत्तक असेल कीं औरस, याचा तरी विचार करा ! म्हणून आमचें असें म्हणणें आहे कीं, ब्रह्मज्ञान हें गृहस्थाश्रमान

प्रवेश होण्यापूर्वी म्हणजे ब्रम्हचर्याश्रमांतच झालें पाहिजे.

ब्रह्मप्राप्तीकरितां आचरण करणें याचेंच नांव ब्रम्हचर्य. म्हणून ब्रह्मचर्य संपतानाच ब्रह्मज्ञान होणें अगदीं स्वाभाविक आहे. त्याच्यानन्तर गृहस्थाश्रमात प्रवेश होईल, आणि अशा ज्ञान्याला जी सन्तति होईल, तिलाच सुप्रजा असें म्हणतां येईल अशी लोकसंस्था वाटल्यानेंच या पृथ्वीवर स्वर्गाचें राज्य होऊं शकेल. हेच भागवत राज्यव्यवस्था चालविण्यास योग्य होतील.

आज आम्ही या आदर्शापासून बरेच खालीं घसरलों आहोंत. ऋषिमुनींनीं ठेवलेलें ध्येय तर दूरच राहिलें, पण भगवद्गीतेनें जो साधनमार्ग सांगितला तोही सध्या आचरणात आणला जात नाहीं; म्हणून आचरणात उतर[illegible] दृष्टीनें गीतेचे अध्ययन केलें पाहिजे आणि गीतोपदेशाप्रमाणें आचरण करणारा [illegible] संघही स्थापन झाला पाहिजे. अशा रीतीनें प्रयत्न केला तरच गीतेचें [illegible] आचरणात येईल

व्यक्तीमध्यें शान्ति

राष्ट्रमध्यें शान्ति

व

विश्वामध्यें शान्ति !

